ते सदा ॥ १६ ॥ वीरशैवव्रतस्थस्य नान्यत् कार्यं हि विद्यते ॥ मम पूजां विना ध्यानं स्मरणं कीर्तनं विना ॥ १७ ॥ विशुद्धभक्ता मयि ये ये च वैकान्तसेविनः ॥ मम ध्यानरता नित्यं वीरास्ते शिवयोगिनः ॥ ९ ॥ स्मरणं कीर्तनं केलिः प्रेक्षणं गुह्यभाषणम् ॥ संकल्पोऽध्यवसायश्च क्रियानिर्वृत्तिरेव च ॥ १० ॥ एतन्मैथुनमष्टांगं प्रवदन्ति मनीषिणः ॥ विपरीतं ब्रह्मचर्यमेतदेवाष्टलक्षणम् ॥ ११ ॥ तदुक्तलक्षण-ब्रह्मचर्यव्रतपरा हि ये ॥ योगिनो ये महात्मानस्ते वीराः शिवयोगिनः ॥ १२ ॥ यदि भिक्षाटनेच्छास्ते तदा भिक्षाटनं चरेत् ॥ न कर्तव्यस्त्वनियमः साधनं ज्ञानमेव हि ॥ २९ ॥ त्रिकालमर्चयेल्लिंगं विहरेत यथासुखम् ॥ विषयेंद्रियसंयोगं नैरंतर्येण यावता ॥३६॥ यत्नेन यतते लिंगी तावल्लघु सुखं व्रजेत् ॥ वीरशैवमतस्थं यः पूजयेच्छिवरू-पिणम् ॥ ३९ ॥ निस्तारयति दातारं दशपूर्वान् दशापरान् ॥ यस्तिरस्कुरुते मूढः शिवलिंगिनमीश्वरि ॥ ४० ॥ स कोटिकुलसंयुक्तो रौरवे नरके पतेत् ॥ तदेतत् कथितं देवि वीरशैवस्य लक्षणम् ॥४१॥ त्रिकालं भस्मना स्नानं शक्तितो लिंगपूजनम् ॥ भैक्षं च शिवभक्तेषु वीरशैवस्य लक्षणम् ॥ ४३

---

शिवध्यानांत असक्त राहून शुद्ध राहून संचार करणारे तेच, वीरशैव होत. ॥ १७ ॥ वीरशैवव्रत करणाऱ्याला माझी पूजा, माझें ध्यान, माझें स्मरण, माझें कीर्तन या आच-रणाशिवाय दुसरें आचरण नाहीं. ॥ ९ ]। कोणी शिवयोगी माझ्या ठिकाणीं शुद्ध भक्ति करणारे असतील, अथवा केवळ माझीच सेवा करणारें; असतील, व केव्हाहीं माझ्या ध्यानांत निमग्न असतील, तेच वीरशैव शिवयोगीं होत. ॥ १० ॥ स्मरण, कीर्तन, खेळणें, पाहणें, गुप्त भाषण, संकल्प, मनाचा दृढनिश्चय, धरलेलें काम शेवटास नेणें ॥ ११ ॥ या सर्वांला बुद्धिमान लोक अष्टांग मैथुन ह्मणतात' या आठ लक्षणांहून भिन्न असलेल्या अष्टांग लक्षण आचरणालाच ब्रह्मचर्य ह्मणतात. ॥ १२ ॥ या करितां वर सांगितलेल्या अष्टांग लक्षणयुक्त ब्रह्मचर्यानें राहणोर जे योगी महात्मे असतील तेच वीरशैव शिवयोगी होत ॥ २९ ॥ भिक्षेकरितां फिरावयाचें असेल तर फिरावें. अनियमानें राहूं नये. कारण ज्ञानच मुख्य साधन आहे. ॥३६॥ त्रिकाल लिंगपूजा करून सुखानें फिरावें, इंद्रियांना विषयापासून पराङ्मुख करण्याविषयीं निरंतर लिंगधारी प्राणी ॥ ३७ ॥ जितके प्रयत्न करील तितके लौकर सुख पावतो. ॥ ३९ ॥ शिवस्वरूपी वीरशैव मतांतल्या वीरशैवाची पूजा कोणी केली तर ॥ ४० ॥ किंवा दान दिलें तर त्या पूजकाचें व दात्याचे दश पूर्वजांना व पुढचे दहा लोकानां ( पिढी ) तो वीरशैव मुक्त करतो. शिवलिंग धारण केलेल्या प्राण्याचा तिरस्कार जो मूर्ख करतो, ॥ ४१ ॥ तो आपल्या कोटी कुळासह रौरव नरकांत पडतो. हे देवि, असें वीरशैवाचें लक्षण आहे. ॥ ४३ ॥ तीनी वेळ भस्मस्नान, शक्त्यनुसार लिंगपूजा, शिवभक्तांच्या ठिकाणीं भिक्षा, वगैरे हीं लक्षणें वीरशैवांचीं आहेत.

स्मरणं पूजनं ध्यानं तत्कथास्तोत्रमन्वहम् ॥ शंकरस्य ममेशस्य वीरशैवस्य लक्षणम् ॥ ४४ ॥ मौनमेकान्तवासश्च मच्छास्त्रस्यावलोकनम् ॥ विरक्तिर्विषयग्रामे वीरशैवस्य लक्षणम् ॥ ४६ ॥ गुरुशुश्रूषणं शास्त्रचिंतनं तदनुष्ठिभिः ॥ शान्तिरेकान्तवासश्च भक्तिर्देवि शिवे मयि ॥ ४९ ॥ पूजनं सर्वदा लिंगी वीरशैवोपसर्पणम् ॥ मत्पदप्राप्तये चैतत् सोपानपथमुच्यते ॥ ६० ॥

## पारमेश्वरागमे पटले ॥ १९ ॥

अथाधिकारी गच्छेत मतं मम महत्तरम् ॥ तुर्यवीरमहाशैवमप्रमत्तो वसेत्तदा ॥६६॥ तुर्यवीरमताविष्टो निवसेदेवमीश्वरि ॥ अन्यथा भ्रंशते भूयोऽप्यधःकूपे न संशयः ॥ ६४ ॥ अज्ञात्वैतन्महाशास्त्ररहस्यं श्रीगुरोर्मुखात् ॥ अबोधयित्वा शिष्यं यो भ्रष्टौ तावप्युभौ शिवे ॥ ६९ ॥

## सुप्रभेदागमे.

उपचारैः षोडशभिः पूजितस्तोपवर्जितः ॥ अपूजितश्चेन्नो दुःखी भवेदेकप्रकारवान् ॥ २७ ॥ शीतोष्णयोः सुखे दुःखे शिलाविग्रहवद्भवेत् ॥

---

॥ ४४ ॥ श्रीशंकराचें स्मरण, पूजन, ध्यान, श्रीशंकराची कथा ऐकणें, स्तोत्र करणें, प्रतिदिवशीं ईश अशा माझ्यासंबंधी पूर्वोक्त कर्में जो करतो तोच वीरशैव होय. हीं लक्षणें वीरशैवाचीं आहेत. ॥ ४६ ॥ मौन, एकांतवास, माझ्यासंबंधी शास्त्राचें अवलोकन, विषयाविषयीं वैराग्य वगैरे लक्षणें वीरशैवाचीं आहेत. ॥ ४९ ॥ गुरुसेवा, गुरुसेवा करणाऱ्यांशीं शास्त्राचें चिंतन, शांति, एकांतवास, शिव अशा माझी भक्ति, ॥ ५० ॥ नेहमी लिंगपूजा, वीरशैवाकडे भिक्षेकरितां जाणें हे सर्व माझ्या पदवीला चढावयाच्या पायऱ्या होत.

## पारमेश्वरागम पटल ॥ १९ ॥

॥ ५५ ॥ अधिकाऱ्यानें महत्तर अशा चतुर्थ निराभारी वीरमहाशैव नांवाच्या माझ्या मताचा स्वीकार केला तर त्यानें पुष्कळ सावध असलें पाहिजे. ॥ ६४ ॥ हे पार्वति, तुरीय ( चौथ्या ) वीरमतस्थानें या प्रमाणें राहिलें पाहिजे. असाजर राहिला नाहीं तर तो पुष्कळ दिवसपर्यंत नरकांत पडून राहतो. यांत संशय नाहीं. ॥ ६५ ॥ हे पार्वति, हें महाशास्त्र जो शिष्य श्रीगुरूच्या मुखानें समजून घेऊन रहात नाहीं, आणि जो गुरु शिष्याला समजून देत नाहीं ते दोघेही भ्रष्ट होतील.

## सुप्रभेदागम.

॥ २७ ॥ कोणीं तरी षोडशोपचार पूजा केली तर त्या पूजेनें आपल्यास आनंद होऊं नये. पूजा केली नाहीं तर त्यामुळें दुःखही मानूं नये. दोन्ही पक्षीं समान असलें पाहिजे. ॥२८॥ ऊन आणि थंडीनें होणाऱ्या सुख दुःखाविषयीं दगडाच्या प्रतिमे सारखें असावें.

## सुप्रभेदागमे.

मदूर्ध्वमुखसंजातो निरंजनगणेश्वरः ॥ शून्यपीठाधिकारी च पंचाचार्यगुरुर्वरः ।८।

## ॥ व्यासकृतभविष्यत्पुराणे. ॥

राजयोगैकसाम्राज्यसौभाग्यः सर्वसुंदरः ॥ मायाकोलाहलमहामायामदविभंजनः ॥ १ ॥ स गुरुः समस्तजगतामगोचरो निगमागमार्थनिरवद्यविग्रहः ॥ मम चात्मबोधजनकाल्लमप्रभुः किमुतात्मनां सदृशप्रबोधवान् ॥ २ ॥

---

## वीरशैवसदाचारसंग्रहे प्रकरणे ॥ ८ ॥

अथ निराभारिवीरशैवलक्षणं ॥ सर्वस्रक्चंदनादीनि वनितादिमहासुखम् ॥ तिरस्कृतस्वचित्तः सन् न्यसेत्परशिवे सदा ॥ १२२ ॥ स्वात्मन्यैक्यं विदित्वाथ सर्वसंगविवर्जितः ॥ दण्डकौपीनकाषायजटायोगकमण्डलून् ॥ १२३ ॥ धृत्वाऽथवा

---

## सुप्रभेदागम.

॥ ८ ॥ माझ्या ऊर्ध्व मुखापासून उत्पन्न झालेला निरंजन नांवाचा गणाध्यक्ष शून्य पीठाचा अधिकारी होऊन पंचाचार्यांचा श्रेष्ठ गुरु होऊन राहिला आहे.

## व्यासकृत भविष्यत्पुराण.

॥ १ ॥ गुरूजवळ राजयोग नांवाचें एकच साम्राज्य वैभव असतें, व तो सर्वांपेक्षां सुंदर असतो, मायेचें गोंधळ, महामायेची मस्ती मोडणारा तो आहे. ॥ २ ॥ तसा तो गुरु अल्लमप्रभु सर्व लोकांस अगोचर असून निगम ( वेद ) व शिवागम यांचा अर्थच आपला देह करून राहिला आहे. मला शिवाला देखील आत्मज्ञान करून देणारा झाला आहे. मग इतरांस योग्य बोध करून देतो, ह्मणण्यांत काय आश्चर्य आहे ?

---

## वीरशैवसदाचारसंग्रह प्रकरण ॥ ८ ॥

निराभारिवीरशैवाचीं लक्षणें:– ( १२२ ) फुलांच्या माळा, चंदन वगैरे विषयोपभोगाचे उपचार व स्त्री वगैरे विषयसुख या सगळ्यांचा मनानें तिरस्कार करून, निराभारि वीरशैवानें परमात्मा शिवाच्या ठिकाणीं आपलें चित्त नेहमीं लावावें. ( १२३ ) सर्व संग टाकून देऊन आपल्या स्वरूपामध्यें लीन व्हावें, दंड, कौपीन ( लंगोटी, ) भगवीं वस्त्रें, जटा, योग, कमंडलु ( १२४ ) हीं धारण करून रहावें, किंवा डोक्याचें मुंडन करवून वस्त्ररहित होऊन फक्त आसनाकरितां हरिणाचें कातडें आणि पांघरण्याकरितां भगवें

शिरोमुण्डी भूत्वा वसनवर्जितः ।। अजिनासनयुक्तस्सन् कापायाच्छादकश्चरेत् ॥ १२४ ॥ कूष्माण्डखर्परं धृत्वा भवेच्चैव दिगंबरः ॥ यदृच्छया लब्धशैवप्रसादास्वादने रतः ॥ १२५ ॥ कायेन वाचा मनसा त्यक्तभूवित्तकन्यकः ॥ त्यक्त्वा गृहमठादीनि मनुष्यादिगृहाणि च ॥ प्रवासस्तेन कर्तव्यो वने गिरिगुहादिषु ॥ १२६ ॥ तृणीकृतजगज्जीवो लौकिकाचारवर्जितः ॥ त्यक्तप्रवरगोत्रश्च सूत्रवर्णादिकं तथा ॥ १२७ ॥ पादांगुलीयवलयश्यामदन्तादिभिः सदा ॥ स्त्रीजातिभिः कृतान्नादितिरस्कारी शिवव्रती ॥ १२८ ॥ पूर्वाश्रमगतान्मातृपितॄनपि परित्यजेत् ॥ स्वयंभुलीलया सोऽहं ब्रह्मेति विदितात्मवान् ॥ १२९ ॥ गृहस्थाचारवर्तीनां न कर्ता कार्यमंजसा ॥ निर्नामो निर्ग्रहो भूत्वा वधूसंगविवर्जितः ॥ १३० ॥ निष्कारणो निष्कलंको निर्विकल्पश्च निष्क्रियः ॥ निष्प्रपंचो निरालश्च रागद्वेषादिवर्जितः ।१३१। निषेधविधिरूपे च एकचित्तो भवेच्च सः ॥ कर्मकांडिगृहस्थानां मंदिरेषु शुभाशुभे ॥ १३२ ॥ विवाहादिषु कार्येषु शवसंस्थापनादिषु ॥ आगत्य चैकदिवसं पुरग्रामे वसेच्च सः ॥ १३३ ॥ ग्रहत्रयेष्वन्नपानं याचमानो भवेच्च सः ॥ दत्तं चेदपि भुंजीत

---

वस्त्र घेऊन रहावें. ( १२५ ) भोपळ्याचें खापर ( कमंडलु ) तेवढें जवळ ठेवून दिगंबर व्हावें. आपोआप—न मागतां जो शिवप्रसाद मिळेल तोच स्वीकारावा. ( १२६ ) शरीरानें, वाणीनें व मनानें जमीन, पैसा व स्त्रिया यांचा त्याग करावा. घरें, मठ, मनुष्यांच्या वगैरे राहण्याच्या जागा यांठिकाणीं न राहतां, त्यानें अरण्य, पर्वत, गुहा वगैरे ठिकाणीं फिरावें. १२७ जगाला काडीसमान मानून ( जगाची पर्वा न बाळगतां—जगाविषयीं निस्पृह राहून ) लौकिक आचार, व प्रवर, गोत्र, सूत्र वर्ण इत्यादि विषयांचा त्याग करावा. ( १२८ ) ज्यांच्या पायांत जोडवीं आहेत व ज्यांचे दांत काळे असतात ( स्वच्छ नसतात ) अशा प्रकारच्या स्त्रियांनीं तयार केलेलें अन्न शिवव्रतानें वागणाऱ्या निराभारिवीरशैवानें ग्रहण करूं नये. ( १२९ ) पूर्वीच्या आश्रमांतील आईबापांचा देखील त्याग करावा. स्वयंभु ( आपोआप उत्पन्न होणाऱ्या ) लीलेनें तो मीच ब्रह्म असें आत्मस्वरूप जाणून ( १३० ) गृहस्थाश्रमांत असणाऱ्यांचीं कामें मुळींच करूं नयेत: नामरहित व उपाधिरहित होऊन स्त्रियांचा संसर्ग वर्जावा. ( १३१ ) कारणापलीकडचा, कलंकरहित, विकल्परहित, निष्क्रिय, प्रपंचांत न सांपडणारा, व निष्कपट असा होऊन राग, द्वेष इत्यादिकांपासून दूर रहावें. ( १३२ ) शास्त्रांत ज्या गोष्टी निषिद्ध ( करूं नये ) ह्मणून सांगितल्या आहेत, व ज्या गोष्टी कराव्या ह्मणून सांगितल्या आहेत, त्या दोन्ही प्रकारच्या गोष्टींविषयीं त्याचें मन सारखेंच असावें ( दोन्ही गोष्टी त्यानें सारख्याच मानाव्या, ) ह्मणजे अभेदपणानें वर्तावें. ) चांगल्या वाईट वेळीं कर्मी ( कर्मानें वागणाऱ्या ) गृहस्थांच्या घरीं ( १३३ ) लग्न वगैरे कार्यांमध्यें किंवा प्रेतविधींच्या वेळीं एक दिवस गांवांत येऊन रहावें. ( १३४ ) तीन घरीं

मो चेत्क्लेशं न कारयेत् ॥ १३४ ॥ नांदोलिकां समारोहेदश्वारोहणवर्जितः ॥ पादचारी च संभूय चरेद्भूवलये सदा ॥ १३५ ॥ अभक्तानां च भक्तानां शिक्षाशापविवर्जितः एकभुक्तो भवेत्सोऽपि सदा वैराग्यवान् भवेत् ॥ १३६ ॥ षट्स्थलान्त्यनिरालंबस्थानेप्सुयमवान्भवेत् ॥ सती विद्या सुतस्तोषो वैराग्यं बांधवः स्मृतः ॥१३७॥ क्षमैव परिवारस्तु सखा शांतिरितीरितः ॥ भक्तिर्माता सदाचारः पिता सत्यं सुता मता ॥ १३८ ॥ स्नुषा श्रद्धैव संप्रोक्ता पौत्रा मैत्र्यादिसद्गुणाः ॥ ज्ञानमेव शरीरं स्याद्विचारः क्षेत्रमेव च ॥ १३९ ॥ दासी त्वहिंसा संप्रोक्ता दासस्त्वास्था तथैव च धर्मो वाहनमित्युक्तं त्वाचारो दम एव च ॥ १४० ॥ मुक्तिरेव परो देश इति निश्चितधीः सदा ॥ कंथा कमंडलुश्चैव दण्डं वै भैक्ष्यपात्रकम् ॥ १४१ ॥ भस्मपात्रं च पंचैता बाह्यमुद्राश्च धारयेत् ॥ तत्तन्मंत्रानुसारेण धृत्वा तु तदनंतरम् ॥ १४२॥ तदन्यपंचमुद्रास्तु चांतरंगेऽपि धारयेत् ॥ समतैव च कंथा स्याद्दण्डो ज्ञानं तथैव च ॥ १४३ ॥ कमण्डलुर्दयैवासीद्वैराग्यं भैक्ष्यपात्रकम् ॥ क्षमैव भस्मशुटिकामेवं चान्तेऽपि धारयेत् ॥ १४४ ॥ केशग्रंथिजटावांश्च शिरोमुण्डी तथैव च मृगाजिनी च संभूय भूत्वा चैव दिगंबरः ॥ १४५ ॥ एवं विधान्शैववेषानंगीकृत्य

---

अन्नपाणी मागून घ्यावें. कोणीं दिलें तर घ्यावें, न दिल्यास त्रास देऊं नये. ( १३५ ) पालखी, मेणा यांत बसूं नये व घोड्यावर चढूं नये. नेहमीं पायानेंच पृथ्वीवर चालावे. ( १३६ ) अभक्तांना किंवा भक्तांना शिक्षा, शाप देऊं नये. रोज एकदां जेवावें. नेहमीं विरक्त असावें. ( १३७ ) षट्स्थलांच्या शेवटीं असणारें जें निरालंबस्थान (स्वरूपाचें स्थान) त्या ठिकाणीं पोहोंचण्याचा त्यानें उद्योग करीत असावें. विद्या हीच त्याची बायको, संतोष हाच त्याचा मुलगा व वैराग्य हाच त्याचा भक्त होय. ( १३८ ) क्षमा हाच त्याचा परिवार ( नोकर चाकर ) शांति हाच स्नेही, भक्ति हीच आई, सदाचार हाच बाप, सत्य हीच मुलगी ( १३९ ) श्रद्धा हीच सून व मैत्री वगैरें सद्गुण हेच त्याचे नातु होत. ज्ञान हेंच शरीर विचार हेंच क्षेत्र, ( १४० ) अहिंसा हीच दासी, तसेंच ( परमात्म्याविषयींची ) आस्था हाच दास, धर्म हेंच वाहन, दम हाच आधार, (१४१) मुक्ति हीच आपली श्रेष्ठ जागा असा नेहमीं निश्चय करून कंथा ( छाटी भगवें वस्त्र ) कमंडलु, दंड, भिक्षापात्र, ( १४२ ) व भस्मपात्र ह्या पांच बाह्य मुद्रा त्या त्या मंत्रानुसारानें धारण कराव्या. तदनंतर ( १४३ ) या मुद्रांहून वेगळ्या अशा पांच मुद्रा अंतरंगांत धारण कराव्या. समता हीच कंथा, तसेंच ज्ञान हाच दंड, ( १४४ ) दया हाच कमंडलु, वैराग्य हेंच भिक्षापात्र व क्षमा हेंच भस्मपात्र याप्रमाणें या पांच मुद्रा अंतःकरणांत वागवाव्या. ( १४५ ) केंसाला गांठ देऊन जटा वळवाव्या. किंवा मुंडन करावें हरणाचें कातडें जवळ बाळगावें, व दिगंबर असावें. ( १४६ ) याप्रकारचा शैव-

सदा चरेत् ॥ शिवार्चनं त्रिपुंड्रस्य धारणं भस्मधूलनम् ॥ १४६ ॥ शिवमंत्रजपश्चैव शिवध्यानपरायणः ॥ सदा लिंगांगसंयोगक्रियाज्ञानादिसंयुतः ॥ १४७ ॥ रसायनाद्यकृत्वा तु तथा वै क्रयविक्रयम् ॥ वैद्यं वैश्यं ज्योतिषं च व्यवहारांश्च लौकिकान् ॥ १४८ ॥ विषयादीन्परित्यज्य विरक्तस्तदनंतरम् ॥ भवाख्यारण्यमध्यस्थलोभपंकं परित्यजेत् ॥ १४९ ॥ तिरस्कृत्येंद्रियरिपून् मोहपैशाचिकं भयम् ॥ तथैव क्रोधशार्दूलं ममतासर्पभीतिजम् ॥ १५० ॥ मन्मथाख्यस्तेयिनं च मदाख्यतिमिरं तथा ॥ तापत्रयाख्यगर्ते च न प्रविष्टो भवेच्च सः ॥ १५१ ॥ विषयाख्ये कण्टकेऽपि पादप्रक्षेपवर्जितः ॥ न प्रविष्टो भवेदेव सोऽहंकारमहाह्रदे ॥ १५२ ॥ सर्वावधानी भूत्वैव विरक्तस्थाननिष्ठितः ॥ षोडशैरुपचारैश्च पूजितस्तोषवर्जितः ॥ १५३ ॥ अपूजितश्चेन्नो दुःखी भवेदेकप्रकारवान् ॥ शीतोष्णयोः सुखे दुःखे शिलाविग्रहवद्भवेत् ॥ १५४ ॥ क्रियादीक्षादिना पूर्वैराचार्यैर्दत्तमंजसा ॥ सत्क्रियासंयुतं चेष्टलिंगं ब्रह्ममयं तथा ॥ १५५ ॥ गुरुवक्त्रेण सूक्ष्मे तु शरीरे च द्वितीयके ॥ इदं प्राणमयं लिंगमिति संभावयेत्तथा ॥ १५६ ॥ तथैव प्राणलिंगं तु शरीरे कारणाह्वये ॥ भावलिंग

---

वेष नेहमीं धारण करून वर्तावें. शिवपूजा करावी. त्रिपुंड्र लावावें. अंगाला भस्म फासावें. ( १४७ ) शिवमंत्राचा जप करावा, शिवाचें नेहमीं ध्यान करावें. लिंगांगसंयोगाची जी क्रिया तिचें ज्ञान करून घ्यावें. ( १४८ ) रसायनें करूं नये. खरीदी विक्री, वैद्यक, वाणीपणा, ज्योतिष्याचा धंदा, लौकिक व्यापार ( १४९ ) विषय वगैरे सर्व सोडून देऊन मग प्रपंचरूपी अरण्यांतील लोभरूपी चिखल टाकून द्यावा ( प्रपंचावरील लोभ सोडावा ). ( १५० ) इंद्रियांच्या वैऱ्यांचा ( षड्रिपूंचा ) तिरस्कार करावा. मोहरूपी पिशाचाचें भय तसेंच क्रोधरूपी वाघ, ममतारूपी सर्पिणीचें भय, ( १५१ ) कामरूपी चोर व मदरूपी अंधार या सगळ्यांना हुसकून लावावें. तापत्रयाच्या खड्ड्यांत पडूं नये. ( १५२ ) विषयरूपी कांटेरी झाडावर पाऊल ठेवूं नये. अहंकाररूपी पुरांत शिरूं नये. ( १५३ ) सर्वांविषयीं सावधान राहून विरक्तस्थानीं ( विरक्तस्थितींत ) असावें. षोडशोपचारानें कोणीं आपली पूजा केली तरी त्यानें ( निराभारिवीरशैवानें ) त्याचा संतोष मानूं नये. ( १५४ ) कोणीं पूजा केली नाहीं तरी त्याचें त्याला दुःख वाटूं नये. असें समत्वानें वागावें. थंडी व उष्ण यांच्या सुख दुःखांविषयीं ज्यांचें दगडाचें शरीर असतें अशासारखें रहावें ( दगडाला ज्याप्रमाणें थंडी व उष्ण याचें सुखदुःख सारखें आहे, त्याप्रमाणें त्यानेंही हें सुखदुःख सारखें मानावें. ) ( १५५ ) क्रियादीक्षा वगैरे विधीनें पूर्वींच्या आचार्यांनीं उत्तम क्रियायुक्त असें जें ब्रह्ममय इष्टलिंग खरोखर दिलें असेल, ( १५६ ) तें इष्टलिंगच दुसरें जें सूक्ष्म शरीर त्या शरीरांतील प्राणमय लिंग होय अशा गुरुमुखानें जाणून भावना करावी. ( १५७ ) त्याचप्रमाणें तें प्राणलिंगच कारण नांवाच्या शरीरांत

मिति ज्ञात्वा चेष्टलिंगं त्रिधा कृतम् ॥ १९७ ॥ महालिंगमिति ज्ञात्वा तेषु भेदं न भावयेत् ॥ इष्टलिंगं ततो धृत्वा पंचाचार्यैस्ततः परम् ॥ १९८ ॥

## प्रकरणे ॥ १५ ॥

### देव्युवाच.

भगवंस्त्वन्मुखादेव गुरोर्लिंगस्य लक्षणम् ॥ श्रुत्वा तद्वयमाहात्म्यमहं धन्याऽभवं विभो ॥ २ ॥ इदानीं चरमाहात्म्यं तच्चिन्हं तस्य गौरवम् ॥ तदाचारविधिं श्रोतुं ममेच्छा वर्तते विभो ॥ कृपया केवलं नाथ वद कारुण्यसागर ॥ ३ ॥

### ईश्वर उवाच.

सम्यक्पृष्टं त्वया गौरि साधु सन्मति मत्प्रिये ॥ वक्तुं तच्चरमाहात्म्यं कल्पकोटिशतैरपि ॥ ब्रम्हादीनां च सर्वेषामशक्यं मम तु प्रिये ॥४॥ तथापि त्वन्मुदे देवि संक्षेपेण वदाम्यहम् ॥ गोपनीयं प्रयत्नेन मंत्रवत्प्राणवल्लभे ॥ ५ ॥ जंकाराज्जननं दूरं गकाराद्गतिनाशनम् ॥ मकारान्मरणं नष्टं जंगमस्त्त्र्यक्षरात्मकः ॥६ ॥ यस्य नास्ति पुनर्जन्म गतिर्नास्ति कदाचन ॥ बाधते यं न मरणं शृणु नाथे स जंगमः ॥ ७ ॥ जरामरणशून्यत्वाद्गमागमनवर्जनात् ॥ मनुष्याचाररहित्याज्जंगमोऽयमुदाहृतः ॥ ८ ॥

---

भावलिंग होय असें भावावें. या रीतीनें तीन प्रकारांनीं भाविलें गेलेलें इष्टलिंगच ( १५८ ) महालिंग होय असें जाणून या तिन्हीं लिंगांत भेद मानूं नये. पंचाचार्यांनीं दिलेल्या अशा प्रकारच्या इष्टलिंगाचें धारण करावें.

## प्रकरण ॥ १५ ॥

देवीं ह्मणाली-( २ ) ' भगवन्, आपल्या मुखानेंच गुरूचें व लिंगाचें लक्षण आणि त्या दोहोंचें माहात्म्य ऐकून मी धन्य झाल्यें. प्रभो, ( ३ ) आतां जंगमाचें माहात्म्य, त्याचें श्रेष्ठत्व व त्याचा आचारविधि ऐकण्याची माझी इच्छा आहे. ह्मणून हे प्रभो, हे दयासागरा, हे नाथा, तें सगळें कृपा करून स्पष्ट सांगावें. ' ईश्वर ह्मणतात-‘( ४ ) शाबास प्रिये ! तूं बुद्धिमान् आहेस. गौरि, तूं चांगलें विचारिलेंस. प्रिये, ब्रह्मा वगैरे देवांना व मला तें जंगमाचें माहात्म्य कोट्यावधि कल्पांपर्यंतही सांगता येणें अशक्य आहे. ( ५ ) तथापि, हे देवी, तुझ्या संतोषाकरितां मी संक्षेपानें सांगतों. प्राणवल्लभे, मंत्राप्रमाणें हें माहात्म्य गुप्त ठेवावें. ( ६ ) ' जं ' जन्म दूर करणारा, ' ग ' संसारांत सांपडण्याची गति नाहींशी करणारा व ' म ' मरणाचा नाश करणारा. याप्रमाणें तीन अक्षरांचा मिळून जंगम शब्द झाला आहे. ( ७ ) प्रिये, ऐक. ज्याला पुनः जन्म नाहीं, ज्याला कधींही गति ( संसारांत फिरणें ) नाहीं व ज्याला मरणाची बाधा होत नाहीं, तो जंगम होय. ( ८ ) प्रपंचांतील ह्मातारपण व मरण यांच्या अभावामुळें जाणें येणें यांपासून दूर असल्यामुळें व मानवी आचारांपासून वेगळा असल्यामुळें याला जंगम ह्मणतात. ( जंगमाला

निरालंबो निर्विकल्पः कर्मपाशविवर्जितः ॥ निःशून्यो निष्कलः साक्षाज्जंगमः स परः स्मृतः ॥ ९ ॥ गुणातीतः क्रियातीतः कलातीतश्चिरंतनः ॥ तत्वातीतः परः साक्षाज्जंगमः शृणु मत्प्रिये ॥ १० ॥ निर्मोही निष्प्रियः शून्यः सत्वादिगुणवर्जितः ॥ निराभारी निष्प्रपंचः सच्चिदानंदलक्षणः ॥ ११ ॥ शुद्धदेहः शुद्धमनाः शुद्धभावः शिवात्मकः ॥ शुद्धबुद्धिः शुद्धगतिः शुद्धानां शुद्धिदायकः ॥ १२ ॥ सदसद्वस्तुरहितः सत्यासत्यविवर्जितः ॥ कर्माकर्मविनिर्मुक्तश्चरः साक्षान्निरंजनः ॥ १३ ॥ स्वयश्चरः पर इति जंगमेऽस्मिन्निरंजने ॥ अस्ति भेदत्रयं सम्यग्ज्ञातव्यं वल्लभे त्वया ॥ १४ ॥

## देव्युवाच.

स्वामिन्सत्करुणावार्धे तस्य भेदत्रयस्य च ॥ लक्षणं श्रोतुमिच्छामि वद सत्कृपया विभो ॥ १५ ॥

## ईश्वर उवाच.

साधु साधु महाभागे सम्यक्पृष्टं त्वयाऽधुना ॥ ज्ञातुं शक्यं न सर्वेषामिदं तेऽद्य वदाम्यहम् ॥ १६ ॥ अंगीकृत्य सदाचारं धृत्वा जंगमलक्षणम् ॥ ज्ञात्वा सद्धर्ममखिलं भूत्वा सज्ज्ञानवाञ्शुचिः ॥ १७ ॥ त्यक्त्वा दुष्कर्मनिचयं मुक्त्वा दौर्ज-

---

ह्मातारपण नाहीं व मरण नाहीं, प्रपंचाच्या फेऱ्यांत तो सांपडत नाहीं व मानवी आचारांपासून तो वेगळा आहे हीं लक्षणें असतात ह्मणून त्याला जंगम ह्मणतात. ) ( ९ ) जंगम हा स्वतंत्र, विकल्परहित, कर्मपाशांत न सांपडणारा, निःशून्य ( शून्या पलीकडचा व अखंड असा साक्षात् परमात्माच आहे, ( १० प्रिये, ऐक. गुणांच्या पलीकडचा, क्रियेहून वेगळा असणारा, भेदाहून अतीत, शाश्वत व तत्वापासून भिन्न असणारा, साक्षात् परमात्माच जंगम होय. ( ११ ) मोहरहित, निष्प्रिय, शून्य, सत्वादि गुणांपासून अलिप्त, निराभारी, प्रपंचापासून वेगळा राहिलेला, सत् चित् व आनंद या लक्षणांचा, ( १२ ) पवित्र शरीराचा, शुद्धमनाचा, शुद्धभावाचा, शिवस्वरूपी, शुद्धबुद्धीचा, शुद्धगतीचा, शुद्धवस्तूंना शुद्ध करणारा, ( १३ ) चांगलें व वाईट या दोहों पलीकडचा, खरें व खोटें यांपासून भिन्न असलेला व कर्म आणि अकर्म यांपासून वेगळा राहणारा हा जंगम प्रत्यक्ष निरंजन ( परमात्माच ) होय. ( १४ ) या निरंजन जंगमाचे स्वय, चर व पर, असे तीन भेद आहेत. प्रिये, ते तूं नीट समजून घे.

देवी ह्मणते—‘ ( १५ ) हे नाथा, हे दयासागरा, त्या तिन्ही भेदांचें लक्षण ऐकण्याची माझी इच्छा आहे तर प्रभो, कृपा करून तें सांगावें.

ईश्वर ह्मणतात—‘( १६ ) शाबास ! शाबास ! महाभागे, त्वां आतां चांगला प्रश्न केला. जें कोणालाही समजणें शक्य नाहीं, तें मी आज तुला सांगतों. ( १७ ) सदाचाराचा अंगीकार करून जंगमाच्या चिन्हाचें धारण करून आपला श्रेष्ठ धर्म सगळा जाणून ज्ञानी व पवित्र व्हावें. ( १८ ) सर्व वाईट कर्मांचा त्याग करावा. दुर्जनपणाचें

न्यलक्षणम् ॥ हित्वा दुष्टमतिं शास्त्रं मत्वा सद्वेदशैवकम् ॥ १८ ॥ मठमेकं समाश्रित्य कृत्वा मल्लिंगपूजनम् ॥ तत्पुरस्थितसद्भक्तगृहे भिक्षामटन्मुदा ॥१९॥ तद्भिक्षार्जितसद्द्रव्येष्वास्थां हित्वा निरंतरम् ॥ सावधानमनाः सम्यक्सत्यज्ञानपरो भवेत् ॥२०॥ गतागतेशभक्तानां चराणामौपचारकम् ॥ कुर्वन्यो वसते नित्यं स एव स्वयजंगमः ॥ २१ ॥

## अथ चरजंगमलक्षणम्.

षट्स्थलाचारसंपत्तिं धृत्वा हित्वाऽष्टदुर्मदान् ॥ षड्वर्गविक्रियां त्यक्त्वा कृत्वा षट्कर्मभंजनम् ॥ २२ ॥ षडूर्मिकचयं नीत्वा भित्वा षट्भ्रमणोन्मदम् ॥ षडक्षरमनुं जप्त्वा भूत्वा तद्वन्निरंजनः ॥ २३ ॥ पंचाक्षरमनुं ध्यात्वा पंचक्लेशान्विपाटयन् वंचयन् वंचतां सम्यग्ज्ञानं संपत्तिवैभवात् ॥ २४ ॥ मलत्रयतरुं च्छित्वा धुलीकुर्वन्मदाचलम् ॥ छिंदन्पाशाष्टकलतां भिंदन् व्यसनसप्तकम् ॥ २५ ॥ वीरमाहेश्वराचारसंपद्वृद्धिं दिने दिने ॥ पालयित्वा प्राणसमं कायवाङ्मानसैः परम् ।२६। शैवानुभावकं शास्त्रमंगीकृत्य पुराश्रयम् ॥ तदेवाखिलशिष्याणामुपदिश्य दिने दिने ॥ २७ ॥ तदन्तःस्थमलं क्षाल्य कृत्वा तानखिलान् शुचीन् ॥ तैः समं निखिलान् देशान्संचरन् शुद्धभावतः ॥ २८ ॥ तद्देशस्थमहाभक्तनिवहैः कृतपूजनम् ॥ स्वीकुर्व-

---

लक्षण टाकून द्यावें. वाईट बुद्धि सोडून वेदाचें व शैवशास्त्रांचें मनन करावें. ( १९ ) एका मठांत राहून लिंगपूजा करावी. त्या गांवांतील सद्भक्तांच्या घरीं आनंदानें भिक्षा मागावी. ( २० ) त्या भिक्षेंत मिळालेल्या द्रव्यावरील आस्था सोडून निरंतर सावधमनानें सत्यज्ञानांतच चांगलें गढून जावें. ( २१ ) आल्या गेलेल्या ईश्वरभक्तांचा आदरसत्कार करावा. या प्रमाणें जो नित्य वर्तन करीत असतो तो स्वयजंगम होय. आतां चरजंगम लक्षण ( २२ ) षट्स्थलाचाररूपी संपत्तीचें ग्रहण करून ( षट्स्थलाचारानें वागून ) आठ प्रकारचा मद टाकावा. षड्वर्गाच्या दुष्टक्रियांचा त्याग करून षट्कर्मांचा नाश करावा. ( २३ ) षडूर्मींना दूर करून व सहा प्रकारचा उन्माद नाहींसा करून षडक्षरमंत्राचा जप करावा आणि निरंजन ( उपाधिरहित ) व्हावें. ( २४ ) पंचाक्षर मंत्राचा जप करीत पांच प्रकारचा क्लेश उपटून टाकावा. सत्यज्ञानरूपी ऐश्वर्यानें मायेला फसवावें. ( २५ ) मलत्रयरूपी ( तीन प्रकारचा मळ हेंच झाड त्या झाडाला तोडून मदरूपी पर्वत फोडावा. अष्टपाशरूपी वेली छाटून सप्त व्यसनें नाहींशीं करावीं. ( २६ ) वीरमाहेश्वराच्या आचाररूपी संपत्तीचें कायावाचामनानें प्राणाप्रमाणें उत्तम रीतीनें रोज संरक्षण करावें. ( २७ ) शिवाचा महिमा ज्यांत सांगितला आहे अशा मुख्य आधारभूतशास्त्राचा अंगीकार करून त्याचाच सर्व शिष्यांना दररोज उपदेश करावा. ( २८ ) आणि त्या योगानें त्यांच्या अंतःकरणांतील मळ धुवून त्यांना शुद्ध करावें. त्यांना बरोबर घेऊन शुद्धभावानें सर्व देशांत फिरावें. ( २९ ) त्या त्या देशांतील मोठमोठ्या भक्तांनीं केलेल्या पूजेचा आनंदानें स्वीकार

न्मोदतोऽथार्थं पावयंस्तान्महाजनान् ॥ २९ ॥ कांश्चिद्दर्शनमात्रेण कांश्चिदंघ्रिसमीक्षनात् ॥ हस्तस्पर्शनतः कांश्चित्पावयन्प्राणिनोयने ( प्रणतान् जनान् ) ॥ ३० ॥ एवं रीत्या भक्तिभिक्षां स्वीकुर्वन्संचरन्सदा ॥ चरपट्टाधिकारी यः स एव चरजंगमः ॥ ३१ ॥

## पारमेश्वरतंत्रे पटले १४

अशक्तः पूजने भक्त उक्तलक्षणकर्मणि ॥ सर्वसंकल्पसिध्यर्थं ध्यायेद्गुरुपदांबुजं ॥ ८६ ॥ मंत्रमूलं गुरोर्वाक्यं पूजामूलं गुरोः पदम् ॥ ध्यानमूलं गुरोर्मूर्तिर्मोक्षमूलं गुरोः कृपा ॥ ८७ ॥ यस्त्वशक्तो मम ध्याने स ध्यायेद्गुरुमीश्वरं ॥ जपे मंत्रस्य मे देवि श्रीगुरोर्नाम संस्मरेत् ॥ ८८ ॥ सर्वमंत्रमयं दिव्यं सर्वशास्त्रमयं शुभं ॥ सर्ववेदात्मकं पुण्यं श्रीगुरोर्नाम मंगलं ॥ ८९ ॥ यदा साक्षाद्गुरोरूपं भक्तः पश्यति पुण्यवान् ॥ तदेव मम देवेशि साक्षाद्दर्शनमुत्तमं ॥ ९० ॥ तस्मात्स्वर्गापवर्गेच्छुरिह भोगेच्छुरास्तिकः ॥ सर्वदा सर्वयत्नेन गुरुदेवं समाश्रयेत् ॥९१॥ सर्वे वेदाश्च शास्त्राणि पुराणानि च संहिताः॥ स्मृतयो धर्मशास्त्राणि श्रीगुरोर्वचनं परं॥९२॥ गुकारोऽधंतमः

---

करून त्या महाभक्तांना पावन करावें. (३०) कोणांला दर्शनानेंच, कोणांला त्यांनीं केलेल्या नमस्कारानें, व कोणांला हस्तस्पर्शानें याप्रमाणें शरण आलेल्या प्राण्याला पावन करावें- (३१) या रीतीनें भक्तिभिक्षेचा अंगिकार करीत नेहमीं संचार करणारा जो चरपट्टाधिकारी तोच चरजंगम होय.'

## पारमेश्वरतंत्र पटल १४

(८६) मागें सांगितलेल्या लक्षणांनीं कर्में करण्यास अशक्त असल्यास व लिंगपूजा करण्यास असमर्थ असेल, तर सर्व मनोरथ पूर्ण होण्याकरितां गुरुपादारविंदाचें ध्यान करावें. (८७) गुरूचें नांव मंत्रांचें बीज आहे, गुरूचे पाय पूजेचें मूळबीज आहेत, गुरूची मूर्ति ध्यानाचें बीज आहे, गुरूची कृपा मोक्षाचें मूळबीज आहे. (८८) माझें ध्यान करण्यास असमर्थ असेल तर त्यानें गुरूचें ध्यान करावें. हे देवी, माझ्या मंत्राचा जप करावा, आणि श्रीगुरूचें स्मरण करावें. (८९) श्रीगुरूचें नाम सर्व मंत्रांनीं, सर्व शास्त्रांनीं आणि सर्व वेदांनीं भरलें असून परम मंगलकर आणि पवित्र आहे. (९०) ज्या वेळेस माझा पुण्यवान् भक्त श्रीगुरूच्या रूपाला पाहतो, हे देवी, तेव्हांच माझ्या प्रत्यक्ष दर्शनाचें उत्तम फळ घेतो. (त्याला माझें प्रत्यक्ष दर्शन झाल्यासारखें आहे. (९१) स्वर्गाची इच्छा करणारा, मोक्षाची इच्छा करणारा, ऐहिक भोगाची इच्छा करणारा असा आस्तिक कोणी असो, त्यानें मागच्या सर्व इच्छा पूर्ण होण्याकरितां प्रयत्नपूर्वक गुरुदेवाचा आश्रय करावा. (९२) सर्व वेद, शास्त्र, पुराण, संहिता, स्मृति, धर्मशास्त्र हीं सर्व गुरूचीं वचनेंच होत. (९३) गुकार ह्मणजे

प्रोक्तं रुकारो भास्करोदयः ॥ मोहांधकारहरणाद्गुरुरित्यभिधीयते ॥ ९३ ॥ सप्तकोटिमहामंत्राश्चित्तविभ्रमकारकाः ॥ एक एव महामंत्रो गुरुरित्यक्षरद्वयं ॥ ९४ ॥ द्वावेव मंत्रौ देवेशि सर्वेषामपि मुक्तये ॥ सर्वक्लेशविनाशाय तौ गुर्विति शिवेति च ॥ ९५ ॥ भावयेत्सततं धीमान् जगदेतच्चराचरं ॥ इंद्रियोपगतं यद्यत् श्रीगुरो रूपमैश्वरं ॥ ९६ ॥ गुरुयात्रा सदा काशीयात्रा तस्य प्रदक्षिणं ॥ भूमिप्रदक्षिणं धत्ते दर्शनं मम सुव्रते ॥ ९७ ॥ इत्येत्कथितं देवि सर्वसारमनुत्तमं ॥ रहस्यमात्मरक्षार्थं किं भूयः श्रोतुमिच्छसि ॥ ९८ ॥

## पारमेश्वरतंत्रे पटले १५

ईश्वर उवाच—साधु साधु समीचीनः प्रश्नोऽस्ति भुवनेश्वरि ॥ लोकोपकाराय कृतः शृणु वक्ष्यामि कृत्स्नशः ॥ १५ ॥ यदि त्वयात्र देवेशि न कृतः प्रश्न ईदृशः ॥ भ्रश्येयुर्वीरशैवस्थाः रहस्याच्चाविवेकतः ॥ १६ ॥ रहस्यं विदितं देवि त्वया परममंगले ॥ अद्य त्वयोद्धृताः सर्वे वीरशैवमतेश्वराः ॥ १७ ॥ अन्यदैवांधकूपेषु पतंति कुधियः शिवे ॥ अज्ञात्वा मन्मते सारं रहस्यं परमार्थतः ॥ १८ ॥ वीरशैवमहा-

---

अंधार, रुकार ह्मणजे सूर्योदय असा गुरु शब्दाचा अर्थ आहे. तात्पर्य हें आहे कीं, मोहरूपी अंधकारांतून पार करणारा गुरु आहे. असें शास्त्रांत सांगितलें आहे. ( ९४ ) सातकोटी महामंत्र असून ते चित्त भ्रष्ट करणारे आहेत. एक श्रेष्ठ मंत्र गुरु ही दोन अक्षरें होत. ( ९५ ) हे देवि, मुक्ति देणारा आणि, सर्व दुःख हरण करणारा असे मंत्र दोनच आहेत. गुरु हा मंत्र एक, आणि दुसरा शिवमहामंत्र होय. ( ९६ ) बुद्धिमानानें जीवजडात्मक जग हें श्रीगुरूच्या रूपानें भरलें आहे अशी भावना करावी, व इंद्रियांना गोचर होणारे सर्व गुरूचें रूप ह्मणून समजावें. ( ९७ ) श्रीगुरूजवळ जाणें हीच एक काशीची यात्रा, गुरूची प्रदक्षिणाच भूमीची प्रदक्षिणा, होय. हे साध्वि, गुरूचें दर्शनच माझें दर्शन ह्मणून समज. ( ९८ ) हे देवि तुला उत्तम, सर्व सार सांगितलें हें तुझ्या आत्मसंरक्षणाकरितां उपयोगीं पडेल. आणखी काय ऐकण्याची तुझी इच्छा आहे ? सांग.

## पारमेश्वरतंत्र पटल १५

ईश्वर बोलतात— ( १५ ) हे पार्वति, फार उत्तम आहे, तुझा प्रश्न फार चांगला आहे, कारण तूं लोकांच्या कल्याणाकरितां हा प्रश्न केलास, तर तुला सांगतों ऐक. ( १६ ) हे देवी त्वां असा प्रश्न केला नसतास, वीरशैव लोक अविवेकानें रहस्यापासून खचित मुकत होते. ( १७ ) हे सुंदरि, रहस्य तर तुला ठाऊकच आहे, पण आज वीरशैव लोकांचा उद्धार करण्याकरितां तूं मला हा प्रश्न केलास. ( १८ ) हे पार्वति, माझ्या वीरशैवमतांतील तात्पर्य न समजल्यामुळें दुसऱ्या देवतांच्या भक्तिरूप अंधकूपांत हे अज्ञान लोक पडले आहेत. ( १९ ) ते अज्ञान लोक त्यांतून निघण्याकरितां वीरशैवम-

शूलखातेन पतिता अमी ॥ देवि त्वत्प्रश्ननिश्रेणिप्रोद्धृताः सुखमद्य ते ॥ १९ ॥ यदा जालगतः पक्षी निर्गंतुं जालसंभ्रतः ॥ बहिर्द्वारमजानानो म्रियते यो यथा शिवे ।२०। वीरभेदा न विज्ञेया हठाद्वीरमहान्हदे ॥ निपत्य दुःखं क्लिश्यंति शून्यकूपगता इव ॥ २१ ॥ न साधु बहु सेवंते गुरुं मद्रूपिणं शिवे ॥ न जानंति ततः साधु पृष्ट्वा मतरहस्यकं ॥ २२ ॥ नाल्पज्ञः पारमन्वेति नाल्पज्ञः सुखमेधते ॥ न लज्जेद्गुरुसेवायां नाल्पज्ञश्चाप्यपृच्छतः ॥ २३ ॥ प्राणार्थमानवस्तुभिर्गुरुशुश्रूषणोत्सुकः ॥ साधयेदात्मनोऽभीष्टं गुरोरेव मदात्मकः ॥ २४ ॥ किंचिज्ज्ञा दांभिका भ्रष्टा गुरुरस्म्यभिमानिनः ॥ वीरशैवं न जानंति शठाः पंडितमानिनः ॥ २५ ॥ अन्यस्मै बोधयंति स्म सर्वज्ञत्वं परं खलाः ॥ नाचरंति स्वयं किंचिदधस्ते निपतंति हि ॥ २६ ॥ ततः स मद्गुरुमुखाच्छास्त्रमूलं विचारयेत् ॥ न विशेदप्रमत्तोऽथ ह्यवीक्ष्यात्मबलाबले ॥ २७ ॥

## पारमेश्वरतंत्रे पटले १७

शिवार्पितात्मा सततं न तेन सदृशः क्वचित् ॥ भस्मच्छन्नः स एवाहं महापातक-

---

तरूप शूलाचा मार्ग आहे त्यांत तुझा प्रश्न तर शिडीसारखा झाल्यामुळें ते अज्ञान लोक त्या दुःखांतून मुक्त होऊन सुखानें राहतात. ( २० ) हे देवि, एखादा पक्षी जाळ्यामध्यें सांपडून बाहेर येण्याकरितां यत्न करतो, परंतु, त्याला बाहेरचें दार ठाऊक नसल्यामुळें तेथेंच पडून जसा मरतो, ( २१ ) तसें वीरशैवांतले भेद न समजून दुराग्रहानें वीरशैवरूपी मोठ्या डोहांत पडून अंध व शून्य कूपांत पडलेल्या लोकांप्रमाणें दुःख भोगतात. ( २२ ) हे पार्वति, माझें रूप जो गुरु त्याची सेवा जे चांगल्या रीतीनें करीत नाहींत, माझ्या मतांतलें रहस्य गुरूला प्रश्न करून जे चांगल्या रीतीनें समजून घेत नाहींत त्यामुळें ते ( २३ ) अल्पज्ञानी लोक पार पडत नाहींत. अल्पज्ञानी मनुष्य सुख भोगीत नाहीं ह्यासाठीं गुरूच्या सेवेविषयीं लाजूं नये. प्रश्न केला नाहीं तर आपणांस कांहीं समजणार नाहीं; करितां गुरूस प्रश्न करून आपणास जें समजत नसेल तें माहीत करून घ्यावें. ( २४ ) माझी भक्ति करणाऱ्यानें प्राण खर्च करून, द्रव्य खर्च करून, अभिमान सोडून आणि पाहिजे तें करावें लागलें तरी करून गुरूची सेवा मनापासून करावी आणि आपलें कल्याण करून घ्यावें. ( २५ ) अल्पज्ञानी लोक, दांभिक, भ्रष्ट लोक मी गुरु आहे अशा अभिमानानें शठ पंडितंमन्य लोक वीरशैवमताला मानीत ( जाणत ) नाहींत ( २६ ) ते खल लोक दुसऱ्याला सर्वज्ञत्वाचा बोध मात्र करतात, परंतु स्वतः कांहीं आचार करीत नाहींत, असे लोक खालीं पडणारच. ( २७ ) ह्मणून सद्गुरूच्या तोंडून ( कडून ) शिष्यानें शास्त्राचें मूल समजावून घ्यावें. उगीच आपलें बलाबल विचार न करितां मदांध होऊन राहूं नये.

## पारमेश्वरतंत्र पटल १७

( ५६ ) ह्याप्रमाणें निरंतर आपल्या आत्म्याला शिवाचें स्वाधीन करून जो

वानपि॥५६॥ पापैर्विमुच्यते सद्यो मुच्यते च भवार्णवात्॥ रुद्राग्नेर्यत्परं वीर्यं तद्भस्म परिकीर्तितं ॥ ५७ ॥ तस्मात्सर्वेषु कालेषु वीर्यवान् भस्मसंयुतः ॥ भस्मसंदिग्ध-सर्वांगो भस्मदीप्तत्रिपुंड्रकः ॥ ५८ ॥ भस्मशायी च पुरुषो भस्मनिष्ठ इति स्मृतः ॥ भूतप्रेतपिशाचाद्या रोगाश्चातीवदुःसहाः ॥ ५९ ॥ भस्मनिष्ठस्य सान्निध्याद्विद्रवंति दिशो दश ॥ भासनाद्भसितं प्रोक्तं भस्म कल्मषभक्षणात् ॥ ६० ॥ भूतिर्भूतिकरी यस्माद्रक्षा रक्षकरी यतः ॥ किमत्र बहुनोक्तेन भस्ममाहात्म्यकारणात् ॥ ६१ ॥ व्रती च भस्मना स्नाति सोऽहमेव न संशयः ॥ परमास्त्रं च देवानां भस्मैतदहमेव हि ॥ ६२ ॥ रुद्राक्षमालाभरणो भाले भस्मत्रिपुंड्रकं ॥ मुखे मंत्रो गले लिंगं वीरमाहे-श्वरः शिवः ॥ ६३ ॥ जटी मुंडी शिखी वापि कीर्णकेशो दिगंबरः ॥ भाले भस्म गले लिंगं रुद्राक्षाभरणान्वितः ॥ ६४ ॥ शिवपंचाक्षरीयुक्तः सोऽहमेव महेश्वरि ॥ वशी काषायवस्त्रो निर्लज्जश्च दिगंबरः ॥ ६५ वल्कली वा भवेद्दंडी कुंडी कौपीन-पात्रवान् ॥ यत्र यत्र मनो याति स तत्र विहरेत्सुखं ॥ ६६ ॥ यत्र यत्र मनोरम्यमठे

---

वागतो, त्याच्या सारखा श्रेष्ठ कोणी नाहीं. भस्मानें आच्छादित असणारा महापातकी जरी असला तरी तो मीच होय असें समज. ( ५७ ) तो तात्काळ पापापासून मुक्त होतो व संसार समुद्रांतून पार पडतो. रुद्राग्नीचें जें सामर्थ्य असतें तेंच सामर्थ्य भस्माचें आहे असें जाणावें. ( ५८ ) सर्वकाळ भस्म लावल्यामुळें ज्याला सामर्थ्य आलें आहे, भस्म लावल्या-मुळें ज्याचे अवयव अस्पष्ट दिसतात, व ज्याच्या कपाळावर ढळढळीत त्रिपुंड्र दिसतात, ( ५९ ) जो भस्मावरच निजतो, अशा पुरुषाला भस्मनिष्ठ असें ह्मणतात. भूत, प्रेत, पिशाच वगैरे, अत्यंत दुःसह रोग, ( ६० ) भस्मनिष्ठाच्या जवळून दूर दाहीदिशेकडे पळत सुटतात. ( भस्मधारण करणारांस भूत प्रेत पिशाचांची किंवा रोगाची बाधा होत नाहीं ) भस्म प्रकाश करणारें आहे ह्मणून त्याला भसित असें ह्मणतात. तें सर्व पातकांचे भस्म करितें ह्मणून त्याला भस्म असें यथार्थ नांव मिळालें आहे ( ६१ ) भस्म ऐश्वर्य देणारें आहे ह्मणून त्याला भूति असें ह्मणतात. भस्म रक्षण करितें ह्मणून त्याला रक्षा ह्मणतात. फार सांगून काय उपयोग ? भस्मामध्यें सामर्थ्य असल्याकारणानें ( ६२ ) ब्रह्म-चारी भस्मानें स्नान करील तर तो ब्रह्मचारी मीच आहें, ह्यांत संशय नाहीं. देवादिकांचे श्रेष्ठ अस्त्र ह्मणजे भस्मच. तें भस्म मीच आहें. ( ६३ ) रुद्राक्ष गळ्यांत घालून भस्माचें त्रिपुंड्र धारण करून तोंडानें मंत्र ह्मणतो व ज्याच्या गळ्यांत लिंग आहे, असा तो साक्षात् वीरमाहेश्वर शिवच होय. ( ६४ ) जटी, मुंडी, शिखी केस पसरलेला दिगंबर असा मनुष्य कपाळावर भस्म, गळ्यांत लिंग धारण करून रुद्राक्षानें सुशोभित होऊन (६५) शि-वपंचाक्षराचा जप करतो, तो मीच होय. जो इंद्रियनिग्रहवान् असतो तो भगवें वस्त्र नेसतो किंवा दिगंबर होऊन निर्लज्ज्यासारखा फिरतो. ( ६६ ) तो वल्कल नेसून दंड घेऊन व कुंडपात्र हातांत घेऊन लंगोटी घालून जिकडे मन जातें तिकडे सुखानें फिरतो. (६७) जेथें

वा मंडपेऽपि वा ॥ वने वा सुखासीनः शुद्धवस्त्रसमावृतः ॥ ६७ ॥ पाणौ लिंगं प्रतिष्ठाप्य पाणिमंत्रेण मंत्रितं ॥ लिंगं शुद्धजलैः स्नाप्य शिवपंचाक्षरं जपेत् ॥ ६८ हस्ते पद्मं च संभाव्य तन्मध्ये पूजयेच्छिवं ॥ देवीं च लिंगनाले तु ध्यात्वा पुष्पाक्षतादिभिः ॥ ६९ ॥ पूजयेद्योगवान्सम्यक् षोडशैरुपचारकैः ॥ पूर्वोक्तेनैव संपूज्य क्षीरतोयैः शनैरपि ॥ ७० ॥ निवेद्य भक्तिसंयुक्तो विरक्त्या वीरशैविनः ॥ त्रियंबकेन मंत्रेण धारयेद्भक्तिपूर्वकं ॥ ७१ ॥ एवं पूजां च निर्वर्त्य भिक्षाटनमथाचरेत् ॥ भिक्षाहारी निराहारी भिक्षान्नं न प्रतिग्रहः ॥ ७२ ॥ नित्यं भिक्षान्नभोजी च ह्युपवासफलं लभेत् ॥ प्रत्यहं चंद्रवारे वा कंथादंडसमन्वितः ॥ ७३ ॥ घंटो वा जयघंटो वा दंडघंटादिसंयुतः ॥ प्रेरयित्वा रवैर्भक्तं येन केनापि शब्दतः ॥७४॥ विरक्तमागतं ज्ञात्वा गृही चान्नजलादिभिः ॥ नमस्कृत्वादराद्दद्याच्छिव एवागतः स्वयं ॥ ७५ ॥ तस्यान्नं भक्तिसंयुक्तो दद्याच्छंकररूपिणः ॥ एवं पूर्वाण्हकाले तु विचरेद्वीरशैवकः ॥ ७६ ॥ वीरशैवमतं देवि देहपातांतमाचरेत् ॥ कृत्यमित्येव निष्कामो यश्चरेद्वीरशैवकः ॥७७॥ ममार्पितात्मा सततं न तेन सदृशः क्वचित् ॥ दिवा भिक्षा-

---

जेथें त्याचें मन जातें तेथें तेथें तो जातो मग तो सुशोभित मंडप असो किंवा मठ असो किंवा अरण्य असो त्यांत तो निर्मळ वस्त्र नेसून सुखानें जाऊन वसतो. ( ६८ ) तो हातांत लिंग घेऊन पाणिमंत्रानें अभिमंत्रण करून शुद्धोदकानें लिंगाचा अभिषेक करून शिवपंचाक्षराचा जप करतो, ) ६९ ) हातांत कमलाची भावना करून त्यामध्यें शिवाची पूजा करावी. लिंगाच्या नाभीमध्यें देवीची भावना करून पुष्पाक्षतादिकांनीं (७०) पूजा करावी. शिवयोग्यानें षोडशोपचार पूजा करून पूर्वोक्त विधीनें दूध उदक वगैरे भक्ष्य पदार्थांनीं ( ७१ ) नैवेद्य दाखवून भक्तियुक्त होऊन वैराग्य घेऊन वीरशैवानें त्र्यंबक या मंत्रानें भक्तिपूर्वक भस्मधारण करावें. ( ७२ ) याप्रमाणें पूजा आटोपून मग भिक्षेकरितां जावें. भिक्षाहारीलाच निराहारी ह्मणतात. भिक्षान्न हें प्रतिग्रह होत नाहीं. ( ७३ ) भिक्षान्न नित्य जेवणाऱ्याला उपवासाचें फळ मिळतें. प्रतिदिवशीं किंवा सोमवारीं कफनी घालून हातांत दंड घेऊन, ( ७४ ) घांट वाजवून किंवा जयघंटा अथवा दंडघंटा तरी वाजवून किंवा मोठ्या शब्दानें ओरडून भक्ताला अनेक शब्दांनीं खूण करावी. ( ७५ ) विरक्त आलेला पाहून गृहस्थानें अन्नपाणी इत्यादिकानें नमस्कारपूर्वक त्याची पूजा करावी. व आपल्या घरीं प्रत्यक्ष शिवच आला आहे ह्मणून समजावें ( ७६ ) त्या शंकरस्वरूपी विरक्ताला अन्न भक्तिपूर्वक द्यावें. याप्रमाणें जंगमानें सकाळीं भिक्षेकरितां फिरावें. ( ७७ वीरशैवमत देह पडेपर्यंत पाळावें. माझें काम इतकेंच आहे असें समजून निरभिलाप होऊन पृथ्वीवर जो फिरतो, ( ७८ ) तो मला आत्मा अर्पण करून फिरणारा वीरशैव फार श्रेष्ठ आहे, त्याच्या बरोबरीचा दुसरा कोठेंही मिळणार नाहीं. दिवसास भि-

शनं चैव सदा लिंगार्चनं तथा ॥ ७८ ॥ वीरमाहेश्वराणां तु हीदमेव विशिष्यते सायान्हे लिंगपूजा तु शिवपंचाक्षरीजपः ॥ ७९ ॥ शिवलीलाकथालापः स वै माहेश्वरोत्तमः ॥ शिवार्थं देहसंशोपस्तपः कृच्छ्रादि नो मतं ॥ ८० ॥ शिवार्चाकर्म विज्ञेयं बाह्यं यागादि नोच्यते ॥ जपः पंचाक्षराभ्यासः प्रणवाभ्यास एव वा ॥८१॥ रुद्राध्यायादिकाभ्यासो न चान्याध्ययनादिकं ॥ ध्यानं शिवस्य रूपादिचिंता ह्यात्मादिचिंतनं ॥ ८२ ॥ य एवं वर्तते योगी स वै माहेश्वरोत्तमः ॥ अष्टधा लक्षणं देवि शिवधर्माधिकारिणः ॥ ८३ ॥ शिवभक्तेषु वात्सल्यं पूजायां चानुमोदनं ॥ स्वयमभ्यर्चनं चैव तदर्थं चांगचेष्टनं ॥ ८४ ॥ तत्कथाश्रवणे भक्तिः स्वरनेत्रांगविक्रियाः ॥ शिवानुस्मरणं नित्यं सर्वदा तदकैतवं ॥ ८५ ॥ एतदष्टगुणं चिन्हं यस्मिन् म्लेंछेऽपि दृश्यते ॥ स एवातिप्रियो भक्तो मम योगी स एव हि ॥ ८६ ॥ इति ते कथितं देवि कार्यकर्मानुवर्तिनां ॥ शिवाश्रमयुतानां च किं भूयः श्रोतुमिच्छसि ॥८७॥

## पारमेश्वरतंत्रे पटले २२

अनाचारोऽपि वाचारवृत्तिः शुद्धापि वा नवा ॥ सुजनो दुर्जनो वापि मद्भ-

---

क्षान्न भक्षण करून सदा लिंगार्चन करणें हेंच विरक्ताचें मुख्य कर्तव्य आहे. तसेंच ( ७९ ) वीरमाहेश्वरांनाही हाच विधि श्रेष्ठ ह्मणून वर्णिला आहे. सायंकाळीं लिंगपूजा करून शिवपंचाक्षराचा जप करावा. ( ८० ) शिवलीलेच्या गोष्टी सांगाव्या, त्यांतलें भापण श्रवण करावें त्याला माहेश्वरश्रेष्ठ असें ह्मणतात. शिवकार्यासाठीं देह झिजविण्यास तप ह्मणतात. कृच्छ्र चांद्रायण वगैरेनें देह शुष्क करण्यास तप ह्मणत नाहींत. ( ८१ ) शिवाची अर्चा हें एक काम ह्मणून समजावें. यज्ञयागादिकांस कर्म ह्मणत नाहींत, शिवपंचाक्षरी मंत्राचा किंवा ॐकाराचा अभ्यास करणें ह्याला जप ह्मणतात. ( ८२ ) रुद्राध्यायाचा अभ्यास वगैरे करावा. दुसऱ्या ग्रंथाचें अध्ययन करूं नये. शिवाचें ध्यान, शिवरूपचिंतन, शिवात्मैक्यचिंतन ( शिव मीच आहें असें समजणें ) हें नित्य करावें. ( ८३ ) याप्रमाणें वर्तन करणारा तोच माहेश्वरोत्तम होय, हे देवि, शिवधर्माधिकाऱ्याचीं लक्षणें आठ प्रकारचीं आहेत. ( ८४ ) तीं अशीं:–शिवभक्ताविपयीं वात्सल्य, त्यांच्या पूजेविषयीं अनुमोदन, ( संमति ) स्वतः पूजा करणें, पूजेकरितां अंगचेष्टा दाखविणें, ( ८५ ) त्याच्या कथा ऐकण्याविषयीं आवड करणें, त्या ऐकण्याकरितां स्वर, नेत्र, अंग इत्यादिकानें सूचना करणें, निरंतर स्मरण करणें, सर्वदा त्याच्याविपयीं कपट न करणें, ( ८६ ) हीं आठ लक्षणें जरी यवनाच्या अंगांत असलीं तरी तो यवन माझा प्रियभक्त होय. त्यास शिवयोगी ह्मणावें. ( ८७ ) हे देवि, शिवधर्मास अनुसरणाऱ्या शिवाश्रमीं लोकांचें रहस्य तुला सांगितलें. आतां काय ऐकण्याची इच्छा आहे ? ती सांग.

## पारमेश्वरतंत्र पटल २२

( ५ ) मनुष्य दुराचारी असो, किंवा सदाचारी असो, शुद्ध असो किंवा पातकी

क्त्या पदमुत्तरेत् ॥ ५ ॥ भक्तः सर्वोत्तमो देवि निरपेक्षो ह्यकिंचनः ॥ अप्युत्कटेभ्यः कर्मभ्यो महदादिभ्य एव च ॥ ६ ॥ यथा नदीषु मंदाकिन्यमरेषु शचीपतिः ॥ भवती गिरिजा स्त्रीषु पुरुषेष्वहमीश्वरः ॥ ७ ॥ सर्वासां मद्विभूतीनां भक्त एव तथा वरः ॥ तं बिभेमि कुतश्चापि यथा भक्तादहं प्रिये ॥ ८ ॥

## अनादिवीरशैवसारसंग्रहे प्रकरणे १

परमरहस्ये ॥ सर्वसंसारसौख्यानि त्यक्त्वा चित्तं शिवे लयेत् ॥ दण्डकौपीनकाषायजटावल्कलधारकः ॥ ३२७ ॥ मुंडी वा शिवचिन्हानि धारयेदजिनादिकम् ॥ भिक्षाशी नियताहारो सुखसंसारवर्जितः ॥ निराभार इति ज्ञेयः स एव परमः शिवः ॥ ३२८ ॥ यजुर्वेदे ॥ अस्मान्सखा प्रतरणः स वीरः ॥ ३२९ ॥ वीरागमे सर्वेषामपि शैवानां वीरशैवं महोत्तमम् ॥ सुलभा देवपूजा च सुलभं च क्रियावहम् ॥ ३३० ॥ सुलभं देवपूजायाः सुलभं च क्रिया बहु ॥ स्वल्पक्रिया बहुफलं वीरशैवं

---

असो, सज्जन असो किंवा दुर्जन असो, माझ्या भक्तीमुळें तो संकटांतून निभावून जातो. ( ६ ) हे पार्वति, अतिशय साहसाचीं व खर्चाचीं मोठमोठीं कामें करणाऱ्या लोकांपेक्षां दरिद्री असून निरिच्छ असणारा माझा भक्त श्रेष्ठ आहे. ( ७ ) जशी सर्व नद्यामध्यें गंगा नदी श्रेष्ठ आहे, जसा सर्व देवांत इंद्र श्रेष्ठ आहे, जशी सर्व स्त्रियांत पार्वती तूं श्रेष्ठ आहेस, जसा सर्व पुरुषांत मी श्रेष्ठ आहें, ( ८ ) तशा सर्व प्रकारच्या माझ्या विभूतींमध्यें, माझा भक्तच श्रेष्ठ आहे. तो कोठें असला तरी मी त्याचें रक्षण करितों ( त्याला भितों ) पार्वति, जसा मी भक्तांस भितों तसा इतरांस भीत नाहीं.

## अनादिवीरशैवसारसंग्रह प्रकरण १

( ३२७ ) परमरहस्यांत—संसारांतील सर्व प्रकारचीं सुखें सोडून देऊन शिवाचें ठिकाणीं आपलें लक्ष्य लावितो, दण्ड, कौपीन, भगवें जटा आणि झाडांच्या साली वस्त्राकरितां जवळ बाळगितो. ( ३२८ ) मस्तकाचें मुण्डन करून वर सांगितलेलीं शिव चिन्हें आणि वाघाचें व हरणाचें कातडें जवळ बाळगितो. भिक्षा मागून उदरनिर्वाह करितो आणि जेवण झालें तरी फक्त श्वासोच्छ्वास चालून प्राण रक्षण होईल इतक्याच बेताचें जेवतों. संसारांतील विषयोपभोगाचीं सर्व सुखें सोडून देतो त्याला निराभार ह्मणावें तो प्रत्यक्ष श्रेष्ठ शिवच होय. ( ३२९ ) यजुर्वेदांत—हा तो वीरभगवान् आमचा मित्र असून आह्मांस संसारसमुद्रांतून तारणारा आहे. ( ३३० ) वीरागमांत असें सांगितलें आहे कीं, शैवांत जितके कांहीं भेद आहेत त्या सर्वांपेक्षां वीरशैव हा भेद उत्तम आहे. वीरशैव मतांतील देवपूजा अगदीं सोपी असून क्रियाही फार सोपी आहे. ( ३३१ ) देवपूजा सोपी असून देवपूजेची क्रियाही फार सोपी आहे शिव ह्मणतात—पार्वति, वीरशैवमतांत पूजा फारच थोडी असून तिचें फळ मात्र सर्व मतांच्या पूजेच्या फळापेक्षां अधिक

महेश्वरि ॥ ३३१ ॥ उत्तरवातुले ॥ फलाधिकं क्रिया सूक्ष्मं वीरशैवं तु कथ्यते अन्यशैवं तु तत्सर्वं फलमल्पं क्रिया बहु ॥ ३३२ ॥ वृत्तम् ॥ शुद्धं समस्तेंद्रियशर्मदं च स्वल्पप्रयासात्फलवृद्धिदं च ॥ मोक्षप्रदं चैहिकसौख्यदं च सर्वोत्तमं शांकरकर्म सत्यम् ॥ ३३३ ॥ वीरागमे ॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन वीरमाहेश्वरं शुभम् ॥ जीवन्मुक्तः स विज्ञेयो वीरमाहेश्वरः पुमान् ॥ ३३४ ॥ सत्यं वक्ष्यामि हे वत्स शिवलिंगार्चनक्रमम् ॥ संसारदुःखरोगस्य भेषजं मुक्तिसाधनम् ॥ ३३५ ॥ नित्यं वेदितशैवैश्च सेव्यते लिंगसेवितम् ॥ तत्वार्थैर्वीरशैवैश्च सेव्यते चरसेवितम् ॥ ३३६ ॥ शंकरसंहितायाम् ॥ वृत्तम् ॥ यो हस्तपीठे निजलिंगमिष्टं विन्यस्य तल्लीनमनः प्रचारः ॥ बाह्यक्रियासंकुलनिस्पृहात्मा संपूजयत्यंग स वीरशैवः ॥ ३३७ ॥

## अनादिवीरशैवसारसंग्रहे प्रकरणे ३

वीरागमे ॥ देव्युवाच—जंगमस्य च माहात्म्यं वर्णितं तत्वतस्त्वया ॥ किमिदं तस्य माहात्म्यं ज्ञातुमिच्छामि शंकर ॥ २ ॥

---

आहे. ( ३३२ ) उत्तरवातुलांत असें सांगितलें आहे कीं, वीरशैव मतांत क्रिया फार थोडी असून त्या पूजेचें फळ मात्र सर्वांहून जास्त आहे. वीरशैवाखेरीज इतर जे शैवमताचे भेद आहेत त्या सर्वांत क्रिया फार असून त्यामानानें क्रियेचें फळ फारच थोडें आहे ( ३३३ ) हें शांकरकर्म ( वीरशैव व्रत ) फार निर्दोष आहे, सर्व इंद्रियांस त्यापासून सुख होतें. ह्या मतांत व्रत, नियम वगैरे प्रयासाचीं कामें फारच थोडीं असून त्या श्रमाचें फळ आणि वृद्धि ही मात्र फारच जास्त आहेत. हें व्रत मोक्षप्राप्तीचें साधन असून ह्या लोकींचीं सर्व सुखें देखील ह्या व्रतानें मिळतात. वीरशैवमत सर्व व्रतापेक्षां श्रेष्ठ आहे हें अगदीं खरें आहे. ( ३३४ ) वीरागमांत असें सांगितलें आहे कीं, ह्यासाठीं हरतऱ्हेनें हें वीरमाहेश्वर व्रत पाळावें हें फार कल्याणकारक आहे. वीरमाहेश्वर व्रत पाळणारा पुरुष जीवन्मुक्त आहे असें समजावें. ( ३३५ ) शंकर ह्मणतात—मुला षडानना, मी तुला खरोखर सांगतों. शिवलिंगपूजनाचा प्रकार संसारांतील दुःखरूप रोगाला औषधासारखा असून मोक्षप्राप्ती करून देणारा आहे. ( ३३६ ) नित्यवेदितशैव लिंगसेविताची सेवा करितात. यथार्थ तत्व जाणणारे वीरशैव चरसेविताची सेवा करितात. ( ३३७ ) शंकरसंहितेंत असें ह्मटलें आहे कीं, जो कोणी मनुष्य आपल्या हस्तरूपी पीठावर ( सिंहासनावर ) आपलें इष्टलिंग ठेऊन आपल्या सर्व चित्तवृत्ति लिंगस्वरूपाकडे लावून बाहेरील इतर कामधंद्यामुळें व्यग्र झालेलें आपलें मन स्थिर करून व विषयसुखाविषयीं निरिच्छ होऊन लिंगपूजा करितो त्यास वीरशैव असें ह्मणावें.

## अनादिवीरशैवसारसंग्रह प्रकरण ३

वीरागमांत पार्वतीनें ह्मटलें आहे कीं ( २ ) हे परमेश्वरा सदाशिवा, तूं जंगमाचें

ईश्वर उवाच—शृणु देवि प्रयत्नेन तेषां च महिमाव्ययम् ॥ समुद्रवालुकश्चैव गणितुं शक्यते न हि ॥ ३ ॥ उपनिषदि ॥ वृत्तम् ॥ निर्नामं निरवग्रहं निराश्रयं निष्कारण्यं निष्कलं निस्संगं निरुपाधिकं निरुपमं निष्प्रक्रियं निश्चलम् ॥ निष्पुण्यं निरनुग्रहं निराविघ्नं निर्वासनं निर्वेद्यं निर्भेद्यं निरघं निरंजनपदं चैतज्जवेज्जंगमम् ॥४॥ ब्रह्मबिंदूपनिषदि ॥ सदैव निष्कलं ब्रह्म निर्विकल्पं निरंजनम् ॥५॥ परमरहस्ये ॥ निराकारं निरालंबं निराकुलनिरंजनम् ॥ निष्पदं निष्प्रकाशं च ज्ञेयं जंगमलक्षणम् ॥ ६ ॥ गोरक्षसंहितायाम् ॥ महानादं महाबिंदु महाशून्यं तु जंगमम् ॥ महाशून्यमिदं सर्वमादिनाथं तु जंगमम् ॥ ७ ॥ वीरागमे ॥ आदिमध्यान्तशून्यश्च

---

माहात्म्य यथार्थ रीतीनें सांगितलें हें खरें तरी पण जंगमाचें माहात्म्य काय आहे हें ऐकण्याची माझी इच्छा आहे.

शंकर म्हणाले—( ३ ) पार्वति, तें जंगमाचें माहात्म्य मी तुला सांगतों तूं नीट लक्ष देऊन ऐक. जंगमाचा महिमा अविनाशी आहे, जशी समुद्रांतील वाळु मोजतां येत नाहीं तसाच जंगमाचा महिमा यथार्थरीतीनें सांगतां येणार नाहीं. ( ४ ) जंगमाला नांव नाहीं, त्याला कोणतीही बाधा नाहीं, त्याला खाण्यापिण्याची जरूर नाहीं, त्याला कारण नाहीं, त्याला प्रपंच नाहीं, त्याला संगतीची अवश्यकता नाहीं, त्याला कोणत्याहि रीतीची उपाधि नाहीं, त्याची बरोबरी करील असा जगांत दुसरा पदार्थ नाहीं, त्याला कोणसाही युक्तीचा व्यवसाय करावा लागत नाहीं, त्याला चलनवलन ( हलणें चालणें ) नाहीं, त्याला पुण्य नाहीं, त्याला कोणाचे अनुग्रहाचें ( कृपेचें ) कारण नाहीं त्याहून ज्यास्त कोणी नाहीं, त्याला कोणतीही बाधा नाहीं, त्याला कोणाचें ओझें वहावें लागत नाहीं, त्याची कधीं फोडतोड होत नाहीं, त्याला पापाचें भय नाहीं, तें निरंजनस्थान आहे. इतकी योग्यता जंगमाची आहे. ( ५ ) बिंदूपनिषदांत म्हटलें आहे कीं, तें जंगमस्थल निष्प्रपंच आहे, तें ब्रह्मस्वरूप आहे, त्यास कोणताही विकल्प नसून तें निरंजन आहे. ( ६ ) परमरहस्यांत जंगमाचें असें लक्षण सांगितलें आहे कीं, जंगमाला आकार नाहीं, त्याला कोणाचा आश्रय लागत नाहीं, तें कधीं व्याकुळ होत नाहीं, व त्याला कोणताही दोष नाहीं, त्याला कोणतेंही स्थान नाहीं, त्याला प्रकाशाचें कारण नाहीं, इतकी योग्यता जंगमस्थलाची आहे असें जाणावें. ( ७ ) गोरक्षसंहितेंत असें सांगितलें आहे कीं, हें जंगमस्थल महानाद आहे, महाबिंदु आणि महाशून्य आहे, हें जंगमस्थल महाशून्य असून सर्वांचें आदिनाथ आहे. ( ८ ) वीरागमांत—शिवांनीं पार्वतीला म्हटलें आहे जंगमाला आदि नाहीं, तरुणपणा ( मध्य ) नाहीं आणि अन्त ( मरण ) ही नाहीं. तो शांतिमान असून आनंदस्वरूप आहे. अनादि जंगमाची योग्यता इतकी आहे कीं, त्याला

सर्वानंदमयो विभुः ॥ अनादिजंगमो देवि शिवरुद्रादिपूजितः ॥ ८ ॥ शून्यशून्य परं शून्यं निःशून्यं निष्कलं तथा ॥ आदिमध्यान्तशून्यं च ह्यनादिजंगमस्थलम् ॥ ९ ॥ निःशून्यं निर्वयः शून्यं शून्यशून्यमनामयम् ॥ आदिशून्यं निरंतर्यमनादिजंगमस्थलम् ॥ १० ॥ आकाशं च जटाकाशं तत्वाकाशं निरंजनम् ॥ हृदाकाशं चिदाकाशं शून्यजंगमलक्षणम् ॥ ११ ॥ आद्यन्तशून्यममलं सदानंदमयं विभु ॥ अनादिजंगमं देवि ब्रह्मविष्ण्वेंद्रपूजितम् ॥ १२ ॥ आद्यंतरहितं ज्योतिरनादि प्रभु चाव्ययम् ॥ अनादीशमजातं च ह्यनादिप्रभुजंगमम् ॥ १३ ॥

ईश्वर उवाच—निःसंगं च निराहारं निर्देहं निरुपाधिकम् ॥ निस्सीमं निर्मलं चैव निरूपं जंगमं स्मृतम् ॥ १४ ॥ जगन्मध्ये स्थितो लोको न बाह्यो जंगमात्परः ॥ जंगमः पंचभूतात्मा ह्यष्टमूर्त्यात्मजंगमः ॥ १५ ॥ सप्तद्वयभुवनानि सप्तोदन्वंत एव च ॥ सप्तद्वीपाश्च निखिलं त्रैलोक्यं सचराचरम् ॥ १६ ॥ अनंतकोटिब्रह्माण्डं भूम्यादिकुलपर्वताः॥*अष्टदिगूर्ध्वभागाधोगर्भीकृतस्तु *जंगमः॥१७॥ चतुर्वेदाश्च गर्भ

---

शिव रुद्र वगैरे देव देखील मान देतात. ( ९ ) अनादि जंगमस्थल हें शून्यशून्य असून परशून्य आहे, तसेंच शून्यहीन असून निष्प्रपंच आहे, त्याला आदि नाहीं, मध्य नाहीं आणि अंतही नाहीं. ( १० ) अनादिजंगमस्थल हें शून्यहीन आहे, त्याला दय नाहीं, तें शून्यस्वरूप आहे, तें शून्याचें शून्य असून तें निरामय ( रोगरहित ) आहे, तें आदिशून्य असून अंतर रहित आहे ( ११ ) आकाश आणि जटाकाश, तत्वाकाश आणि निरंजन हृदाकाश आणि चिदाकाश इतके गुण अंगीं असणें हें शून्यजंगमाचें लक्षण आहे. ( १२ ) पार्वति, अनादि जंगमस्थल आदिरहित असून अंतरहित आहे, तें दोषरहित आहे, तें नेहमीं आनंदस्वरूप आहे, फार काय सांगावें ? ब्रह्मदेव, श्रीविष्णु आणि इंद्र देखील त्याची पूजा करतात. ( १३ ) अनादि जंगमास जन्म मरण नाहीं, तें तेजःपुंज आहे; त्यास मूळ नाहीं व नाशही नाहीं, तें शक्तिमान् असून तो सशक्तपणा त्याचा अनादि कालापासून चालत आला आहे, तें कधींही जन्मास आलें नाहीं.

ईश्वर ह्मणतात—(१४) पार्वति, जंगमाला खाण्याची अवश्यकता नाहीं, त्याला खाण्यापिण्याची जरूर नाहीं, त्याला शरीर नाहीं व त्याला कोणत्याही प्रकारची उपाधि नाहीं, त्याला मर्यादा नाहीं, त्याला दोष नाहीं; त्याला रूप देखील नाहीं. (१५) जगामध्यें सर्व लोक राहतो, तो लोक जंगमाहून बाहेर राहत नाहीं व जंगमापेक्षां श्रेष्ठही नाहीं. जंगम हा पंचमहाभूतात्मक ( स्वरूप ) आहे. अष्टमूर्ति सदाशिवाचा जंगम हा आत्मा आहे. ( १६ ) चवदा भुवनें ( लोक ), सात समुद्र, सात द्वीपें, संपूर्ण हें स्थावर जंगम त्रैलोक्य; ( १७ ) अनंतकोटि ब्रह्माण्ड, पृथ्वी वगैरे, कुलपर्वत, आठदिशांचे वरचे भाग व खालचे भाग जंगमाच्या पोटांतच राहतात. ( १८ ) चार वेद हे त्या जंगमाचा गर्भाशय ( पोट

ष्ट पुराणं तस्य मध्यमम् ॥ योगिनो मुनयस्सर्वे जंगमांघ्रिं समाश्रिताः ॥१८॥ उत्तर-
वातुले ॥ वृत्तम् ॥ साभ्यन्तरं सबहिरंगममूर्ततत्त्वं ज्योतिःपरं पुरुषमक्षरतः परा-
ख्यम् ॥ स्वात्मादिशक्तिघटितं मनसैव नित्यं ध्यातव्यरूपमिह यच्चरलिंगमाहुः
॥ १९ ॥ तस्य देहे समस्तानि भुवनानि चतुर्दश ॥ पादयोरतलं विद्यात्पादोर्ध्वे
वितलं तथा ॥ २० ॥ जंघयोः सुतलं ज्ञेयं जानुस्थं च महीतलम् ॥ तलातलं तथोरौ
च गुह्यस्थाने रसातलम् ॥ २१ ॥ पातालं कटिबंधे तु सप्तलोका इतीरिताः ॥
भूलोको नाभिमध्ये तु भुवर्लोकस्तु कुक्षिके ॥ २२ ॥ हृदये चापि स्वर्लोको जनो-
लोकस्तु कंधरे ॥ ताल्वोश्चापि तपोलोको ललाटे सत्यलोककः ॥ महर्लोकस्त्वयं
मूर्ध्नि चतुर्दश समीरिताः ॥ २३ ॥ ब्रह्माण्डं मुकुटं तस्य वदनं गगनं शृणु ॥
दिशस्सर्वाश्च बाहू च नेत्रे चंद्रार्कसंज्ञके ॥ २४ ॥ शरीरं व्योमरूपं च पातालं पा-
दपंकजम् ॥ करस्थले शून्यलिंगं मेघास्सर्वे जटामयाः ॥ २५ ॥ चंद्रज्योत्स्ना विभू-

---

आहे ( जंगमाच्या पोटांत चार वेद राहतात ), अठरा पुराणें जंगमाच्या कमरेंत राहतात, योग साधन करणारे योगीश्वर आणि तपश्चर्या करणारे मुनीश्वर हे सर्व जंगमाच्या पदकमलांत राहतात. ( १९ ) उत्तरवातुलांत–जें अभ्यंतर ही राहतें आणि बहिरंग ( बाहेरही ) राहतें, ज्याचें तत्व प्रकट दिसत नाहीं, जें सर्वाहून उत्तम प्रकारचें तेज आहे, ज्याला पुरुष म्हणतात, जें अक्षराहून श्रेष्ठ आहे, आत्मा आणि त्याची शक्ति मिळून तें तयार झालें आहे, ज्याचें नेहमीं मनानेंच ध्यान करावें लागतें, अशा रूपालाच जंगमलिंग असें म्हणतात. ( २० ) त्या जंगमाच्या शरीरांत सर्व चवदा भुवनें राहतात. जंगमाच्या दोन्ही पायांच्या खालील बाजूस अतल नांवाचा लोक असून पायांच्या वरील बाजूस वितललोक आहे. (२१) त्याच्या घोट्यांच्या ठिकाणीं सुतल असून पोटऱ्यांमध्यें महीतल आहे, दोन्ही मांड्यांमध्यें तलातल असून शिश्नाचे ठिकाणीं रसातल आहे, ( २२ ) पाताललोक कमरेच्या ठिकाणीं आहे, असे सात पाताललोक तर जंगमाच्या अंगांत कोणकोणत्या ठिकाणीं राहतात तें सांगितलें. आतां बाकीच्या सात लोकांचीं स्थानें सांगतों. भूलोक जंगमाच्या बेंबीच्या ठिकाणीं असून भुवर्लोक त्याच्या काखेंत आहे, ( २३ ) त्याचे हृदयांत स्वर्लोक असून जनोलोक त्याचे गळ्याचे जागीं आहे, त्याच्या टाळूच्या जागीं तपोलोक असून ललाटाच्या जागीं सत्यलोक आहे, आणि महर्लोक मस्तकावर आहे, अशीं चवदा लोकांचीं स्थानें सांगितलीं. ( २४ ) जंगमाचा ब्रह्माण्ड हें मुकुट आहे. पार्वति, तूं नीट लक्ष्य देऊन ऐक आकाश हें जंगमाचें तोंड आहे, ह्या सर्व दिशा त्याचे हात आहेत, चंद्र आणि सूर्य हे दोन्ही त्याचे डोळे आहेत. ( २५ ) आकाश हें त्या जंगमाचें अंग असून पाताल हें त्याचें चरणकमल आहे, त्याच्या हाताच्या ठिकाणीं शून्यलिंग असून हे मेघ त्याच्या जटा आहेत. ( २६ ) चंद्राचें चांदणें हें जंगमाचे अंगावरील भस्म असून

त्तिश्च वेदास्सर्वे क्रियामयाः ॥ नक्षत्रं पुष्पनिचयं रुद्राक्षाः कुलपर्वताः ॥२६॥ सागरो जलपात्रं च कंथा सृष्टिमयं जगत् ॥ आसनं पृथिवी तस्य चाहोरात्रं गुहामठम् ॥ २७ ॥ त्रिकालं ज्ञानसौभाग्यं ऋतवः पट्स्थलं प्रिये ॥ शेषोऽपि कटिसूत्रं च ज्ञानमुद्रा च वाङ्मयी ॥ २८ ॥ मेरुर्दण्डो गुणः सूत्रं गोत्रं शिवकुलं भवेत् ॥ वनस्पतयश्च रोमाण्येवमेतानि पार्वति ॥ २९ ॥

## ॥ द्वादशप्रकरणम् ॥

एवंभूतसंसारजुगुप्सानंतरं गुरूपदेशाभावे स्वस्वरूपसाक्षात्काराऽसंभवात्तदर्थं गुरूपसदने कृते तत्यनंतरं गुरुकारुण्यस्थलमित्युच्यते ॥ वातुले ॥ यस्संसाराम्बुधेर्घोरान्मोचयत्याश्रितान् जनान् ॥ कृपाकटाक्षपातेन तस्मै श्रीगुरवे नमः ॥१॥ शिवसूत्रवार्तिकायाम् ॥ अगाधसंशयांभोधितारकानुग्रहप्रदः ॥ परमोपायरूपस्तु गुरुर्देवः परः शिवः ॥ २ ॥ शिवधर्मोत्तरे ॥ तत्तम् ॥ स एव वंद्यः प्रतिपूजनीयः स एव

---

चार वेद जंगमाच्या क्रिया आहेत, हीं सर्व नक्षत्रें त्याचे मस्तकावर वाहिलेलीं फुलें असून हे कुलपर्वत त्याच्या गळ्यांतील रुद्राक्षांच्या माळा आहेत. ( २७ ) हे सर्व समुद्र जंगमाचें पाणी ठेवण्याचें भांडें असून हे सर्व निर्माण झालेलें स्थावर जंगम विश्व त्याची पांघरावयाची कंथा आहे, पृथ्वी त्याचें बसण्याचें आसन असून हे रात्र दिवस त्याची गुहा व मठ आहे. (२८) त्रिकालज्ञान हें सौभाग्य असून, हे आवडते पार्वति, त्या जंगमाचे सहा ऋतु हे पट्स्थल आहे. शेषनाग हा त्याचा कडदोरा असून वाङ्मयी ( सरस्वती ) त्याची ज्ञानमुद्रा आहे. ( २९ ) मेरुपर्वत हा ज्याची हातांत धरावयाची काठी ( दंड ) असून सद्गुण हें त्याचें सूत्र आहे व शिववंश त्याचें गोत्र आहे. पार्वति, ह्या सर्व प्रकारच्या वनस्पति त्या जंगमाच्या अंगावरील लव आहे असें समज.

## बारावें प्रकरण.

श्रीगुरुबसवलिंगास नमस्कार असो. आतां ह्यापुढे गुरुकारुण्यस्थल लिहिण्यास आरंभ करतों. अशा तऱ्हेनें संसारांत सर्व प्रकारें निंदा भरलेली असल्यामुळें तो सर्वतोपरी टाकून देण्यास योग्य आहे, हें समजल्यानंतर गुरूचा उपदेश झाला नाहीं तर स्वस्वरूप प्रत्यक्ष रीतीनें दृष्टीस पडत नाहीं, त्यासाठीं गुरूला शरण जाऊन त्याजवळ राहिल्यानंतर गुरूची आपल्यावर कृपा कशी होते, हें समजण्यासाठीं आतां ह्यापुढें गुरुकारुण्यस्थलच सांगतों. (१) वातुलागमांत ह्मटलें आहे कीं, जो श्रीगुरु आपल्या कृपाकटाक्षानें आपल्या आश्रयास राहणाऱ्या शिष्य मंडळीस अतिशय भयंकर संसारापासून सोडवितो, त्या श्रीगुरूला नमस्कार असो. ( २ ) शिवसूत्रवर्तिकेंत ह्मटलें आहे कीं, संशयस्वरूप समुद्र फारच खोल आहे, त्यांतून उत्तम प्रकारचा उपाय सुचवून आपल्या शिष्यांस जो तारतो, व त्यांवर अनुग्रह करितो, तो गुरु प्रत्यक्ष परशिवच आहे. ( ३ ) शिवधर्मोत्तरांत ह्मटलें

माता जगतां पिता च ॥ स एव बन्धुस्स गुरुः शिवः स्यात् ज्ञानामृतं यः परम प्रदद्यात् ॥ ३ ॥ शंकरसंहितायाम् ॥ नित्यानित्यविवेकवानिह परत्रापेक्षितार्थारति-श्शांत्याद्यंगसमन्वितस्सुचरितो मोक्षार्थितौत्सुक्यवान् ॥ सत्यानंदपरप्रकाशपरि-पूर्णात्मावबोधान्वितं कृत्याकृत्यविवेकिनं गुरुवरं प्रेयान्नरो भक्तिमान् ॥ ४ ॥ कठ-वल्ल्युपनिषदि ॥ श्रवणायापि बहुभिर्यो न लभ्यः श्रृण्वन्तोऽपि बहवो यं न विदुरा-श्चार्यो यो वक्ता कुशलोऽस्य लब्धा आचार्यो ज्ञाता कुशलोऽनुशिष्टः ॥ ५ ॥ स्कान्दे ॥ तस्मादात्मविचारेण भवदोषविवर्जितः ॥ शिवज्ञानपरं शान्तं महापातकनाशनम् ॥ प्रणिपत्य गुरुं प्राज्ञः प्रार्थयेद्बुद्धिमात्मनः ॥६॥ मैत्रेयोपनिषदि ॥ अथ किमेतैर्वान्यानां शोषणं महार्णवानां शिखरिणां प्रपतनं ध्रुवस्य प्रचलनं स्थानं वा तरूणां निमज्जनं पृथिव्याः स्थानादपसरणं सुराणां सोहमित्येतद्विधेऽस्मिन्संसारे किं कामोपभोगैर्यैरे-वाश्रितस्यासकृदिहावर्तनं दृश्यत इत्युद्धर्तुमर्हसीत्यन्धोदपानस्थो भेक इवासमास्मिन्संसारे

---

आहे कीं, जो सद्गुरु आपणास उत्तम प्रकारचें ज्ञानामृत पाजतो ( ज्ञान शिकवितो ), तो आपणास नमस्कार करण्यास, व पूजा करण्यास योग्य आहे, ( आपण त्यास नमस्कार करून त्याची पूजा करावी ). तो गुरु आपला बंधु असून प्रत्यक्ष परशिवही आहे. ( ४ ) शंकरसंहितेंत ह्मटलें आहे कीं, ज्याला नित्य काय अनित्य काय ह्याचा विचार आहे, ह्या लोकांतील सुखाची आणि परलोकांतील सुखाची ज्याला मुळींच आवड नाहीं, शांति वगैरे अनेक प्रकारचे सद्गुण त्यांच्या अंगीं वसत आहेत, व ज्याचें वर्तन चांगलें आहे ज्याला मोक्षसुखाची अतिशय आवड आहे, त्या भक्तिमान् मनुष्यानें, सत्य, आनंद, आणि परप्रकाश, असा आत्मा ज्याला यथार्थ रीतीनें कळून चुकला आहे, कृत्य कोणतें, अकृत्य कोणतें, ह्याचा ज्याला विचार आहे अशा गुरुश्रेष्ठाला शरण जावें. ( ५ ) " कठवल्ल्यु-पनिषदांत ह्मटलें आहे कीं ", अनेक प्रकारचीं शास्त्रें ऐकिलीं तरी तो गुरु पाहण्यास मिळत नाहीं. अनेक शास्त्रें ऐकलेले लोकही पुष्कळ आहेत, परंतु त्यांस आचार्य कसा असावा ( असतो ) हें समजत नाहीं. जो कोणी कुशल मनुष्य असेल त्यास आचार्य ( गुरु ) मिळतो. आचार्य मोठा ज्ञाता, कुशल आणि रम्य असा असतो. ( ६ ) "स्कन्द-पुराणांत सांगितलें आहे कीं" ज्या मनुष्याचा संसाररोग दूर झाला आहे, त्या मनुष्यानें त्या सद्गुरूपासून आत्मविचार शिकावा; व त्या आत्मविचाराच्या साधनानें, अमर्याद पातकें असलीं तरी त्यांचा नाश करणारें, व शांत, असें उत्तम प्रकारचें शिवज्ञान शिकावें, व त्या गुरूस नमस्कार करून " मला तें ज्ञान द्या " अशी त्या गुरूची प्रार्थना करावी. (७) मैत्रे-योपनिषदांत सांगितलें आहे कीं" , मग ह्या दुसऱ्या अनेक प्रकारच्या खटपटी तरी कशाला कराव्या ? कां तर महासमुद्रालाही सुकून जाऊन कोरडें पडावें लागेल, मोठमोठे उंच पर्वत देखील ढांसळून पडतील, ध्रुव अचळ आहे खरा, तरी एकवेळ त्यालाही ते-

भगवंस्त्वं नो गतिरिति ॥७॥ वाक्यवृत्तौ ॥ अनायासेन येनास्मान्मुच्येयं भवबन्धनात् ॥ तन्मे संक्षिप्य भगवन्केवलं कृपया वद ॥ ८ ॥ शंकरसंहितायां ॥ वृत्तम् ॥ नत्वा भक्तिपुरःसरं गुरुवरं विज्ञाय तत्पार्श्वतः स्थित्वा जन्मशतागताद्भवभयाद्भीतोऽस्मि मां पाहि भो ॥ इत्युक्तो गुरुरादरेण कृपया शिष्यं समीपस्थितं स्पृष्ट्वा पाणितलेन साधु गदितं प्रीतोऽस्मि वत्स त्वया ॥ संसारार्णवतारके परशिवे लिंगस्वरूपेऽमले प्राणं जीवकलाधरं तव विधास्ये त्वं तथा स्याः परम् ॥ ९ ॥ भविजन्मकृतं पापं भक्तजन्मविवर्जितम् ॥ भक्तजन्मक्रियाहीनं चेद्भवेद्घोरकिल्बिषम् ॥ १० ॥ बोधायनशाखायाम् ॥ अदीक्षितः शिवं न स्पृशेत् ॥ ११ ॥ वीरागमे ॥ अदीक्षितैरनाचारैरस्मै

---

थून हालावें लागेल. झाडांवर कुन्हाड पडून तीं झाडें तुटतील, पृथ्वीस समुद्राच्या पाण्यांत बुडावें लागेल; फार काय. परंतु देवादिकांस देखील आपापल्या स्थानावरून भ्रष्ट व्हावें लागेल. अशा प्रकारच्या ह्या संसारांत विषयोपभोग घेऊन काय करावयाचें आहे? त्या विषयसुखाच्या नादीं लागलें तर वारंवार जन्ममरण मात्र घ्यावें लागणार आहे ह्यासाठीं गुरुश्रेष्ठा, तूं मला ह्या भयंकर संसारसमुद्रांतून वर काढ. एखादा आंधळा आणि ओरडणारा वेडूक असतो, तशी माझी स्थिति आहे, ह्या संसारांत परमेश्वरा श्रीगुरो, तूंच माझा रक्षक आहेस, तुजखेरीज दुसरा कोणी माझा रक्षणकर्ता नाहीं. ( ८ ) " वाक्यवृत्तींत ह्मटलें आहे " शिष्यानें गुरूला ह्मणावें कीं, महाराज, ह्या संसारपाशांतून मी प्रयास न पडतां ज्या रीतीनें सुटेन असा सोपा उपाय, मजवर कृपा करून मला थोडक्यांत सांगा. ( ९ ) " शंकरसंहितेंत ह्मटलें आहे " शिष्यानें नम्रपणानें गुरूकडे गेल्यावर भक्तिपूर्वक नमस्कार करावा; आणि हा आपला गुरु आहे असें समजून हळूच त्याचे समोर दूर एका बाजूस बसावें, आणि ह्मणावें, महाराज, मी शेंकडो वेळ ह्या संसारांत जन्मास आल्यामुळें मी आतां अगदीं त्रासून गेलों, आतां आपण माझी ह्या दुःखांतून मुक्तता करून माझें रक्षण करा. असें काकुळतीस येऊन ह्मटल्यावर, गुरूच्या मनांत दया येऊन तो जवळ बसलेल्या आपल्या शिष्याच्या अंगावरून हात फिरवितो; आणि ह्मणतो, मी तुला प्रसन्न आहे, तूं मला फार चांगलें विचारलेंस. संसारसमुद्रांतून तारून नेणाऱ्या निर्मळ आणि लिंगस्वरूपी त्या परशिवांत तुझा जीवस्थिति पावलेला प्राण नेऊन ठेवितो, व तुला त्या श्रेष्ठ शिवाच्या पदवीस नेऊन पोंचवितो. ( १० ) भविजन्मांत केलेलें पाप असेल तर भक्ताचे जन्मास आल्यावर नाहींसें होतें; आणि भक्ताचा जन्म येऊन जर क्रिया केली नाहीं, तर मात्र अतिशय पाप लागतें. त्या पापाची निष्कृति कधींच होत नाहीं. ( ११ ) " बोधायनशाखेंत असें सांगितलें आहे कीं ", ज्यानें शिवदीक्षा घेतली नाहीं, अशा भविमनुष्यानें शिवाला कधींही शिवूं नये. ( १२ ) " वीरागमांत असें ह्मटलें आहे कीं ", ज्या लोकांनीं शिवदीक्षा घेतलेली नाहीं,

चश्चैरवैदिकैः ॥ दूपितैः समयषष्ठैर्न कार्यं शिवपूजनम् ॥ १२ ॥ यथा मृगपतिं दृष्ट्वा महाभीतो वने गजः ॥ अदीक्षितार्चनाल्लिंगं तथा भीतं महेश्वरि ॥१३॥ शिवरहस्ये ॥ त्रिपुंड्रं चैव रुद्राक्षं नित्यार्चनजपस्तथा ॥ होमध्यानादिकं सर्वं दीक्षाहीनस्य निष्फलम् ॥ १४ ॥ अदीक्षितश्च यो विप्रश्चतुर्वेदधरोऽपि वा ॥ संस्पृशेद्यदि वा लिंगं श्वानयोनिषु जायते ॥ १५ ॥ सोमशंभुतंत्रे ॥ शिवसंस्कारहीनास्तु स्पृष्ट्वा लिंगं द्विजातयः ॥ संचरंति महाघोरे नरके कालमक्षयम् ॥ १६ ॥ अदीक्षो नार्चयेल्लिंगं प्रविशेन्नगर्भमंदिरम् ॥ प्रमादात्तत्प्रविष्टे तु प्रायश्चित्तं तु कारयेत् ॥ १७ ॥ अदीक्षितैर्वा विद्वद्भिर्लिंगं बिंबादिकं तु वा ॥ गर्भगेहप्रवेशे तु परचक्राद्भवेद्भयम् ॥१८॥ अदीक्षितश्च यो विप्रो न कुर्याल्लिंगपूजनम् ॥ अरण्ये निर्जने देवि भवति ब्रह्मराक्षसः ॥ १९ ॥ वैदिकैर्गर्भगेहे तु प्रविष्टे स्पर्शने कृते ॥ ब्रह्माण्डानि परित्यज्य पुनः पुण्यं स-

---

जे दुर्वर्तनी आहेत, जे वैदिक नाहींत, जे दुष्ट आहेत, जे शास्त्रप्रमाणें वागत नाहींत, अशांनीं शिवपूजन करूं नये. ( १३ ) सिंहाला पाहून रानांतील मोठा हत्ती जसा भिऊन पळून जातो, तसेंच दीक्षा न घेतलेला मनुष्य लिंगपूजन करूं लागला म्हणजे त्या लिंगास भय वाटतें. ( १४ ) "शिवरहस्यांत सांगितलें आहे कीं", ज्यानें दीक्षा घेतली नाहीं, त्यानें त्रिपुंड्र लाविलें, रुद्राक्षांची माळ गळ्यांत घातली, नेहमीं शिवपूजन केलें, आणि नेहमीं शिवपंचाक्षरी मंत्राचा जप केला, होम, ध्यान वगैरे जरी केलें, तरी तें सर्व त्यानें दीक्षा घेतली नसेल तर व्यर्थ आहे. ( १५ ) ज्या मनुष्यानें शिवदीक्षा घेतली नसेल; तो चार वेद म्हटलेला कां असेना; त्यानें शिवलिंगाला स्पर्श करूं नये. जर तो शिवलिंगाला स्पर्श करील, तर तो कुत्र्याच्या जन्मास जाईल. ( १६ ) "सोमशंभुतंत्रांत सांगितलें आहे कीं", ज्या ब्राह्मणांस शिवदीक्षेचा संस्कार झाला नाहीं, ते जर शिवलिं-गाला शिवतील; तर ते नेहमीं अतिशय भयंकर अशा नरकांत दुःख भोगतील. ( १७ ) ज्यानें शिवदीक्षा घेतली नसेल त्यानें लिंगपूजा करूं नये. फार काय, पण शिवाच्या गाभाऱ्यांत देखील त्यानें जाऊं नये. जर तो मनुष्य न कळत गाभाऱ्यांत जाईल, तर त्या दोषाबद्दल त्यानें प्रायश्चित्त घ्यावें. ( १८ ) ज्यांनीं शिवदीक्षा घेतली नाहीं, ते मोठे विद्वान् असले; तरी त्यांनीं शिवाचें लिंग किंवा शिवाची मूर्ति करूं नये. ते जर शिवमंदिराच्या गाभाऱ्यांत जातील, तर त्या देशावर परचक्र येऊन सर्वांवर संकट गुदरेल. ( १९ ) पार्वती, ज्या मनुष्यानें शिवदीक्षा घेतली नसेल, तो ब्राह्मण असला तरी त्यानें लिंगपूजा करूं नये. जर तो तशीच हट्टवादीपणानें लिंगपूजा करील, तर ओसाड रानांत ब्रह्मराक्षस होईल. ( २० ) जे लोक वैदिक आहेत, पण ज्यांनीं शिवदीक्षा घेतली नाहीं,

माचरेत् ॥ २० ॥ अदीक्षितश्चतुर्वेदी शिवलिंगं यदि स्पृशेत् ॥ कल्पकोटिसहस्राणि भवति ब्रह्मराक्षसः ॥ २१ ॥ चतुर्वेद्यप्यहंकाराच्छिवलिंगं तु पूजयेत् ॥ राजा राष्ट्रं तु सर्वस्वं तस्य ग्रामं विनश्यति ॥ २२ ॥

ईश्वर उवाच — पतिपत्नीभ्रातृपुत्रदासीगृहपदातयः ॥ एकदीक्षा भवेद्देवि विशेषः शुद्धभक्तिमान् ॥ २३ ॥ वातुलतंत्रे ॥ देव्युवाच ॥ पुत्रमातृपितृभ्रातृदारा बन्धुजनाश्च ये ॥ एक एव गुरुस्तेषामन्यथा नरकं भवेत् ॥ २४ ॥ वीरागमे ॥ गुरुरेको लिंगमेकं दीक्षा चैका प्रसादकृत् ॥ एका मुक्तिरियं देवि शैवदीक्षा विशिष्यते ॥ २५ ॥ दीक्षा च पतिपत्न्योश्च गुरुरेको भवेत्खलु ॥ तन्मनःप्राणनैवेद्यं रतिसंगो वरानने ॥ २६ ॥ पतिपत्न्योरन्यगुरुर्दीक्षा चान्या भवेद्यदि ॥ भ्रातृभृत्यसुतानां च भक्तिहीनं तु शांकरि ॥ २७ ॥ यथा दीक्षा द्विधा चैव

---

ते शिवमंदिराच्या गाभाऱ्यांत गेले, किंवा त्यांनीं शिवपूजेच्या उपकरण्यांस हात लाविला, तर तीं उपकरणीं मातीचीं केलीं असलीं तर सर्व फोडून टाकून नवीं घ्यावीं. ( २१ ) ज्या मनुष्यानें शिवदीक्षा घेतली नाहीं, तो चार वेद शिकलेला असला तरी त्यानें जर शिवलिंगास हात लावला, तर तो हजार कोटि वर्षेपर्यंत ब्रह्मराक्षस होतो. ( २२ ) जर कोणी एखादा ब्राह्मण मी चार वेद शिकलों आहे, मीं शिवदीक्षा घेतली नसली तरी काय चिन्ता आहे; अशा गर्वानें शिवलिंगाची पूजा करील, तर त्या त्याच्या पापानुळें त्या देशाचा राजा, तो देश, त्या राजाची संपत्ति, आणि त्याचा तो गांव, या सर्वांचा नाश होऊन जाईल.

ईश्वर ह्मणतात—( २३ ) नवरा, वायको, भाऊ, मुलगा, दासी व घरांतील चाकर माणसें ह्या सर्वांनीं एकच दीक्षा घ्यावी, निराळी दीक्षा घ्यावयास नको हा एक शुद्धभक्तीचा प्रकार आहे. ( २४ ) " वातुलतंत्रांत असें सांगितलें आहे कीं " मुलगा, आई, बाप, भाऊ, वायको व नातलग लोक जितके असतील त्या सर्वांनीं एकच गुरु करावा; असें न केलें तर तो दुसरा गुरु करणारा मनुष्य नरकांत जाईल. ( २५ ) " वीरागमांत ह्मटलें आहे कीं ", गुरु एकच असावा लिंग एकच असावें, दीक्षा एकच असते, प्रसाद एकच असतो, मुक्ति ही एकच आहे, हे देवी, शैवदीक्षा श्रेष्ठ आहे. ( २६ ) नवरा व वायको ह्या दोघांस दीक्षाही एक आहे, व गुरुही दोघांनीं एकच करावा. हे सुंदर मुख असणारे पार्वती, रतिसुख हेंच त्याचें मन हें प्राणनैवेद्य होय. ( २७ ) हे पार्वती, नवरा व वायको ह्यांनीं वेगळा वेगळा गुरु केला, व वेगळी वेगळी दीक्षा घेतली, भाऊ, चाकर व मुलगे ह्यांनीं वेगळी वेगळी दीक्षा घेतली, ह्मणजे तें कर्म भक्तिहीन समजावें. ( २८ ) जशी दीक्षा दोन तऱ्हेची आहे, तसा प्रसादही दोन प्रकारचा आहे.

प्रसादो द्विविधं भवेत् ॥ तथा द्वयमिदं देवि विशेषः पातको भवेत् ॥ २८ ॥ पतिः पत्नी गुरुं लिंगमेकीभावान्न पश्यतः ॥ अष्टाविंशतिकोटौ स्तो नरके कालमक्षयम् ॥ २९ ॥ पतिपत्न्योर्गुरौ लिंगे भाव एकः प्रशस्यते ॥ त्रिषु लोकेषु पूज्येते गुरुभक्तियुतावपि ॥ ३० ॥ गुरुदेवं महादेवमेकीभावेन भावयेत् ॥ भावद्वयेन भावेत नरके कालमक्षयम् ॥ ३१ ॥ गुरुसाहित्यभक्तानां मृते गुरौ प्रशस्यते ॥ लिंगलीनश्चेतिभावश्चंडालश्चान्यभावतः ॥ ३२ ॥ आचार्ये बालबुद्धिं च नरबुद्धिं तथैव च ॥ अशिष्टबुद्धिं कुर्वाणो रौरवं नरकं व्रजेत् ॥३३॥ गुरुं सदाशिवं मन्येत्* गुरुपत्नीं च पार्वतीम् ॥ ज्येष्ठपुत्रं गुरुं मन्येत्* कनिष्ठानात्मना समान् ॥ ३४ ॥ शिवरहस्ये ॥ इत्युक्त्वा गुरुपस्यास्य देशिकः करुणाबलात् ॥ चक्रे दीक्षां महाशैवीमविद्यापाशकृंतनीम् ॥ ३५ ॥ योगसारे ॥ शुद्धां यः शांभवीं दीक्षां करोति गुरुरुत्तमः ॥ तस्मै दद्यात् स्वमात्मानं पूज्यो

---

हे पार्वती, असे सगळे दोन दोन प्रकार झाले; त्यामुळें पातकही जास्त होतें. ( २९ ) पति, पत्नी ( नवरा बायको ), गुरु, लिंग, हीं एकरूप आहेत; असें न मानील तो मनुष्य अठ्ठावीस कोटि वर्षेंपर्यंत अक्षयकाळ नरकांत पडेल. ( ३० ) नवरा बायकोची गुरूविषयीं व लिंगाविषयीं एकनिष्ठा असावी; असा दृढ निश्चय असणारीं तीं दोघें नवरा बायको तिन्ही लोकांत पूज्य होतात ( ३१ ) गुरुदेवाविषयीं आणि महादेवाविषयीं एकनिष्ठा ठेवावी ( गुरु आणि महादेव हे सारखे समजावें ). जर कोणी मनुष्य गुरूविषयीं निराळा भाव आणि महादेवाविषयी निराळा भाव धरील, तर तो अक्षयकाळ नरकांत पडेल, ( ३२ ) गुरु मेला असतां, गुरु लिंगस्वरूपांत लीन झाला, असेंच गुरूच्या भक्तांनीं म्हटलें पाहिजे; दुसरी भलती कल्पना मनांत आणल्यास तो चांडाळ समजावा. ( ३३ ) जर कोणी मनुष्य आपला आचार्य ( गुरु ) हा अल्प समजुतीचा आहे, किंवा इतर सामान्य मनुष्यांसारखा आहे, किंवा त्या गुरूचे विचार सभ्यपणाचे नाहींत; असें मनांत आणील तर तो मनुष्य रौरवनरकाला जाईल. ( ३४ ) गुरूला हा प्रत्यक्ष सदाशिव आहे असें मानावें, गुरूच्या बायकोला पार्वतीसारखें मानावें, गुरूच्या वडील मुलाला गुरूसारखें मानावें. व त्याहून लहान लहान मुलांला आपल्याबरोबरीचे असें समजावें. ( ३५ ) शिवरहस्यांत सांगितलें आहे कीं, असें बोलून देशिक ( गुरु ) त्या मनुष्यावर कृपा करून त्याला महाशैवीदीक्षा देतो, ती महाशैवीदीक्षा अविद्यारूप पाश तोडून टाकते. ( ३६ ) योगसारांत सांगितलें आहे कीं, जो श्रेष्ठगुरु निष्पाप रीतीची शिवदीक्षा देतो, त्या गुरूला शिष्यानें आपला आत्मा

वंद्यः स सद्गुरुः ॥ ३६ ॥ स्वायंभुवतन्त्रे ॥ स देशिकमहप्राप्य दीक्षाविच्छिन्नबं-धनः ॥ प्रयाति शिवसायुज्यं निर्मलो निरुपप्लवः ॥ ३७ ॥ सर्वज्ञानोत्तरतन्त्रे ॥ तत्वैरेभिर्निबद्धात्मा सर्वधर्मैश्च संयुतः ॥ नान्येन शक्यते मोक्तुं मुक्त्वा दीक्षां शिवात्मिकाम् ॥ ३८ ॥ सिद्धांतशिखामणौ ॥ गुरुदेवः परं तत्वं प्रकाशयति दे-हिनाम् ॥ एवं सूर्यं विना लोके तमसां विनिवर्तकः ॥ ३९ ॥ मतंगपारमेश्वरे ॥ वृत्तम् ॥ दीक्षानलप्लुष्टमलस्य जन्तोः स्वात्मयं बलं व्यक्तिमुपैति योगात् ॥ शक्त्या विभोश्चुंबितहृत्प्रदेशो नान्येन पुंसो विनिवृत्तिमेति ॥ ४० ॥ स्वायंभुवतन्त्रे ॥ अनेन कर्मयोगेन परां केवलतां गतः ॥ अनाथमुद्रशून्यत्वात्प्राप्नोति न भवा-न्तरम् ॥ ४१ ॥ गुरुलिंगजंगमाश्चैव प्रसादे करदर्शनम् ॥ युतं धारणमेवोक्तं वीरशैवमहागमे ॥ ४२ ॥ वेधा मांत्री क्रिया दीक्षा वीरशैवं तु कथ्यते ॥ कलश-

---

अर्पण करावा, तो सद्गुरु पूज्य असून नमस्कार करण्यास योग्य आहे. ( ३७ ) स्वायंभुवतन्त्रांत झटलें आहे कीं, तो भक्त गुरुकडे जाऊन दीक्षा घेतो, व त्या दीक्षेमुळें त्याचे संसारपाश तुटून तो मोकळा होतो. मग निष्पाप झाल्यावर त्याला कोणत्याही रीतीची पीडा रहात नाहीं. तो शिवसायुज्य पावतो. ( ३८ ) सर्व-ज्ञानोत्तरतन्त्रांत सांगितलें आहे कीं, हीं सर्व तत्वें त्याला यथार्थ रीतीनें सम-जलीं, किंवा सर्व प्रकारचें धर्माचरण त्यानें केलें; तरी शिवस्वरूप प्राप्त करून देणारी शिवदीक्षा त्याला झाल्याशिवाय तो दुसऱ्या कोणत्याही उपायानें मुक्त होत नाहीं. संसारांतून मुक्त होण्यास प्राण्यानें शिवदीक्षाच घेतली पाहिजे. ( ३९ ) सिद्धा-न्तशिखामणिग्रन्थांत झटलें आहे कीं, प्राणिमात्रांला गुरुदेव हाच श्रेष्ठतत्व ( शिव-तत्व ) यथार्थ रीतीनें समजावून सांगतो. ह्या जगांत सूर्याखेरीज दुसरा कोण अंधार नाहींसा करण्यास समर्थ आहे?, सूर्य जसा अंधार नाहींसा करून प्रकाश पाडतो, तसाच सद्गुरु अज्ञान दूर करून शिवतत्व शिकवितो. ( ४० ) मतंग-पारमेश्वरतंत्रांत झटलें आहे कीं, दीक्षारूप अग्नीच्या योगानें ज्या प्राण्याचे आणव-मल, कार्मिकमल, आणि मायामल जळून गेले आहेत, त्या प्राण्याचे योगसाध-नानें स्वात्मबल प्रकट होतें. परमेश्वराच्या शक्तीनें त्याच्या हृदयांत प्रवेश केल्या-मुळें त्यास शिवज्ञान होतें. दुसऱ्या कोणत्याही रीतीनें त्याचें मन संसारपाशांतून सुटत नाहीं. ( ४१ ) स्वायंभुवतन्त्रांत झटलें आहे कीं, अशा मार्गानें मोक्षप-दवीला गेलेला मनुष्य अति जुनाट अशा पापाचें निर्मूलन झाल्यामुळें पुनः ज-न्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडत नाहीं. ( ४२ ) वीरशैव नांवाच्या श्रेष्ठ आगमांत गुरु, लिंग, आणि जंगम ह्यांचें दर्शन प्रसादकारक आहे असें झटलें आहे, आणि त्यांचें धोरणही योग्यच आहे. ( ४३ ) वीरशैवमतांत वेधादीक्षा, मंत्रदीक्षा,

पंचकजाता वै शैवदीक्षा इति स्मृता ॥ ४३ ॥ अचिंत्यविश्वसादाख्ये ॥ दीयते लिंगसंबन्धः क्षीयते च मलत्रयम् ॥ दीयते क्षीयते यस्यास्सा दीक्षेति निगद्यते ॥४४॥ योगपट्सहस्रिकायाम् ॥ दीयते च महाज्ञानं क्षीयते च मलं यथा ॥ सा दीक्षा संज्ञिका तस्य गुरुदीक्षा गुरोर्मता ॥ ४५ ॥ वासिष्ठपुराणे ॥ प्रसन्नं परमाचार्यं भक्तिमुक्तिप्रदर्शकम् ॥ प्रार्थयेदग्रतः शिष्यः प्रांजलिर्विनयान्वितः ॥ ४६ ॥ मुण्डकोपनिषदि ॥ तस्मै स विद्वानुपसन्नाय सम्यक्प्रशांतचित्ताय शमान्विताय येनाक्षरं पुरुषं वेद सत्यं प्रोवाच तां तत्वतो ब्रह्मविद्याम् ॥ ४७ ॥ षडध्वशुद्धये प्रोक्तः पट्स्थलब्रह्मशांभवम् ॥ उपदेशः षडध्वानमन्त्राध्वाख्यादयः क्रमात् ॥ ४८ ॥ वातुलतंत्रे ॥ लिंगवृत्तसमं पीठं दीर्घं विस्तारमेव च ॥ तदर्धं गोमुखं चैव इत्येतल्लिंगलक्षणम् ॥ ४९ ॥ इत्यादिलक्षणलक्षितस्य लिंगस्य तैलगुडगैरिकगुग्गुलसिकतासिक्थसर्जरसलाक्षाख्याष्टभिर्द्रव्यैरष्टबन्धं कृत्वा शिव-

---

आणि क्रियादीक्षा, असे दीक्षेचे तीन भेद सांगितले आहेत. पांच कलश मांडून शैवदीक्षा घ्यावी लागते, असें ह्मणतात. ( ४४ ) अचिन्त्यविश्वसादाख्यांत सांगितलें आहे कीं, शिवदीक्षा ही लिंगाचा संबंध करून देते, व आणव, माया, आणि कार्मिक, ह्या तीन मलांचा नाश करिते. ती एक चांगला गुण देते, आणि दुर्गुणांचा क्षय करिते; ह्मणून तिला दोन्ही गुणांवरून दीक्षा असें नांव पडलें. ( ४५ ) योगपट्सहस्रिकेंत ह्मटलें आहे कीं, ज्या दीक्षेमुळें महाज्ञान मिळतें, व तीन मलांचा क्षय होतो, ह्मणून तिला दीक्षा असें नांव पडलें ती दीक्षा गुरु देतो, ह्मणून तिला गुरुदीक्षा असें ह्मणतात. ती दीक्षा गुरुला मान्य आहे. ( ४६ ) वासिष्ठपुराणांत ह्मटलें आहे, शिष्यानें हात जोडून, प्रसन्न झालेल्या, शांत स्वभावाच्या, व ऐश्वर्यसुख आणि मोक्षसुख प्राप्त करून देणाऱ्या गुरूच्यापुढें उभें राहून, नम्रतेनें त्याची प्रार्थना करावी. ( ४७ ) मुण्डकोपनिषदांत सांगितलें आहे कीं, तो विद्वान् गुरु, आपल्याजवळ नम्रतेनें येऊन बसलेल्या, ज्यांचें मन शांत असून ज्याला वैराग्य प्राप्त झालें आहे, अशा शिष्याला परमात्म्याचें यथार्थस्वरूप सांगतो; व खरेपणानें ती ब्रह्मविद्याही शिकवितो. ( ४८ ) षडध्वशुद्धि व्हावयासाठीं, पट्स्थलब्रह्म शांभवमंत्राचा उपदेश करितात. ते षडध्व—मंत्राध्वा, कलाध्वा, वर्णाध्वा, पदाध्वा, भुवनाध्वा, तत्वाध्वा वगैरे सहा ओळीनेंच सांगितले आहेत. ( ४९ ) वातुलतंत्रांत सांगितलें आहे कीं, लिंगाच्या वृत्ताखालचें पीठ वृत्ताबरोबरीचें असावें, त्याचें सिंहासन लांब आणि पसरट असावें, त्याचे अर्ध भागाइतकें लांबीचें गोमुख असावें, हेंच लिंगाचें लक्षण आहे. ( ५० ) हीं सर्व लक्षणें अंगीं असणाऱ्या लिंगाला तेल, गूळ गैरिक ( गेरु ), गुग्गुळ, वाळू, सि-

लिंगमेकां रात्रिं जलाधिवासेन पंचगव्येनैकां रात्रिं श्रीविभूतिसंमिश्रोदकेनैकां रात्रिमधिवासयेत् ॥ ६० ॥ मंत्रेण मंत्रितं तोयं तत्तीर्थमिति कथ्यते ॥ ६१॥ उदङ्मुखो गुरुः प्रत्यङ्मुखं शिष्यं नियुज्य च ॥ अभिषेकं ततः कुर्यात्कलशस्थांबुभिश्शिवैः ॥ ६२ ॥ श्रीमत्पंचाक्षरीमंत्रं सतारं तु षडक्षरम् ॥ षडंगलिंगसंयुक्तं षट्स्थलब्रह्मवर्चसम् ॥ ६३ ॥ स्वार्थं समुपदिश्याथ शिवसिद्धान्ततंत्रके ॥ शिवानुभवसूत्रेऽस्मिन्यदुक्तं तत्समादिशेत् ॥ ६४ ॥ वीरभद्रपुराणे ॥ दीक्षाकाले तु गुरुणा साक्षी तु चरलिंगकम् ॥ गुरुलिंगद्वयोः कर्ता मम कर्ता तु जंगमः ॥ ६५ ॥ शिवरहस्ये ॥ कृत्वा शैवीं परां दीक्षां दत्वा विद्यां शिवात्मिकाम् ॥ छित्वाऽविद्यामहापाशं कलाध्वानं विचिंतयेत् ॥ ६६ ॥ ॥ मध्यमानुवाके ॥ तस्य मध्ये वन्हिशिखा अणीयोर्ध्वा व्यवस्थिता ॥ नीलतोयदमध्यस्था विद्युल्लेखेव भास्वरा ॥ ६७ ॥ नीवारशूकवत्तन्वी पीता भा-

---

क्थ (मेण), सर्जरस, आणि लाख, वगैरे आठ पदार्थांनीं अष्टबंध करून एक रात्र पाण्यांत ठेवावें, एक रात्र पंचगव्यांत ठेवावें, व एक रात्र विभूति मिसळलेल्या पाण्यांत ठेवावें. (५१) जें पाणी मंत्रांनीं मंत्रिलें असतें त्या पाण्यास तीर्थ असें ह्मणतात. (५२) शिवदीक्षा देतेवेळेस गुरु उत्तरेकडे तोंड करून बसतो, व शिष्याला पश्चिमेकडे तोंड करून बसवून, मग कलशांतील पवित्र जलांनीं त्या शिष्याला अभिषेक करितो. (५३) नंतर त्या शिष्याला शिवपंचाक्षरी मंत्र शिकवितो. त्याच मंत्रांत ॐकार जास्त मिळविला ह्मणजे तोच मंत्र षडक्षरी होतो. तो मंत्र शिकवून षडंगलिंगसहित असणारें षट्स्थलब्रह्मस्वरूप, (५४) शिष्याचें कल्याण होईल अशा तऱ्हेनें शिकवितो, मग शिवसिद्धान्ततंत्रांतील व शिवानुभवसूत्रांतील ज्या गोष्टी अवश्य सांगावयास पाहिजेत, त्या सर्व त्याला शिकवितो. (५५) वीरभद्रपुराणांत सांगितलें आहे कीं, दीक्षेच्यावेळीं गुरु हा चरलिंगाला साक्षी करितो गुरु आणि लिंग ह्यांचा कर्ता आणि माझाही कर्ता जंगमच आहे. (५६) शिवरहस्यांत सांगितलें आहे कीं, श्रेष्ठ असणारी शिवदीक्षा घेऊन, शिवतत्वविद्या शिकून, अविद्यारूपी महापाश तोडून, कलाध्वाचें चिंतन करावें. (५७) मध्यमानुवाकांत ह्मटलें आहे कीं, त्या कलाध्वाच्या मध्यभागीं अग्नीची शिखा आहे, ती फार मोठी असून तिचें टोक वर आहे; ती अशा प्रकारची आहे. निळ्या रंगाच्या ढगांत जशी चकचकीत वीज असावी तशी ती तेजःपुंज आहे. (५८) राजगिऱ्याच्या एका कणाएवढी ती बारीक आहे, ती अगदीं लहान आहे तरी पिंवळ्या रंगाची असून फार शोभते, त्या अग्निशि-

स्त्यणूपमा ॥ तस्यास्त्वग्निशिखामध्ये परमात्मा व्यवस्थितः ॥ ५८ ॥ वाचातीता मनोतीता वर्णातीता च तत्परा ॥ ज्ञानातीता निरंजन्या कला या सूक्ष्मभावतः ॥ ५९ ॥ एवं भेदकला देवि सद्गुरोः शिष्यमस्तके ॥ हस्ताब्जमथनाद्ग्राह्यात्तस्य भावकरोदितः ॥ ६० ॥ वातुलतंत्रे ॥ देव्युवाच ॥ कर्णे शिष्यस्य शनकैः शिवमंत्रमुदीरयेत् ॥ स तु बद्धांजलिः शिष्यो मंत्रतद्गतमानसः ॥ ६१ ॥ शनैस्तं व्याहरेच्छिष्यः शिवाचार्यस्य शासनात् ॥ पाशानशेषान्कर्तर्या छित्वा लिंगं समादिशेत् ॥ ६२ ॥ कर्तरी ज्ञानशक्तिः स्यात्तया पाशान् छिनत्यसौ ॥ या कला परमा सूक्ष्मा मंत्राणां बोधिनी परा ॥ ६३ ॥ शिवरहस्ये ॥ यथा कला तथा भावो यथा भावस्तथा मनः ॥ यथा मनस्तथा दृष्टिर्यथा दृष्टिस्तथा स्थलम् ॥ ६४ ॥ सा कला परमा सूक्ष्मा मंत्राणां बोधिनी परा ॥ तामाकृष्य यथान्यायं लिंगे समुपदेशयेत् ॥ ६५ ॥ सर्वलक्षणसंपन्ने तस्मिन् लिंगे वियोजिते ॥ पीठस्थितेऽभिषिक्ते च गन्ध-

---

खेत परमात्मा राहतो. ( ५९ ) ज्ञानकला ही वाचेनें यथार्थ रीतीनें वर्णन करून सांगतां येत नाहीं, मनानें त्या ज्ञानकलेची कल्पना करितां येत नाहीं, ती ज्ञानकला वर्णाच्याही पलीकडे असून ती फार श्रेष्ठ आहे, ती ज्ञानाच्याही पलीकडे आहे, तिला निरंजनी कला ह्मणतात, ती सूक्ष्मदृष्टीनें विचार करून पहावी लागते. ( ६० ) पार्वती, ह्याप्रमाणें, सद्गुरु आपलें हस्तकमल शिष्याच्या मस्तकावर ठेवून त्यास भेदकला मिळून देतो, त्याच्या त्या वरदहस्ताला भावकर असें ह्मणतात. ( ६१ ) वातुलतंत्रांत पार्वतीनें ह्मटलें आहे, तो गुरु शिष्याच्या कानांत हळूच शिवमंत्र उपदेश करितो. तो शिष्यही दोन्ही हात जोडून गुरूनें सांगितलेल्या मंत्राकडे नीट लक्ष्य लावतो. ( ६२ ) व त्या शिवगुरूच्या सांगण्याप्रमाणें तो शिष्य हळूहळू तें मंत्र ह्मणत असतो; व गुरु ज्ञानरूप कातरीनें त्या शिष्याचे सर्व संसाररूप पाश तोडून टाकून त्यास लिंगाचा उपदेश करितो. ( ६३ ) ज्ञान हीच कातरी आहे, त्या कातरीनें गुरु शिष्याचे संसारपाश कातरून टाकतो. ही ज्ञानकला फार मोठी असून सूक्ष्म आहे. ही कला मंत्राचें ज्ञान करून देते. ( ६४ ) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, जशी कला असते तसा भाव असतो, जसा भाव असतो तसें मन असतें, जसें मन असतें तशी दृष्टि असते; आणि जशी दृष्टि असते तसें स्थल असतें. ( ६५ ) ती ज्ञानकला फार श्रेष्ठ असून समजण्यास फार कठिण आहे. ती मंत्राचें ज्ञान करून देते, व ती श्रेष्ठ आहे. त्या ज्ञानकलेला यथाविधीनें ओढून घेऊन शिष्याला लिंगाविषयीं उपदेश करावा ( तें ज्ञान लिंगाचे ठिकाणीं ठेवावें ). ( ६६ ) मग विधिपूर्वक गुरु सर्व लक्षणांनीं संपूर्ण असणारें शिवलिंग स्वच्छ करून सिंहासनावर बसवितो, त्याला अभिषेक

पुष्पादिपूजिते ॥ मंत्रपूते कलां शैवीं योजयेद्विधिना गुरुः ॥ ६६ ॥ वीरागमें ॥ एकत्वं च परं साक्षात्प्रणवं प्राणगोचरम् ॥ गुरुः प्रमथयन् शिष्यस्य लिंगे तं विनियोजयेत् ॥ ६७ ॥ अचिन्त्यविश्वसादाख्ये ॥ शिष्यस्य प्राणमादाय लिंगेऽस्मिन्स्थापयेद्गुरुः ॥ तल्लिंगं तस्य तत्प्राणं स्थापयेदेकभावतः ॥ ६८ ॥ तद्भागलक्षणां भक्तिं सुसूक्ष्मां परमामपि ॥ दर्शयामास शिष्यस्य देशिकः परमेश्वरः ॥ ६९ ॥ तस्मिन् लिंगे परे दृष्टे निष्कले निरुपाधिके ॥ यस्य जीवस्य कर्माणि क्षीयन्ते सकलानि वै ॥ ७० ॥ ततस्तल्लिंगमस्यांगे शिष्यस्यामिततेजसः ॥ गुरुः संयोजयामास पूर्वोक्तेनैव वर्त्मना ॥ ७१ ॥ आणवं गर्भसंबंधमणुरूपं व्यवस्थितम् ॥ मायिकं जातिभेदं च मोह इत्यभिधीयते ॥ ७२ ॥ कार्मिकं द्रव्यसंबंधमीषणत्रयसंयुतम् ॥ इदं मलत्रयं दोषं गुरुणैव विमोचयेत् ॥ ७३ ॥ वातुलतंत्रे ॥ यथा पुरत्रयं दग्धं युगपत्पुरवैरिणा ॥ तथा मलत्रयं दग्धं युगपद्देशिकात्मना ॥ ७४ ॥ तनुत्रयगतानादिमलत्रयमसौ गुरुः ॥

---

करतो, गंध, फूल वगैरे वाहून त्या लिंगाची पूजा करतो; आणि मग त्या मंत्रानें पवित्र झालेल्या लिंगांत शिवकला आणून मिळवितो. ( ६७ ) वीरागमांत ह्मटलें आहे, एकच असणारें प्रणव ह्मणजे ॐकारस्वरूप फार श्रेष्ठ आहे, तें प्राणास मात्र समजतें, तें ज्ञान गुरु मंथन करून शिष्याच्या इष्टलिंगांत आणून मिळवितो. ( ६८ ) अचिन्त्यविश्वसादांत ह्मटलें आहे कीं, गुरु शिष्याच्या प्राणाला घेऊन ह्या लिंगांत स्थापन करितो, व पुनः एकाग्रनिष्ठेनें तें लिंग शिष्याच्या प्राणांत नेऊन मिळवितो. ( ६९ ) देशिक (गुरु) हा परमेश्वर आहे, तो, त्या लिंगासंबंधीं भक्ति जरी फार महत्वाची व कळण्यास फारच कठिण अशी आहे, तरी ती शिष्याला शिकवितो. ( ७० ) तें लिंग फार श्रेष्ठ आहे, तें दृष्टीस पडतें, तें निष्प्रपंच आहे, त्याला कोणत्याही प्रकारची उपाधि नाहीं, त्या लिंगस्वरूपांत ( त्या लिंगांत ) ज्या प्राण्यांचीं सर्व कर्में नाश पावतात, तो धन्य होय. ( ७१ ) असो, त्यानंतर तें लिंग ज्या शिष्याचें अलौकिक सामर्थ्य आहे, त्या शिष्याच्या अंगांत गुरु पूर्वी सांगितलेल्या रीतीनेंच स्थापन करितो. ( ७२ ) गर्भसंबंधीं जो मल असतो त्यास आणवमल ह्मणतात, जातिभेदासंबंधी जे दोष असतात त्यास मायिक ह्मणतात, त्यानांच मोह ह्मणतात. ( ७३ ) पैशासंबंधीं ज्या तीन प्रकारच्या इच्छा असतात त्यांस कार्मिकमल ह्मणतात. हे तीन प्रकारचे मल ( दोष ) गुरूकडून दूर होतात. गुरूखेरीज इतर कोणत्याही मनुष्याकडून हे मल दूर होत नाहींत. ( ७४ ) वातुलतंत्रांत ह्मटलें आहे कीं, ज्याप्रमाणें त्रिपुरांचा विध्वंस करणाऱ्या श्रीशंकरानें त्रिपुरास एकदम जाळून टाकिलें, त्याप्रमाणेंच देशिकानें ( गुरूनें ) त्रिमलांस जाळून टाकिलें. ( ७५ ) स्थूल, सूक्ष्म आणि कारण ह्या तीन शरीरांत असणारे आणवमल, मा-

दीक्षात्रयेण निर्दह्य लिंगत्रयमुपादिशत् ॥ ७६ ॥ वेदमंत्रक्रियाकारा दीक्षा शैवी शिखा मता ॥ तच्छिखा लिंगमित्युक्तं कर्ममायाणुवासना ॥७६॥ सा दीक्षा परमा शैवी त्रिधा भवति निर्मला ॥ एका * वेधात्मिका साक्षादन्या मंत्रात्मिका मता ॥ ७७ ॥ क्रियात्मिकाऽपरा काचिदेवमेव त्रिधा भवेत् ॥ हस्तमस्तकसंयोगच्छलाद्वेधेति गीयते ॥ ७८ ॥ गुरुणोदीरिता कर्णे या सा मंत्रेति कथ्यते ॥ ॥ शिष्यपाणितले दत्ता या दीक्षा सा क्रिया मता ॥ ७९ ॥ त्रिष्वंगेष्वस्य शिष्यस्य लिंगत्रयमयं गुरुः ॥ संयुयोज त्रिधाभूतपरदीक्षाबलेन तु ॥ ८० ॥ योगषट्साहस्रिकायाम् ॥ सर्वांगपूततां प्राप्य यश्च सद्गुरुदीक्षितः ॥ तस्य हस्तस्थिता मुक्तिः सद्गुरोः पाणिसंभवा ॥ ८१ ॥ शाकटिकागमे ॥ वाचातीतं मनोऽतीतं भावातीतं निरंजनम् ॥ नादबिंदुकलातीतं गुरुणा लिंगमुद्भवम् ॥ ८२ ॥ यतो वाचो निव-

---

यामल, आणि कार्मिकमल, गुरु, वेधादीक्षा, मंत्रदीक्षा, आणि क्रियादीक्षा, ह्या तीन दीक्षांच्या साधनानें जाळून टाकून, इष्टलिंग, प्राणलिंग, आणि भावलिंग ह्या तीन लिंगांचा उपदेश करितो. ( ७६ ) वेद, मंत्र, क्रिया या स्वरूपाच्या शिवदीक्षेला शिखा असें ह्मणतात, आणि त्या लिंगाला कर्म, माया, व अणु यांच्या वासना असणारी शिखा असें ह्मणतात. ( ७७ ) ती निर्दोष रीतीची शिवदीक्षा तीन प्रकारची होते ( असते ), ती अशी, एक वेधात्मिका दीक्षा, दुसरी मंत्रात्मिक दीक्षा, ( ७८ ) व तिसरी दीक्षा ती क्रियात्मकदीक्षा आहे, असे दीक्षेचे तीन भेद आहेत. गुरूनें आपला हात शिष्याच्या डोकीवर ठेविला; कीं त्या गुरूच्या हातांचा शिष्याचे मस्तकास स्पर्श होणें ह्यालाच वेधादीक्षा असें ह्मणतात. ( ७९ ) गुरूनें शिष्याचे कानांत हळूच मंत्रोपदेश करणें, ह्याला मंत्रदीक्षा असें ह्मणतात. शिष्याचे तळहातांत गुरूनें इष्टलिंग देणें, याला क्रियादीक्षा असें ह्मणतात. ( ८० ) हा गुरु ह्या तीन प्रकारच्या दीक्षांच्या सामर्थ्यानें शिष्याचे तिन्ही अंगांत ( डोकीवर, कानांत, आणि तळहातांत ) तीन लिंगें आणून भेटवितो. ( ८१ ) योगपट्साहस्रिकेंत ह्मटलें आहे कीं, सद्गुरूनें दीक्षा दिलेल्या मनुष्याचें ( शिष्याचें ) सर्वांग त्या दीक्षेमुळें निष्पाप होऊन, सद्गुरूच्या हातानें मिळणारी मुक्ति त्याच्या अगदीं तळहातांत असल्यासारखी होते. सद्गुरूनें दीक्षा दिल्यावर तो शिष्य अनायासानें मोक्षास जातो. ( ८२ ) शाकटिकागमांत ह्मटलें आहे कीं, गुरूच्या द्वारानें आपणास जें लिंग मिळतें त्याची योग्यता फार मोठी आहे, त्याचें यथार्थ वर्णन वाचेनें करवत नाहीं, मनालाही त्या लिंगाचें यथार्थ ज्ञान होत नाहीं, तें भावानेंही समजण्यासारखें नाहीं, तें निरंजरस्वरूप आहे, नाद, बिंदु आणि कला, ह्यापेक्षां तें पलीकडे आहे. ( ८३ ) गुरूपासून आपणास जें लिंग मि-

तन्ते अप्राप्य मनसा सह ॥ नादबिंदुकलातीतं तल्लिंगं गुरुसंभवम् ॥ ८३ ॥ वेदादिनाम निर्नाम महत्वं मम रूपकम् ॥ गुरूक्तमंत्रमार्गेण इष्टलिंगं तु शांकरि ॥ ८४ ॥ वीरभद्रपुराणे ॥ गुरुर्लिंगं समादाय शिष्यमस्तकसत्कलाम् ॥ निजस्वभावमात्रेण विलोक्याकृष्य तां कलाम् ॥ ८५ ॥ लिंगे संस्थाप्य पादाम्बुस्नानं कृत्वा चरस्य च ॥ तल्लिंगं तत्प्रसादेन भोजयित्वा विधानतः ॥ ८६ ॥ स्कान्दे ॥ लिंगं संस्नाप्य पादांबुना प्रक्षाल्य चरस्य च ॥ तल्लिंगस्य प्रसादं च भोजयित्वा विधानतः ॥ ८७ ॥ पश्चाच्छिष्यकरे दत्वा मूलपंचाक्षरीं स्मरेत् ॥ चरलिंगप्रसादेन भुंजीयाच्च दिने दिने ॥ ८८ ॥ वीरागमे ॥ परंज्योतिः प्रसादं च हस्तमूले सुधारणम् ॥ प्रतिष्ठं गुरुमंत्रस्य श्रुतिस्मृतिष्वगोचरम् ॥ ८९ ॥ वातुलतंत्रे ॥ एकमेव परं लिंगमंगेऽस्मिन् सुप्रतिष्ठितम् ॥ सर्वतोमुखमाभाति नाम-

---

ल्ले त्याची योग्यता फार मोठी आहे, त्याचें वर्णन वाचा करूं लागली म्हणजे थकून जाऊन तेथपर्यंत जाऊन न पोंचतां मधल्यामधेंच मनासह परत फिरते. लिंगाचें यथार्थ वर्णन करण्याचें वाचेचें व मनाचें सामर्थ्य नाहीं. तें लिंग नाद, बिंदु, आणि कला, ह्यांचेपलीकडे आहे ( त्याहून श्रेष्ठ आहे ). शिव म्हणतात (८४) पार्वती, शिष्याला गुरूच्या द्वारानें मंत्रपूर्वक जें इष्टलिंग धारण होतें, त्याचें नांव वेदापेक्षांही आधींचें आहे, त्याला नांवच नाहीं, तें फार महत्वाचें असून तें इष्टलिंग प्रत्यक्ष माझेंच स्वरूप आहे. ( ८५ ) वीरभद्रपुराणांत सांगितलें आहे कीं, गुरु लिंग घेऊन शिष्याच्या मस्तकावरील सत्कलेस आपल्या स्वाभाविक दृष्टीनें पाहून आणि त्या कलेला ओढून घेऊन ( ८६ ) लिंगांत स्थापन करितो; आणि त्या लिंगाला जंगम पादोदकाचा अभिषेक करून तें लिंग शिष्यास अर्पण करितो, आणि यथाविधीनें त्या लिंगाचें प्रसादान्न त्या शिष्यास भक्षणास देतो, व त्याकडून तें खाववितो. ( ८७ ) स्कन्दपुराणांत सांगितलें आहे कीं, त्या इष्टलिंगास जंगमाच्या पादोदकानें अभिषेक केल्यावर, त्या लिंगाचा प्रसाद यथाविधीनें भक्षण करावा. ( ८८ ) त्यानंतर तें इष्टलिंग शिष्याच्या हातांत द्यावें, आणि मूलपंचाक्षरी मंत्राचें स्मरण करावें. व दररोज भक्तानें चराचा प्रसाद आणि लिंगाचा प्रसाद भक्षण करीत जावा. ( ८९ ) वीरागमांत सांगितलें आहे कीं, प्रसाद हें श्रेष्ठ तेज आहे, तें प्रसादान्न हाताच्या मध्यें घ्यावें, त्याच्यांत गुरुमंत्राचें सामर्थ्य असतें; प्रसादान्नाचें सामर्थ्य इतकें आहे कीं, तें वेद, आणि शास्त्र, ह्यांवरूनही यथार्थ रीतीनें समजत नाहीं. ( ९० ) वातुलतंत्रांत म्हटलें आहे कीं, इष्टलिंग हें एकच असून तें श्रेष्ठ आहे; तें ह्या अंगाच्या ठिकाणीं राहतें. त्याला चोहोंकडे मुखें असल्यामुळें नाम, रूप, आणि क्रियास्वरूपानें

रूपक्रियात्मना ॥ ९० ॥ योगसारसंग्रहे ॥ हररूपं कायसंबंधं गुरुरूपं प्राणसंयुतम् ॥ अशरीरमात्मसंबंधं गुरुलिंगचरानुग्रहम् ॥ ९१ ॥ गुरुदेवं शिवं साक्षात्तच्छिष्यो ज्ञानसारवित् ॥ त्रिविधं हृदि संभावः कीर्तितं गौरवं व्रतम् ॥ ९२ ॥ तत्प्राणो लिंगदेहश्च जातो गुरुकरेऽपि च ॥ आचारगौरवं लैंग्यं जंगमं च प्रसादकम् ॥९३॥ महालिंगमिदं ज्ञात्वा षड्विधं व्रतमाचरेत् ॥ इति भेदं न जानाति प्रसादो निष्फलो भवेत् ॥९४॥ लिंगांगेन इसंपन्नो लिंगप्राणदृढीकृतः ॥ अभूत्तद्देशिकेंद्रेण प्रयत्नादीक्षितो नरः ॥ ९५ ॥ एवं कृत्वा गुरुर्लिंगं शिष्यहस्ते निदापयेत् ॥ प्राणवद्धारणीयं तत्प्राणलिंगमिदं भवेत् ॥ ९६ ॥ स्वीकरोति यदा लिंगं गुरुणा दीक्षयाऽणुना ॥ तदा प्रभृति लिंगैक्यमविनाभावयोगतः ॥९७॥ रूपं कर्पूरमाख्यातं तद्गन्धोंऽगमितीरितम् ॥ एतल्लिंगांगसंयोगः शिखिकर्पूरयोगवत् ॥ ९८ ॥ गुरुसंस्मृतभावः स्यां गुरुनिर्मितदेहवान् ॥ विस्मृत्य पूर्वभावं च तदादीन्न समाचरेत् ॥ ९९ ॥ लैंग्ये ॥

---

तें शोभतें. ( ९१ ) योगसारसंग्रहांत ह्मटलें आहे कीं, शिवाचे रूपाचा शरीराशीं संबंध असतो, गुरुरूपाचा प्राणाशीं संबंध असतो. गुरु, लिंग आणि जंगम ह्यांचा आत्म्याशीं संबंध असतो. त्यास शरीर नाहीं. ( ९२ ) गुरुदेव हाच प्रत्यक्ष शिव आहे, त्याचा शिष्य ज्ञानांतील तात्पर्य यथार्थ रीतीनें जाणतो. गुरुदेव, शिव आणि त्यांचा शिष्य ह्यांचे मनांत स्मरण करणें, ह्यास गौरवव्रत असें ह्मणतात. ( ९३ ) गुरूच्या हातामध्येंहीं त्याचा प्राण लिंगदेह होतो. आचार, गौरव, लैंग्य, जंगम, प्रसादक ( ९४ ) आणि महालिंग अशीं हीं षड्विधलिंगें समजून, त्यांचें सहा प्रकारचें व्रत आचरण करावें. महालिंगाचा असा भेद ज्याला समजत नाहीं, त्याचा प्रसाद निष्फळ होतो. ( ९५ ) गुरूनें यथाविधीनें दीक्षा दिलेला मनुष्य लिंगांगसंपन्न होतो, त्याची प्राणलिंगावर भक्ति दृढ होते. ( ९६ ) वर सांगितलेला विधि करून गुरु शिष्याचे हातीं लिंग देतो. हें लिंग प्राणापेक्षां जास्त जपावें लागतें, ह्मणून त्यास प्राणलिंग असें ह्मणतात. ( ९७ ) गुरूपासून सूक्ष्म दीक्षेच्या द्वारानें जेव्हां शिष्य लिंगाचा स्वीकार करितो, त्या दिवसापसून दृढभावानें लिंगैक्य होते. ( ९८ ) रूपास कापूर ह्मणतात आणि कापुराच्या वासाला अंग असें ह्मणतात, त्या कापुराला विस्तव ( दीपाची ज्योति ) लाविली ह्मणजे जी स्थिति होते तशाच रीतीची लिंगांगसंयोगाची स्थिति आहे. ( ९९ ) मला गुरूपासून शिवदीक्षा मिळाल्यावर मी नेहमीं गुरूचे उपकारच स्मरत राहीन. गुरूनें हें शरीर उत्पन्न केलें असें समजेन. आणि त्या दिवसापासून दीक्षा होण्याचे पूर्वींच्या स्थितीचें स्मरण करणार नाहीं. ( १०० ) लिंगपुराणांत ह्मटलें आहे कीं, जसें विस्तवांत सोनें घातलें

यथैव वन्हिसंपर्कान्मलं त्यजति कांचनम् ॥ तथैव गुरुसंपर्कात्पापं त्यजति मानवः ॥ १०० ॥ मुंडकोपनिषदि ॥ भिद्यते हृदयग्रन्थिश्छिद्यन्ते सर्वसंशयाः ॥ क्षीयन्ते चाऽस्य कर्माणि तस्मिन् दृष्टे परात्परे ॥ १०१ ॥ वातुले ॥ तस्मिन् दृष्टे परे लिंगे निष्कले निरुपाधिके ॥ अस्य जीवस्य कर्माणि क्षीयन्ते सकलानि वै ॥१०२॥ अविद्या हृदयग्रन्थिर्भिद्यते शतधापि च ॥ संशया बहुसंकल्पाश्छिद्यन्ते च सहस्रधा ॥ १०३ ॥ सूतसंहितायाम् ॥ प्रकृतिज्ञानकायश्च द्विधा भेदसमन्वितः ॥ तथा *गुणनभावेन ज्ञानकायस्ततो भवेत् ॥ १०४ ॥ शिवरहस्ये ॥ सर्पदष्टस्य यद्देहं तद्देहं विषदेहवत् ॥ लिंगदष्टस्य यद्देहं तद्देहं लिंगदेहवत् ॥ १०५ ॥ योगदीपिकायाम् ॥ यथा संस्कारसंपत्त्या ब्राह्मणो द्विजतामियात् ॥ तथोपदेशसंपत्त्या स्यात्पुमानप्य-लौकिकः ॥ १०६ ॥ तैलयुक्तं च कार्पासं ज्योतिःस्पर्शेन ज्योतिवत् ॥ स्नेहयुक्तश्च सद्भक्तो लिंगस्पर्शेन लिंगवत् ॥ १०७ ॥ मुंडकोपनिषदि ॥ संप्राप्यैनमृषयो ज्ञान-

---

ह्मणजे त्या सोन्याचा मळ नाहींसा होऊन तें स्वच्छ होतें. तसेंच शिष्याला गुरूचा सहवास झाला, ह्मणजे त्या शिष्याचें पाप नाहींसें होतें ( १०१ ) मुण्डकोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, तें श्रेष्ठ परब्रह्मस्वरूप नजरेस पडल्यावर मनांतील हृद्रोग नाहींसा होतो, मनांतील सर्व प्रकारचे संशय नाहींसे होतात, व त्या प्राण्याचीं कर्मेंही नाश पावतात. ( १०२ ) वातुलांत सांगितलें आहे कीं, तें श्रेष्ठ परमात्मलिंग प्रपंचरहित आहे, त्याला कोणत्याही रीतीची उपाधि नाहीं, तें मनुष्याचे नजरेस पडलें असतां ह्या जीवाचीं कर्में नाश पावतात ( १०३ ) अविद्या ( अज्ञान ) रूपीं हृदयरोगाचे तर शंभर तुकडे होऊन जातात. अनेक प्रकारचे कुतर्क असलेले हजारो संशय आले तरी ते पार नाहींसे होतात ( १०४ ) सूतसंहितेंत ह्मटलें आहे कीं, प्रकृतिज्ञानकायाचे दोन भेद आहेत ते असे, पहिलें प्रकृतिकाय दुसरें ज्ञानकाय, ज्यांत प्रकृतिसंबंधीं दुर्गुण नाहींत, त्याला ज्ञानकाय ह्मणतात. ( १०५ ) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, ज्या माणसास साप चावला त्या माणसाचें सर्व शरीर विषमयच होतें, तसें ज्यानें आपल्या शरीरावर लिंगधारण केलें आहे त्याचा देह तर लिंगदेहच समजावा. ( १०६ ) योगदीपिकेंत ह्मटलें आहे कीं, जसा ब्राह्मणकुळांत जन्मलेला मनुष्य असला तरी त्याचें मौंजीबंधन होऊन त्यास संस्कार झाले ह्मणजे तो मनुष्य ब्राह्मणपणा पावतो, तसा शिष्याला गुरूचा उपदेश झाला ह्मणजे त्या गुरूपदेशाच्या सामर्थ्यानें तो शिष्य अलौकिक सामर्थ्यवान् होतो. ( १०७ ) तेलांत भिजविलेली कापसाची वात तिला दिव्याची ज्योति लागली ह्मणजे अगदीं दिव्यासारखी ( दिवाच ) होते; तसा गुरूविषयीं मनांत प्रेम असणारा सद्भक्त लिंगाचा स्पर्श होतांच लिंगस्वरूपच होतो. ( १०८ ) मुण्ड-

तृप्ताः कृतात्मानो वीतरागाः प्रशान्तास्ते सर्वगं सर्वतः प्राप्य धीरा युक्तात्मानस्सर्वमेव विशन्ति ॥ १०८ ॥ शिवाद्वैते ॥ ऋजवो मृदवः शुद्धा विनीताः स्थिरचेतसः ॥ शौचाचारसमोपेताः शिष्यास्तेऽत्र प्रकीर्तिताः ॥ १०९ ॥ वातुले ॥ आकृष्टास्ताडिता वाऽपि ये विषादं न यांति हि ॥ ते योग्यास्संयुताः शिष्याः शिवसंस्कारकर्मणि ॥ ११० ॥ शिवाद्वैते ॥ प्रह्वीभावं समासाद्य मनोवाक्कायकर्मभिः ॥ गुरुभक्तिः सदा यस्य स शिष्य इति कथ्यते ॥ १११ ॥ सिद्धान्तशिखामणौ ॥ गुरौ निजगुणाधारे मनोवाक्कायकर्मभिः ॥ भावो यस्य स्थितो नित्यं स शिष्य इति गीयते ॥ ११२ ॥ कर्मणा मनसा वाचा गुरूणां भक्तिवत्सलाः ॥ शरीरमर्थं प्राणं च सद्गुरुभ्यो निवेदयेत् ॥ ११३ ॥ अन्यथा वित्तहीनोऽपि गुरवे तत्परायणः ॥ कृत्वा दंडनमस्कारं स्वशरीरं निवेदयेत् ॥ ११४ ॥ दीर्घदण्डनम-

---

कोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, तें आत्मस्वरूपज्ञान मिळालें असतां ( झालें असतां ), तें ज्ञान झालेलें ऋषीश्वर ज्ञानानें तृप्त होतात, त्यांच्या जन्मास येण्याचें सार्थक्य होतें. त्यांस वैराग्य होऊन त्यांचें मन शांत होतें, तें परमात्मस्वरूप सर्व शक्तिमान् असल्यामुळें धैर्यवान् पुरुष चोहोंकडून त्या आत्मस्वरूपांतच लीन होतांत ( १०९ ) शिवाद्वैतांत ह्मटलें आहे, जे लोक स्वभावानें निष्कपट आहेत, ज्यांचा स्वभाव प्रेमळ आहे जे निर्दोष असून नम्र स्वभावाचे आहेत, ज्यांचीं मनें स्थिर आहेत, ज्यांचे आचार शुद्धपणाचे आहत, त्यांस ह्या जगांत शिष्य असे ह्मणावें. ( ११० ) वातुलांत ह्मटलें आहे कीं, ज्यांस ओढून नेलें किंवा पुष्कळ मारिलें तरी त्याबद्दल कांहींच वाईट वाटत नाहीं, ते शिष्य शिवसंस्कारकर्मांत योग्य आहेत असें समजावें, ते चांगल्या स्वभावाचे आहेत असे मानावें. ( १११ ) शिवाद्वैतांत सांगितलें आहे कीं, जो शिष्य नम्रपणानें मन, वचन, व काया, यांनीं नेहमीं गुरूची भक्ति करितो, त्यास शिष्य असें ह्मणावें. ( ११२ ) सिद्धांतशिखामणींत ह्मटलें आहे कीं, आपला गुरु हा आपल्यास चांगले चांगले गुण शिकविण्याला मूळकारण आहे, त्या गुरूविषयीं कायावाचामनेंकरून ज्याचा नेहमीं पूर्ण विश्वास आहे, त्याला शिष्य असें ह्मणावें. ( ११३ ) स्वतः शरीर झिजवून, मनानें व वाचेनें ज्यांना गुरूची भक्ति करण्याची आवड आहे, त्या शिष्यांनीं आपलें शरीर, द्रव्य आणि प्राण गुरूला अर्पण करावें. ( ११४ ) किंवा कोणाजवळ जर पैसाच नसेल तर त्यानें गुरूची मनोभावें सेवा करावी. त्याला दण्डासारखा जमिनीवर नमस्कार घालावा, व आपलें शरीर त्यानें गुरूला अर्पण करावें. ( ११५ ) गुरूचे जवळ शिष्यानें लाज मुळींच धरूं नये, गुरु जें जें काम करण्यास सांगेल, तें तें मनापासून करावें; जमिनीवर लांबवर आडवें पडून गुरूला दण्डासारखा नमस्कार करावा;

मस्कारो निर्लज्जो गुरुसन्निधौ ॥ शरीरमर्थं प्राणं च सद्गुरुभ्यो निवेदयेत् ॥११६॥ श्रीमान्महातपा ज्ञानी शास्त्रज्ञः कुलजो महान् ॥ कुर्यांद्दण्डनमस्कारं निर्लज्जो गुरुसन्निधौ ॥ ११६ ॥ मानवपुराणे ॥ शिवे क्रुद्धे गुरुस्त्राता गुरौ क्रुद्धे न कश्चन ॥ तस्मादिष्टं गुरोः कार्यं कायेन मनसा गिरा ॥ ११७ ॥ क्रियासारे ॥ ईश्वर उवाच ॥ देवयात्रा गुरोर्यात्रा तीर्थयात्रेति च त्रिधा ॥ आसां त्रिविधयात्राणां गुरुयात्रा फलाधिका ॥ ११८ ॥ गुरुसंदर्शनार्थन्तु भक्त्या यात्रां करोति यः ॥ पुण्यदेही स विज्ञेयस्समस्तामरवल्लभः ॥ ११९ ॥ शिष्यो गुरुस्थितं ग्रामं प्रविशन्वाहनादिकम् ॥ वर्जयेद्गृहसामीप्यं उष्णीषं पादुके अपि १२० ॥ क्रियासारे ॥ उक्तलक्षणसम्पन्नो यस्मिन्देशे गुरुः स्थितः ॥ तत्र शिष्यः स्वयं गत्वा प्रणमेद्दण्डवद्गुरुम् ॥ १२१ ॥ फलं प्रसूनं तांबूलमन्यत्किमपि वस्तु च ॥ एष्वेकं गुरवे दत्वा नमस्कुर्यात्ततो गुरुम् ॥ १२२ ॥ उपचारेषु सर्वेषु द्वावेवात्यन्तशोभनौ ॥

---

त्या शिष्यानें सद्गुरूला शरीर, द्रव्य आणि प्राण अर्पण करावा. (११६) जरी शिष्य मोठा श्रीमंत मनुष्य असला, मोठा तपस्वी असला, तरी त्यानें न लाजतां गुरुजवळ विनदिक्कत डण्डासारखा नमस्कार घालावा. (११७) मानवपुराणांत सांगितलें आहे कीं, शिव रागावला तर गुरु रक्षण करितो, व गुरु रागावला तर शिवाच्यानें गुरूपासून शिष्याचें रक्षण करवत नाहीं, ह्यासाठीं शिष्यानें मनानें, वाचेनें आणि स्वतः अंगमेहनत करून गुरूला आवडेल असेंच काम करीत असावें. (११८) क्रियासारांत ह्मटलें आहे कीं, देवयात्रा, गुरुयात्रा, आणि तीर्थयात्रा, अशा तीन प्रकारच्या यात्रा मानल्या आहेत. ह्या तीन प्रकारच्या यात्रांपैकीं गुरूची यात्राच ज्यास्त कल्याणकारक आहे. (११९) जो भक्त गुरूचें दर्शन घ्यावयासाठीं भक्तिभावानें यात्रा करितो, तो मनुष्य मोठा पुण्यवान् समजावा; सर्व देवांत इंद्र जसा श्रेष्ठ आहे, तसा तो गुरुभक्त सर्व मनुष्यांत श्रेष्ठ आहे. (१२०) शिष्यानें गुरूचें दर्शन घ्यावयासाठीं गुरूचे गांवास जाणें झालें तर घोडें गाडी करून जाण्यास हरकत नाहीं. परंतु, गुरूचें घर जवळ येतांच त्यानें अगोदर घोड्यावरून किंवा गाडींतून खालीं उतरून डोकीचें पागोटें आणि पायांतील जोडा काढून ठेवून नम्रपणानें गुरूकडे जावें. (१२१) क्रियासारांत सांगितलें आहे कीं, गुरूच्या अंगीं जितके गुण असावेत ह्मणून सांगितले आहेत, तितके सर्व गुण अंगीं असणारा गुरु ज्या ठिकाणीं राहत असेल, तेथें शिष्यानें स्वतः जाऊन गुरूला दण्डासारखा नमस्कार करावा. (१२२) गुरूचें दर्शन झाल्याबरोबर अगोदर नारळ किंवा दुसरें एखादें फळ, फूल, विडा किंवा दुसरी एखादी गुरूस अर्पण करावयासारखी वस्तु, यांपैकीं कांहींतरी एक अगोदर गुरूपुढें ठेवून मग गुरूला नमस्कार करावा. (१२३) अनेक प्रकारचे उपचार आहेत; परंतु

प्रियवाक् च प्रणामश्च तौ विनान्ये वृथा श्रमः ॥ १२३ ॥ पदे पदांतरं न्यस्य करौ चलनवर्जितौ ॥ स्तुतिर्वाचा हृदि ध्यानं चतुरंगं प्रदक्षिणम् ॥१२४॥ नापृच्छन्नामुखो ब्रूयाद्गुरोरग्रे कदाचन ॥ स्वामिभट्टारकाचार्यदेवश्रीगुरुनामभिः ॥ १२५ ॥ अंगुलीपर्वस्फोटं च पादप्रक्षालनं तथा ॥ तद्वाक्यप्रतिकूलं च न कुर्याद्गुरुसन्निधौ ॥१२६॥ अपहास्यमवष्टंभं लीलयांघ्रिप्रसारणम् ॥ विनोदोज्ज्वलवेषं च पर्यंकं दन्तधावनम् ॥ १२७ ॥ परिहासविहीनस्य पुंसो जन्म निरर्थकम् ॥ गुरुणापि समं हास्यं कर्तव्यं कुटिलं विना ॥ १२८ ॥ एकासनेऽपि विपये गुरुणा सह मोदते ॥ प्रायश्चित्तं न तस्यास्ति पापं गुरुतरं हि तत् ॥ १२९ ॥ प्रदक्षिणं नमस्कारं कुर्यात्पादाब्जसेवनम् ॥ पयसाज्येन दध्ना वा शुद्धेनांघ्रिप्रलेपनम् ॥ १३० ॥ शंभु-

---

त्या सर्वांत गोड बोलणें आणि नमस्कार करणें हे दोन उपचार मात्र फारच चांगले आहेत. हे दोन उपचार नसतील तर बाकींचे सर्व उपचार फुकट आहेत. (१२४) पायाला पाय जुळून उभे राहणें हात इकडे तिकडे न हालवितां एका जागीं ठेवणें, वाचेनें गुरूची स्तुति करणें, आणि मनांत गुरूचें ध्यान करणें, ही चार प्रकारची प्रदक्षिणा आहे, (१२५) शिष्यांनीं गुरूजवळ त्यांनीं विचारल्याखेरीज बोलूं नये, किंवा बोलण्याचें कारण पडलें तर त्यानें गुरूचें प्रत्यक्ष नांव घेऊन बोलूं नये. बोलतांना स्वामी, भट्टारक, आचार्य, देव, गुरु, अशीं सन्मानांचीं नांवें घेऊन बोलावें. (१२६) गुरुजवळ शिष्यानें बसल्यावर हातापायांचीं बोटें मोडूं नयेत. किंवा पाय पसरून बसूं नये. गुरु ज्यासंबंधानें बोलतात त्याचा विरुद्धपक्ष घेऊन त्यांस प्रत्युत्तर देऊं नये; कां तर अशानें गुरूचा अपमान होतो. (१२७) जो कोणी शिष्य गुरूबरोबर बोलतां चालतां त्यांची निंदा करील, तसाच बाठ उभा राहील, बसेल, सहज रीतीनें पाय पसरील, गुरूची थट्टा करील, गमतीनें नखरेबाज पोषाख करील, गुरूसमक्ष पलंगावर बसेल,. गुरूसमक्ष दांत घांशील, (१२८) त्या अशा तऱ्हेनें गुरूचा अपमान करणाऱ्या शिष्याचे जन्म व्यर्थ गेलें, असें समजावें. गुरूबरोबर बोलतांना हंसण्याचा प्रसंगच आला, तर एका बाजूला तोंड करून किंचित् हंसावें, गुरूच्या तोंडाकडे पाहून उगीच खदखदां हंसूं नये. (१२९) जो शिष्य गुरूबरोबर एकाच आसनावर बसून त्याचे बरोबर दिवसभर मौजेनें इकडच्या तिकडच्या गप्पागोष्टी सांगण्यांत वेळ घालवितो, त्याच्या पापाला प्रायश्चित्तच नाहीं, त्याचें पाप अतिशय मोठें आहे (१३०) शिष्यानें गुरूला प्रदक्षिणा करावी, नमस्कार करावा, त्याचे पाय रगडावे, त्याच्या पायावर दूध, दहीं यांचा अभिषेक करून स्वच्छ पाण्यानें ते चांगले धुवावे (१३१) शंभु-

प्रभायाम् ॥ प्रशान्तं गुरुमभ्येत्य शिवज्ञानामृतांबुधिम् ॥ भजेत सततं यस्तु स शिष्य इति कथ्यते ॥ १३१ ॥ क्रियासारे ॥ ततः श्लक्ष्णैर्मुद्गचूर्णैः कोष्णेन सलिलेन च ॥ संप्रक्षाल्याथ वस्त्रेण तथार्द्रत्वप्रमार्जनम् ॥ १३२ ॥ शय्यासंस्तरणं सम्यक्केशसंमार्जनं नखैः ॥ तैलाभ्यंगक्रियाचारस्नानकर्म यथासुखम् ॥ १३३ ॥ शौचार्थं मृज्जलादीनि दन्तकाष्ठप्रदेशनम् ॥ पूजास्थानानुलेपं च गोमयेन सवारिणा ॥ १३४ ॥ शुभकार्येषु सर्वेषु विवादादिषु भक्तितः ॥ गुरुमभ्यर्चयेच्छिष्यो वस्त्रहेमांगुलीयकैः ॥ १३५ ॥ विशीर्णं स्फुटितं दग्धं प्राक्तनं स्वधृतं पुरा ॥ दष्टमाख्वादिभिर्वस्त्रं न दद्याद्गुरवे बुधः ॥ १३६ ॥ समीपे वापि दूरे वा स्वशरीरं निवेदनम् ॥ गत्यागत्यादिकायासे स्वभार्यानंदनैस्तथा ॥ १३७ ॥ क्रियासारे ॥ स्वाचार्यचरणद्वंद्वप्रक्षालितजलं सदा ॥ यः पिबेद्धारयेद्भक्त्या सर्वपापैः

---

प्रभेंत सांगितलें आहे कीं, गुरु फार शांत स्वभावाचा असतो, तो शिवज्ञानरूप अमृताचा समुद्र आहे, त्या गुरूचीं जो एकाग्रमनानें नेहमीं भक्ति करितो त्यांस शिष्य ह्मणावें. ( १३२ ) क्रियासारांत सांगितलें आहे कीं, शिष्यानें गुरूच्या पायांना चांगली सुवासिक उटणीं आणि पिठें लावून कोमट कोमट पाण्यानें ते पाय धुवून चांगले पुसून कोरडे करावे. ( १३३ ) नंतर त्यांस बसण्यास एखादें चांगलें आसन त्यावर स्वच्छ चादर घालून द्यावें, आपल्या नखांनीं त्यांच्या डोकीवरील केंसांची गुतागुत झाली असलेली काढावी, नंतर स्वामींच्या अंगास सुगंधि उटणीं लावून त्यांस संतोष होईल अशा तऱ्हेनें कमीजास्ती पाणी घालून स्नान घालावें. ( १३४ ) स्नानाचे पूर्वीं त्यांस परसाकडेस जावयाचें असल्यास त्याकरितां माती, पाणी वगैरे काय लागेल ते आणून द्यावें. दांत घांसण्यास दांतकाडी आणून द्यावी. त्यांस ज्या ठिकाणीं लिंगपूजा करावयाची असेल ती जागा स्वच्छ पाणी घेऊन ताज्या शेणानें सारवून द्यावी. ( १३५ ) ज्या ज्या वेळीं शिष्याच्या घरीं कांहीं लग्न, कार्य वगैरे मंगलकार्य होईल; त्या त्या वेळीं त्यानें गुरूस उंचीं वस्त्रें, सोन्याच्या आंगठ्या वगैरे देऊन गुरूची संभावना करावी. ( १३६ ) जें वस्त्र अगदीं जुनें झालें असेल, फाटलें असेल, जळलें असेल, अगदींच झिरझिरें झालें असेल, पूर्वीं आपण वापरलें असेल, किंवा उंदरांनीं वगैरे कुरतुडलें असल, असें वस्त्र शहाण्या शिष्यानें गुरूला देऊं नये. ( १३७ ) गुरु जवळ असो, किंवा लांब असो, त्याला भक्तानें आपलें शरीर अर्पण करावें, गुरूकडे जाण्यायेण्याची फार दगदग पडूं लागली; तर निदान बायकामुलांच्या हातून तरी गुरूचा परामर्ष घेववावा. ( १३८ ) क्रियासारांत सांगितलें आहे कीं, जो भक्त भक्तिभावानें आपल्या गुरूचें

प्रमुच्यते ॥ १३८ ॥ स्कान्दे ॥ गुरुपादोदकस्नानं गुरूच्छिष्टं तु सेवयेत् । ॥ गुरुमूर्तिं सदा ध्यायेत् गुरुनाम सदा जपेत् ॥ १३९ ॥ बोधायनोपनिषदि ॥ गुरूच्छिष्टप्रसादप्रक्षालिततीर्थग्रहणमुखेन दीक्षान्यायमाहुः ॥ १४० ॥ पादोदकं पाशहरं निर्माल्यं चैहिकप्रदम् ॥ गुरुभुक्तं सदाकालमामुष्मिकफलप्रदम् ॥ १४१ ॥ ॥ स्कांदे ॥ गुरुपादोदकं नित्यं सेवेत गुरुपूजकः ॥ गुरूच्छिष्टपुरोडाशं भुंजीयाद्भक्तिनम्रधीः ॥ १४२ ॥ क्रियासारे ॥ ईश्वर उवाच ॥ यो भक्त्या स्वगुरोर्भक्तः शिष्यः पात्रेऽन्नमुज्झितम् ॥ भुंक्ते स सर्वदुरितैर्मुच्यते नात्र संशयः ॥ १४३ ॥ प्रदत्तं यत्स्वगुरुणा तांबूलं परिचर्वितम् ॥ शिष्यस्तद्भक्षयेद्भक्त्या शुद्धान्तःकरणो भवेत् ॥ १४४ ॥ शिष्यस्तु शिक्षणीयत्वाद्गुरुर्गौरवकारणात् ॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन गुरोर्गौरवमाचरेत् ॥ १४५ ॥ गुरोः प्रीतिकरः शिष्यो यस्य प्रीतिकरो मम ॥

---

दोन्ही पाय धुतलेलें पाणी पितो, त्याचीं सर्व पापें नाश पावतात. ( १३९ ) स्कंदपुराणांत ह्मटलें आहे कीं, शिष्यानें गुरूचे पाय धुतलेल्या पाण्यानें आंघोळ करावी, गुरूचें उष्टें अन्न प्रसाद ह्मणून भक्षण करावें, गुरूच्या रूपाचें नेहमीं ध्यान करावें, व गुरूचें नांव नेहमीं तोंडानें घेत जावें. ( १४० ) बोधायनोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, गुरूचें उष्टें अन्न हा प्रसाद समजावा, व गुरूचें पाय धुतलेलें पाणी तें तीर्थ समजावें. त्यांचें नेहमीं सेवन करणें ही दीक्षेची एक रीति आहे असें ह्मणतात. ( १४१ ) गुरूचें पाय धुतलेलें पाणी ( पादोदक ) सेवन केलें असतां संसाररूप पाशांतून मुक्तता होते, निर्माल्य ग्रहण केलें तर ह्या लोकींचीं सर्व सुखें उपभोग घ्यावयास मिळतात. गुरूचें उष्टें अन्न प्रसादान्न ह्मणून नेहमीं भक्षण केलें तर परलोकीं अत्यंत सुख लागतें. ( १४२ ) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, गुरूची पूजा करणारा ( भक्त ) गुरूच्या पायाचें पाणी नेहमीं पितो; व भक्तीमुळें नम्रस्वभावाचा तो शिष्य गुरूचें उष्टें अन्न पुरोडाशासारखें ( यज्ञांतील भागाप्रमाणें ) पवित्र मानून भक्षण करितो. ( १४३ ) क्रियासारांत शिवांनीं ह्मटलें आहे कीं, जो भक्त आपल्या गुरूच्या पात्रांत उरलेलें उष्टें अन्न भक्तिभावानें नेहमीं भक्षण करितो, तो सर्व पापांपासून मुक्त होतो; ह्यांत संशय नाहीं. ( १४४ ) गुरूनें आपल्या तोंडांतील चावलेला विडा जर शिष्यास दिला, आणि तो शिष्यानें भक्तिभावानें भक्षण केला; तर त्या शिष्याचें अंतःकरण निष्पाप होतें. ( १४५ ) गुरु आपल्या शिष्याला उत्तम प्रकारचें शिक्षण देतो, व त्या गुरूच्या अंगीं स्वतः मोठेपणा असल्यामुळें त्या गुरूस गुरु ( मोठा ) असें नांव पडलें. ह्यासाठीं हरप्रयत्नानें गुरूचा संन्मान ठेवांवा. ( १४६ ) शिव ह्मणतात–पार्वती, ज्या शिष्यावर गुरूची प्रीति

तस्याप्रीतिकरः शिष्यो ममाप्रीतिकरो भृशम् ॥ १४६ ॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन गुरोः प्रीतिकरो भवेत् ॥ गुरुभक्तिविहीनस्य मयि भक्तिर्वृथा भवेत् ॥ १४७ ॥ यजुर्वेदोपनिषदि ॥ वेदमनूच्याचार्योऽन्तेवासिनमनुशास्ति सत्यं वद धर्मं चर स्वाध्याया-न्माप्रमदः भूत्यै न प्रमदितव्यं मातृदेवो भव पितृदेवो भव आचार्यदेवो भव अतिथिदेवो भव यान्यनवद्यानि कर्माणि तानि सेवितव्यानि नो इतराणि यान्यस्माकं सुचरि-तानि तानि त्वयोपास्यानि नो इतराणि एष उपदेशः ॥ १४८ ॥ कैवल्योपनिषदि ॥ यावदुपाधिपर्यंतं गुरुं शुश्रूषयेत् ॥ १४९ ॥ परातश्रुतौ ॥ तस्माच्छुश्रूषुः पुत्राणां हृद्यतमः नेदिष्ठो ब्राह्मणो भवति ॥ १५० ॥ सिद्धान्तशेखरे ॥ गुरुशुश्रूषणं कार्यं गुरोर्वाक्यानुवर्तनम् ॥ सदा गुरुपरो नित्यं गुरोराज्ञां न लंघयेत् ॥ १५१ ॥ सूत-संहितायाम् ॥ परमाद्वैतविज्ञाननिष्ठस्य परयोगिनः ॥ शुश्रूषा शुद्धविद्यायाः साधनं

---

असते, व जो शिष्य गुरूला मनापासून आवडतो, त्या शिष्यावर माझी प्रीति आ-सून तो मला मनापासून आवडतो; जो शिष्य गुरूच्या प्रीतींतला नसतो, त्या शिष्यावर माझीही प्रीति नसते. ( १४७ ) ह्यासाठीं शिष्यानें हरप्रयत्नानें गुरूची प्रीति संपादन करावी. ज्या शिष्याची गुरूवर भक्ति नाहीं, त्यानें माझी पुष्कळ भक्ति केली तरी ती व्यर्थ आहे. ( १४८ ) यजुर्वेदोपनिषदांत सांगितलें आहे कीं, वेदाला अनुसरून गुरु आपल्या शिष्याला उपदेश करीत असतो, अरे मुला, तूं, खरें बोलत जा, धर्माप्रमाणें आचरण कर, वेद पठन करण्यास आळस करूं नकोस, आपलें कल्याण ज्या रीतीनें होईल त्या गोष्टीकडे दुर्लक्ष्य करूं नकोस, तूं आईस देवासारखें मान, बापास देवासारखें मान, आपल्या गुरूस देवासारखें मान, अति-थीस देवासारखें मान, जीं जीं निर्दोष कामें असतील तीं तीं करीत जा, भलतींसलतीं दुसरीं वाईट कामें करूं नकोस, लोकांमध्यें जीं कामें चांगलीं ह्मणून मानलेलीं आ-हेत तीं तूं करीत जा, दुसरीं वाईट कामें करूं नकोस; हें तुला माझें सांगणें आहे, हा तुला माझा उपदेश आहे. ( १४९ ) कैवल्योपनिषदांत सांगितलें आहे कीं, गु-रूला त्रास येईपर्यंत गुरूची सेवा करावी. ( १५० ) परातश्रुतींत सांगितलें आहे कीं, ह्यासाठीं सेवा करणारा भक्त गुरूला मुलापेक्षां जास्त प्रिय होतो; गुरूला सेवा करणाऱ्या भक्तापेक्षां मुलगा प्रिय नसतो, नेहमीं जवळ राहणारा कोणी असला तरी तो प्रिय नसतो, किंवा नेहमीं जवळ राहणारा ब्राह्मण असला तरी तो प्रिय नसतो. ( १५१ ) सिद्धान्तशेखरांत सांगितलें आहे कीं, शिष्यानें नेहमीं गुरूची सेवा करावी, गुरूचे सांगण्याप्रमाणें वागावें, नेहमीं गुरूचे आज्ञेंत दक्ष ( तत्पर ) असावें, गुरूची आज्ञा कधींही मोडूं नये. ( १५२ ) सूतसंहितेंत सांगितलें आहे कीं, उत्तम प्रकारच्या ( श्रेष्ठ ) अद्वैतज्ञानावर विश्वास असणाऱ्या शिवयोग्याची सेवा

न हि संशयः ॥ १६२ ॥ ऐतरेयोपनिषदि ॥ अथाधिविद्यमाचार्यः पूर्वरूपं अन्तेवास्युत्तररूपं विद्यासंधिः प्रवचनं संधानम् ॥ १६३ ॥ ग्रंथान्तरे ॥ उपायैर्न शिवो भाति भान्ति ते तत्प्रसादतः ॥ स एवाहं स्वप्रकाशो भाति विश्वप्रकाशकः ॥ १६४ ॥

॥ श्रीगुरुबसवलिंगाय नमः ॥

## ॥ चतुर्दशप्रकरणम् ॥

एवं लिंगधारणसम्पन्नो भक्तः सर्वांगेष्वालिंगितगुरुमाहात्म्यं यथेत्याकांक्षायामनंतरं गुरुमाहात्म्यस्थलमित्युच्यते ॥ अथर्वणवेदे ॥ कदंबगोलकाकारो विश्वस्यातिहितो वपुर्धत्ते जगद्धितार्थं वेदादिनिगमैः प्रणवादिमंत्रैः क्रियादिकर्मणे आत्माऽयं बोधः स रुद्रः स चरः द्विभुजः त्र्यक्षः द्विपाद् एकशिरा एको रुद्र आचार्यरूपः ॥ १ ॥ वीरागमे ॥ ललाटलोचनं चांद्रीं कलामपि च दोर्द्वयम् ॥

---

करणें, हें सर्व विद्या प्राप्त करून घेण्याचें साधन आहे, ह्यांत शंका नाहीं. (गुरूची सेवा केल्यानें विद्या प्राप्त होते). (१५३) ऐतरेयोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, ज्याला सर्व प्रकारची विद्या येत आहे (जो विद्या चांगले तऱ्हेनें शिकला आहे), तो आचार्य पूर्वरूप आहे, शिष्य हा उत्तररूप आहे, विद्या ही संधि असून प्रवचन (वेदांतील वाक्यें) हें संधान आहे. (१५४) इतर दुसऱ्या ग्रन्थांत असें सांगितलें आहे कीं, अनेक प्रकारचे दुसरे उपाय केले तरी शिव दिसत नाहीं, तो शिव त्या श्रीगुरूच्या कृपेनेंच दिसतो. तो गुरूच मी स्वतः शिव आहे. मी स्वयंप्रकाश असून माझ्या तेजामुळें हें सर्व विश्व शोभतें. तो मी शिव गुरुरूपानें पृथ्वीवर अवतरलों आहें.

श्रीगुरुबसवलिंगास नमस्कार असो. आतां ह्यापुढें गुरुमाहात्म्यस्थल सांगण्यास आरंभ करितों. ह्याप्रमाणें लिंगधारण केलेल्या भक्ताच्या सर्वांगाच्या ठिकाणीं गुरुमाहात्म्य व्यापलें गेल्यावर व तें गुरुमाहात्म्य कसें असतें तें समजून घेण्याची मनास इच्छा झाल्यावर, गुरुमाहात्म्यस्थल कसें असतें तें सांगतों. (१) अथर्वणवेदांत ह्मटलें आहे कीं, कदंबाच्या कळीसारखें गोल आकृति असणारें, जगाचें अतिशय कल्याण करणारें शरीर, लोकांचें कल्याण करावयासाठीं धारण करितो, वेद वगैरे नियमांनीं, ॐकार वगैरे मंत्रांनीं क्रिया वगैरे कर्मांकरितां हा आत्मस्वरूप झाला आहे हा गुरु ज्ञानी आहे, तो गुरूच प्रत्यक्ष शिव आहे, तो जंगम आहे, त्याला दोन हात आहेत, तीन डोळे आहेत, दोन पाय व एक मस्तक आहे, हा आचार्य (गुरु) प्रत्यक्ष रुद्रच आहे. (२) वीरागमांत शिवांनीं पार्वतीला ह्मटलें आहे,

अन्तर्निधाय वर्तेऽहं गुरुरूपो महेश्वरि ॥ २ ॥ लैंग्ये ॥ स्पर्शादप्याधिकं मन्ये गुरुपादसरोरुहम् ॥ स्पर्शश्च कुरुते स्वर्णं गुरुरात्मसमं हि तत् ॥ ३ ॥ श्रीरत्नाकरे ॥ परमेश्वर उवाच ॥ गुरुमूर्तिः शिवः साक्षान्नान्यथा च सुरेश्वर ॥ वसते पादयुग्मे तु त्रैलोक्यं सचराचरम् ॥ ४ ॥ शिवरहस्ये ॥ अंगुष्ठाग्रे चाष्टषष्ठितीर्थांनि हि वसंति वै ॥ नक्षत्रग्रहवृंदानि गुल्फे तस्य वसन्ति वै ॥ ५ ॥ सप्ताब्धयश्च पादाधस्तदूर्ध्वेऽष्टकुला नगाः ॥ जंघयोर्वसते नित्यं षट्त्रिंशत्तत्वरूपकम् ॥ ६ ॥ जंगमस्थावराधारनिर्मलस्थिरचेतसे ॥ जगद्वंदितपादाय तस्मै श्रीगुरवे नमः ॥ ७ ॥ चैतन्यं शाश्वतं शान्तं व्योमातीतं निरंजनम् ॥ नादबिंदुकलातीतं तस्मै श्रीगुरवे नमः ॥ ८ ॥ वाचातीतं मनोऽतीतं भावातीतं निरंजनम् ॥ नादबिंदुकलातीतं तस्मै श्रीगुरवे नमः ॥ ९ ॥ निराकारं निरालंबं निर्मलं निर्विकल्पकम् ॥ निर्गुणं

---

कीं, पार्वती, मी आपल्या कपाळावरील एक डोळा, चंद्राची कला आणि मला चार हात आहेत, त्यांपैकीं दोन हात, आपल्या स्वरूपांत गुप्त करून गुरूचें रूप घेऊन पृथ्वीवर फिरतों '' ( गुरु प्रत्यक्ष माझेंच स्वरूप आहे असें समज ). ( ३ ) लिंगपुराणांत ह्मटलें आहे कीं, परिसमण्यापेक्षां श्रीगुरूचें चरणकमल श्रेष्ठ आहेत असें मी मानतों. कां तर परिसमणि फार झालें तर लोखंडास सोनें करितो; लोखंडास परिस करीत नाहीं. परंतु तर आपल्या शिष्यास अगदीं आपल्या सारखा करितो. ( ४ ) श्रीरत्नाकरांत परमेश्वर ( शिव ) ह्मणतात—इंद्रा, हा गुरु प्रत्यक्ष श्रीशंकर आहे असें समज, दुसरा कोणी नव्हे. त्या गुरूच्या दोन्ही पायांत हें स्थावरजंगम विश्व राहतें. ( ५ ) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, त्या गुरूच्या आंगठ्याच्या टोकांत ६८ अडुसष्ट तीर्थें राहतात, नक्षत्रें व नवग्रहांचे समुदाय त्या गुरूच्या पायांत घोट्यांत राहतात. ( ६ ) गुरूच्या तळपायांत सात समुद्र राहतात, त्याच्या पायांवर आठ कुलपर्वत राहतात, तसेंच गुरूच्या दोन्ही पायांच्या पोटऱ्यांवर नेहमीं छत्तीस तत्वें राहतात. ( ७ ) ह्या श्रीगुरू जंगम आणि स्थावर जीवांस ( चरांचर ) आश्रय देणारा असून त्याचें मन निर्मळ आणि शांत असतें. त्रैलोक्य ज्याच्या चरणकमलाला नमस्कार करितें, त्या श्रीगुरूला नमस्कार असो. ( ८ ) गुरु हा चैतन्यस्वरूप आहे, तो चिरकाल राहणारा आहे, त्याचा स्वभाव शांत आहे, तो आकाशाहून पलीकडे आहे ( तो आकाशापेक्षां देखील मोंठा आहे ) त्याला निरंजन ह्मणतात. नाद, बिंदु आणि कला ह्यांपेक्षां गुरु श्रेष्ठ आहे, त्या श्रीगुरूला नमस्कार असो. ( ९ ) गुरूचें स्वरूप वाचेनें सांगतां येत नाहीं, मनानें चिंतन करितां येत नाहीं भावाहूनही श्रेष्ठ आहें, तें निरंजन आहे, नाद, बिंदु आणि कला ह्यांच्याही पलीकडे आहे, त्या श्रीगुरूला नमस्कार असो. ( १० ) गुरू हा निराकार आहे, त्याला कोणाचाही

निश्चलं नित्यं परात्परपदं गुरुः ॥ १० ॥ निःशब्दश्च निरालंबो निश्शून्यश्च निराश्रयः ॥ निर्देहो निर्मलो नित्यो गुरुदेवो नमोऽस्तु ते ॥ ११ ॥ यो गुरुः स शिवः प्रोक्तो यः शिवः स गुरुः स्मृतः ॥ भुक्तिमुक्तिप्रदात्रे च तस्मै श्रीगुरवे नमः ॥ १२ ॥ गुरुर्देवो महादेवो गुरुर्देवः सदाशिवः ॥ गुरुर्दैवात्परं नास्ति तस्मै श्रीगुरवे नमः ॥ १३ ॥ परः शिवो गुरुर्भूत्वा शिष्यदीक्षादिकारणात् ॥ विश्वातीतो महाचोद्यश्चोद्यरूपाय वै नमः ॥ १४ ॥ ब्रह्मा विष्णुश्च रुद्रश्च ईश्वरश्च सदाशिवः ॥ एते गर्भगता ज्ञेयास्तस्मै श्रीगुरवे नमः ॥ १६ ॥ अखंडमंडलाकारं व्याप्तं येन चराचरम् ॥ तत्पदं दर्शितं येन तस्मै श्रीगुरवे नमः ॥ १६ ॥ ज्ञानशक्तिसमारूढस्तत्वमालाविभूषितः ॥ अज्ञानांधतमस्सूर्यस्तस्मै श्रीगुरवे नमः ॥१७॥ अन्तस्तिमिरनिर्भेदभानवे कामधेनवे ॥ सदाऽन्तेवासिनां कल्पतरवे गुरवे नमः ।१८।

---

आधार नाहीं (त्याच्या अराधनानें सर्व जग चालतें), तो निर्मळ आहे, त्याला कोणताही विकल्प नाहीं, तो निर्गुण (निष्प्रपंच) आहे, तो नित्य आहे. गुरु श्रेष्ठाहून श्रेष्ठस्थान आहे. (११) त्या गुरूला शब्द नाहीं, त्याला आलंब नाहीं, शून्य नाहीं, आश्रय नाहीं, त्याला देह नाहीं, त्याला दोष नाहीं, तो नित्य आहे त्या गुरुदेवाला नमस्कार असो. (१२) जो गुरु आहे त्यालाच शिव ह्मणतात, व जो शिव आहे त्यालाच गुरु ह्मणतात, जो गुरु ह्या लोकीं सर्व प्रकारचीं सुखें आणि मरणानंतर मोक्षसुख मिळवून देतो त्या श्रीगुरूला नमस्कार असो. (१३) गुरुदेव हाच महादेव आहे, गुरुदेव हाच सदाशिव आहे, गुरुदेवापेक्षां श्रेष्ठ असें जगांत दुसरें कांहींच नाहीं त्या श्रीगुरूला नमस्कार असो. (१४) पराशिवच स्वतः शिष्याला दीक्षा देण्याकरितां गुरू होऊन अवतरला आहे, तो सर्व त्रैलोक्यापेक्षां श्रेष्ठ आहे, तो सर्व जगाला प्रेरणा करितो; त्या प्रेरणा करणाऱ्या श्रीगुरूला नमस्कार असो. (१५) महादेव; श्रीविष्णु, रुद्र, ईश्वर आणि सदाशिव हे सर्व देव श्रीगुरूच्या गर्भांत असल्यासारखे आहेत; त्या श्रीगुरूला नमस्कार असो. (१६) जें स्थान सर्वत्र पूर्णपणानें भरलें आहे, जें गोल आकाराचें आहे व ज्यामुळें हें स्थावरजंगम विश्व व्यापलेलें आहे तें श्रेष्ठस्थान (ब्रह्मस्वरूप) ज्या गुरूनें दाखविलें; त्या गुरूस नमस्कार असो. (१७) जो श्रीगुरु ज्ञानाच्या शक्तीवर चढला आहे (जो अतिशय ज्ञानी आहे) छत्तीस तत्वांची त्यानें माला करून घातल्यामुळें त्याला अवर्णनीय ज्ञानी शोभा आली आहे (तत्वांचा समुदाय त्याचेजवळ असल्यामुळें तो शोभतो), अज्ञानरूपी काळाकुट्ट अंधार जो सूर्यासारखा दूर करितो; त्या श्रीगुरूला नमस्कार असो. (१८) गुरु हा शिष्याचे मनांतील अज्ञानरूप अंधार दूर करणारा प्रत्यक्ष सूर्य आहे, तो कामधेनूप्रमाणें भक्तांची वासना पुरवितो, शिष्य लोकांचा तो मूर्तिमंत कल्पवृक्ष आहे त्या गुरूला नमस्कार असो.

बहिस्तिमिरविच्छेत्ता भानुरेष प्रकीर्तितः ॥ बहिरन्तस्तमश्छेत्ता विशुद्धदेशिकभास्करः ॥ १९ ॥ अचिन्त्यविश्वसादाख्ये ॥ अज्ञानतिमिरान्धस्य ज्ञानांजनशलाकया ॥ चक्षुरुन्मीलितं येन तस्मै श्रीगुरवे नमः ॥ २० ॥ भवारण्यप्रविष्टस्य दृङ्मोहभ्रान्तचेतसः ॥ येन मे दर्शितः पंथास्तस्मै श्रीगुरवे नमः ॥ २१ ॥ अनन्तजन्मसंप्राप्तकर्मेंधनविदाहिने ॥ ज्ञानानलप्रभावेन तस्मै श्रीगुरवे नमः ॥२२॥ वृत्तम् ॥ आनन्दमानन्दकरं प्रसन्नं ज्ञानस्वरूपं निजबोधयुक्तम् ॥ योगीन्द्रवंद्यं भवरोगवैद्यं श्रीसद्गुरुं नित्यमहं नमामि ॥ २३ ॥ वासिष्ठपुराणे ॥ अगाधसंशयांभोधिःसमुत्तरणतारणम् ॥ वंदे विचित्रार्थपदं चित्रं तं गुरुस्वामिनम् ॥ २४ ॥ नादःबिंदुकलातीतं वेदशास्त्रानुवर्तिनम् ॥ आदिमध्यान्तरहितं नित्यानन्दात्मकं गुरुम् ॥ २५ ॥ शिवः समस्तकल्याणो नाथो नाथविवर्जितः ॥ नादबिंदुकलातीतः शो-

---

( १९ ) हा सूर्य अंधकाराचा नाश करितो, मनांतील अज्ञानरूप अंधकाराचा तो नाश करूं शकत नाहीं, मनांतील अज्ञान आणि बाहेरील अंधार दूर करणारा हा गुरुरूप सूर्यच एक समर्थ आहे. (२०) अचिन्त्यविश्वासादाख्यात ह्मटलें कीं, ज्या गुरूनें अज्ञानरूप अंधारानें आंधळा झालेल्या मनुष्याचे डोळे त्यांत ज्ञानरूप अंजनाची काडी घालून उघडले व त्यास दिव्यदृष्टि मिळवून दिली त्या श्रीगुरूस नमस्कार असो ( गुरू आपल्या शिष्यास ज्ञान शिकवून त्यास ताळ्यावर आणितो ). (२१) मी संसाररूप भयंकर जंगलांत जाऊन सांपडलों, दृष्टीला मोह पडल्यामुळें मी बुचकळ्यांत पडलों, मला दिशा कोणती आणि मार्ग कोणता, हें कांहींच समजेना; अशा स्थितींत ज्या गुरूनें मला नेऊन वाट दाखविली, त्या श्रीगुरूला नमस्कार असो. ( २२ ) जो गुरू आपल्या ज्ञानाग्नीच्या सामर्थ्यानें शिष्यजनांची अनेक जन्मांत सांचलेलीं कर्मरूपी लांकडें भडाभड जाळून टाकतो त्या श्रीगुरूस नमस्कार असो. २३ ) जो श्रीगुरू मूर्तिमंत आनन्दच आहे- तो आपल्या शिष्याला आनन्द प्राप्त करून देतो, तो नेहमीं शांत असतो कधींही उद्विग्न नसतो, ज्ञानाची तर तो एक मूर्तिच आहे, त्याच्या मनांत मी शिवच आहे, हा भाव पूर्णपणें बिंबलेला असतो, मोठमोठे योगीश्वर देखील त्याला नमस्कार करितात, संसाररूप रोग दूर करणारा तो वैद्य आहे, त्या श्रीसद्गुरूला मी दररोज नमस्कार करितों. ( २४ ) वासिष्ठपुराणांत ह्मटलें आहे, जो गुरुस्वामी अतिशय खोल अशा संसारसमुद्रांतून आपण स्वतः तरून दुसऱ्याला ( शिष्याला ) ही तारितो, अनेक प्रकारचे निरनिराळे अर्थ तो समजावून देतो, त्या अलौकिकसामर्थ्य असणाऱ्या श्रीगुरूला नमस्कार असो. ( २५ ) शिव हा गुरुस्वरूप आहे, तो नाद, बिंदु, आणि कला ह्यांच्या पलीकडे आहे, ती वेद आणि शास्त्र ह्यांस अनुसरून चालतो, त्याला जन्म, मरण आणि तारुण्यावस्था हीं तीनही नाहींत; तो नेहमीं आनन्दस्वरूप आहे. ( २६ ) शंकर हा स्वतः लोकांचें सर्व प्रकारें कल्याण

भते सघनो गुरुः ॥ २६ ॥ शिवरहस्ये ॥ अहमेव गुरुर्भूत्वा चरामि वसुधातले ॥ अत्रिनेत्रचतुर्बाहुरव्यक्तोमार्धविग्रहः ॥ २७ ॥ निष्कलो हि महादेवो नित्यज्ञानमहोदधिः ॥ सकलो गुरुरूपेण सर्वानुग्राहको भवेत् ॥ २८ ॥ हस्तपादादिसाम्येन नेतरैः सदृशं वदेत् ॥ आचार्यं ज्ञानदं शुद्धं शिवरूपतया स्थितम् ॥ २९ ॥ शिवज्ञानं महाघोरसंसारार्णवतारकम् ॥ दीयते येन स गुरुः कस्य वंद्यो न जायते ॥३०॥ अप्रत्यक्षो महादेवः सर्वेषामात्ममायया ॥ प्रत्यक्षो गुरुरूपेण वर्तते भक्तिसिद्धये ॥ ३१ ॥ गुरोः कटाक्षवेधेन शिवो भवति मानवः ॥ रसवेधाद्यथा लोहो हेमतां प्रतिपद्यते ॥३२॥ सूर्यस्योदयमात्रेण सूर्यकांतः प्रकाशते ॥ गुरोरालोकमात्रेण शिष्यो बोधेन भासते ॥ ३३ ॥ चंद्रावलोकने ॥ उक्तम् ॥ वेद्यवेदकभेदनिरोधिने वाच्यवाचकविकारहारिणे ॥ नेति नेति परमार्थरूपिणे स्वस्वभावगुरवे नमो नमः ॥३४॥

---

करितो. तो सर्व जगाचा ईश्वर आहे, त्याचा ईश्वर कोणी नाहीं. तो नाद, बिंदु आणि कला ह्यांपेक्षां पलीकडे ( श्रेष्ठ ) आहे तो सर्व जगाचा गुरू असून मोठा धनवान् आहे त्यामुळें तो अतिशय शोभतो. (२७) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात, पार्वती, मीच स्वत; गुरू होऊन सर्व पृथ्वीमंडलावर फिरत असतों. तें गुरूचें रूप मी घेतों, त्यावेळीं मला तीन डोळे नसून दोनच असतात, चार हात नसून दोनच हात असतात, अर्धांगी पार्वती त्यावेळीं त्या स्थितींत गुप्तरूपानें असते, कोणासही स्पष्टरीतीनें दिसत नाहीं. (२८) महादेव हा प्रपंचरहित आहे, तो नित्यज्ञानाचा महासमुद्र आहे, तो मोठा ज्ञानवान् आहे, तोच महादेव गुरुरूपानें साकार ( देहधारी ) होऊन सर्वांवर कृपा करतो. (२९) इतर लोकांसारखें ह्या गुरूलाही हात, पाय वगैरे असले तरी हा गुरूही इतर लोकांसारखाच आहे असें कधींही ह्मणूं नये. आचार्यांची ( गुरूची ) योग्यता फार मोठी आहे, तो ज्ञान प्राप्त करून देणारा असून निष्पाप असतो तो शिवाचें रूप धारण करून पृथ्वीवर राहतो. (३०) शिवज्ञान हें भयंकर संसारसमुद्रांतून प्राणिमात्रांस तारितें; हें शिवज्ञान गुरुपासून शिष्यांस प्राप्त होतें, त्यामुळें तो श्रीगुरु कोणाला वंद्य होणार नाहीं? सर्व लोक त्या गुरूला नमस्कार करतीलच. (३१) सर्व प्राणिमात्रांच्या महादेव प्रत्यक्षरूपानें दृष्टीस पडत नाहीं, तो महादेव आपल्या मायेच्या सामर्थ्यानें प्रत्यक्ष गुरूचें रूप घेऊन भक्तांचे मनोरथ पूर्ण करण्याकरितां पृथ्वीवर अवतार घेतो. (३२) परीसमणि लागला ह्मणजे जसें लोखंडाचें सोनें होतें तसाच मनुष्य ( शिष्य ) गुरूच्या कृपादृष्टीनें प्रत्यक्ष शिवस्वरूपच ( शिवच ) होतो. (३३) सूर्याचा उदय झाल्याबरोबर जसा सूर्यकान्तमणि शोभूं लागतो तसेंच गुरूनें कृपादृष्टीनें शिष्याकडे पाहिलें ह्मणजे त्या शिष्यास शिवज्ञान होऊन तो शोभूं लागतो. (३४) चंद्रावलोकनांत ह्मटलें आहे कीं, जाणावयाचें ( ज्ञेय ) आणि जाणणारा हा निराळेपणा त्या गुरूला नाहीं, कारण जाणणा-

परमाद्वैतविज्ञानपरमौषधदानतः ॥ संसारोरगसंहारी देशिकः केन लभ्यते ॥३६॥ ब्रह्माण्डबुद्बुदोद्भूतं मायासिंधुं महत्तरम् ॥ गुरोः कवलयत्याशु कटाक्षवडवानलः ॥ ३६ ॥ यत्सूक्तिदर्पणाभोगे निर्मला दृश्यते सदा ॥ मोक्षश्रीर्विंबरूपेण स गुरुर्भवतारकः ॥ ३७ ॥ कैवल्यकल्पतरवो गुरवः करुणालयाः ॥ दुर्लभा हि जगत्यस्मिन् शिवाद्वैतपरायणाः ॥ ३८ ॥ हररूपं समादाय पूजां गृण्हाति सर्वदा ॥ गुरुरूपं समादाय भवपाशं निकृंतति ॥ ३९ ॥ वीरागमे ॥ गुरोरालोकमात्रेण स्पर्शात्संभाषणादपि ॥ सद्यस्संजायते ह्यस्य पशोः पाशपरिक्षयः ॥ ४० ॥ पशुनाथः शिवस्तस्मात्पशूनां पतिरित्यभूत् ॥ पशुपाशविनिर्मुक्त्यै गुरोराज्ञां निरीक्षयेत् ॥४१॥ शिवरहस्ये ॥ वृत्तम् ॥ शिवताभरिते भुवनत्रितये शिवतां जनतां न तथापि गता

---

राही तोच असून जाणावयाचें आत्मस्वरूपही तोच आहे. तसें अमुक एक नांव, आणि नांव घेणारा हा निराळेपणाही त्या गुरूला नाहीं. हें नव्हे हें नव्हे असें यथार्थ रीतीचें ज्याचें स्वरूप आहे. त्या स्वात्मरूप गुरूला नमस्कार असो. ( ३५ ) श्रेष्ठ शिवाद्वैतज्ञानरूप उत्तम प्रकारचें औषध देऊन संसाररूप सापाचा, देशिक नाश करितो; तो देशिक कोणास मिळणार आहे? ( ३६ ) मायारूप समुद्र फारच खोल असून फार मोठा आहे, त्यावर ब्रह्माण्डरूपी अनेक बुडबुडे आलेले आहेत, त्या मायासमुद्राला गुरूचा कृपाकटाक्षरूपी वडवाग्नी तेव्हांच शोषून टाकितो ( गुरूच्या कृपादृष्टीनें संसारदुःखांतून प्राण्याची मुक्तता होते ). ३७ ) ज्या गुरूच्या अमृतासारख्या गोड गोड अशा उपदेशाच्या भाषणांत मोक्षलक्ष्मी आरशांत जसें आपलें प्रतिबिंब दिसावें तशी दिसते ( गुरूपदेश ऐकून आपण मोक्षास खचित जाऊं असें वाटूं लागते ) तो गुरू संसारदुःखांतून शिष्याची मुक्तता करून त्यास तारून नेतो. ( ३८ ) जे गुरू मोक्ष प्राप्ति करून देणारे कल्पवृक्षच आहेत, जे कृपेचे मूर्तिमंत समुद्रच आहेत, जे शिवाद्वैतज्ञानांत नेहमीं तत्पर असतात, असे गुरु ह्या जगांत फारच विरळ आहेत. ( ३९ ) गुरु ( शिव ) हा शिवाचें रूप घेऊन नेहमीं शिष्यांकडून पूजा घेतो आणि तोच गुरूचें रूप घेऊन संसाररूप पाश तोडून टाकतो. ( ४० ) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, गुरूनें एकवेळ सहजगत्या कृपादृष्टीनें पाहिलें; किंवा एकवेळ प्रेमानें अंगाला स्पर्श केला, किंवा प्रेमानें दोन घटका संभाषण केलें तरी देखील ह्या पशूच्या पाशाचा तात्काळ नाश होतो. ( ४१ ) शिव हा पशूंचा स्वामी आहे, ह्मणून त्याला पशुपति असें नांव पडले आहे; तो शिव पशूची पाशांतून मुक्तता करण्यासाठीं गुरूच्या आज्ञेची वाट पहात असतो. ( ४२ ) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, हें सर्व त्रैलोक्य शिवस्वरूपानें भरलेलें आहे, तरी पण हा सर्व लोकांचा समुदाय शिवपणा पावत नाहीं; गुरूचें दर्शन झाल्यानंतर लोकांचा समुदाय शिवपणा पावतो, त्यावरून गुरू आणि शिव ह्या दोघांत श्रेष्ठ कोण ह्याचा विचार करूं लागलें तर गुरू हाच

॥ गुरुदर्शनतः शिवतामगमद्गुरुतः शिवतो गुरुरेव गुरुः ॥ ४२ ॥ न गुरोरधिकं न गुरोरधिकं न गुरोरधिकं विदितं विदितम् ॥ शिवशासनतश्शिवशासनतश्शिवशासनतः शिवशासनतः ॥ ४३ ॥ महिम्नस्तवे ॥ महेशान्नापरो देवो महिम्नो नापरा स्तुतिः ॥ अघोरान्नापरो मंत्रो नास्ति तत्वं गुरोः परम् ॥ ४४ ॥ शिष्याणां हृदयालेख्ये प्रद्योतयति यः स्वयम् ॥ ज्ञानतूलिकया तेन गुरुणा कस्समो भवेत् ॥ ४५ ॥ आधाराम्बुजान्तस्थमाद्यन्तरहितं गुरुः॥वाचश्च मनसश्चैव गुरोर्भावस्त्वगोचरः ।४६। मन्नाथस्त्रिजगन्नाथो मद्गुरुस्त्रिजगद्गुरुः ॥ ममात्मा सर्वभूतात्मा तस्मै श्रीगुरवे नमः ॥ ४७ ॥ ध्यानमूलं गुरोर्मूर्तिः पूजामूलं गुरोः पदम् ॥ मंत्रमूलं गुरोर्वाक्यं मुक्तिमूलं गुरोः कृपा ॥ ४८ ॥ अगमार्थानुसंधानाद्रागद्वेषविभंजनात् ॥ ध्यानज्ञानद्वयान्नित्यमाराध्य इति कथ्यते ॥४९॥ आचिनोति च शास्त्रार्थमाचारं स्थापयत्यपि ॥ स्वयमाचरते यस्तु आचार्यो हि स कथ्यते ॥ ६० ॥ वातुले ॥ वृत्तम् ॥ स्वज्ञान-

---

श्रेष्ठ आहे असें दिसतें. ( ४३ ) शिवधर्मशास्त्र वाचून पाहिलें तर असें स्पष्ट दिसून येईल कीं, गुरूपेक्षां ह्या जगांत कांहींच श्रेष्ठ नाहीं. गुरु ह्या जगांत सर्वांपेक्षां श्रेष्ठ आहे असें मी वारवारदां बजावून सांगतो. ( ४४ ) महिम्नस्तोत्रांतः ( महिम्नाच्या स्तुतिपर श्लोकांत ) ह्मटलें आहे कीं, महादेवापेक्षां दुसरा श्रेष्ठ देव नाहीं, महिम्नस्तोत्रासारखी दुसरी कोणतीही स्तुति नाहीं, अघोरमंत्रापेक्षां दुसरा श्रेष्ठ मंत्र नाहीं, व गुरुसारखें दुसरें तत्व नाहीं. ( ४५ ) जो गुरु आपल्या शिष्यांच्या हृदयरूप चित्रांत ज्ञानाची ज्योती लावून तें चित्र तेजःपुंज दिसेल असें करितो ( आपल्या उपदेशानें शिष्याचे मनांत शिवज्ञान उत्पन्न करून देतो ); त्या गुरूची बरोबरी कोणाच्यानें करवेल? ( ४६ ) जो गुरु आधारचक्रापासून कमलापर्यंत जितकीं चक्रें आहेत त्या सर्व चक्रांचें आंत राहतो, त्याला जन्म नाहीं व मरणही नाहीं. गुरूचें मनोगत काय आहे तें वाचेनें सांगतां येत नाहीं, व मनानें त्याची कल्पना देखील करितां येत नाहीं. ( ४७ ) तो गुरु माझा प्रभु ( धनी ) आहे, तसाच त्रैलोक्याचाही गुरू आहे, तो गुरु माझा जसा आत्मा आहे तसा सर्व जगाचाही आत्मा आहे. त्या श्रीगुरूला नमस्कार असो. ( ४८ ) गुरूची मूर्ति ध्यान करणें हेंच मुख्य ध्यान आहे, गुरूचें पदकमल पूजन करणें हीच मुख्य पूजा आहे; गुरूचें वाक्य मनांत ठेवणें हाच मुख्य मंत्र होय. आणि गुरूची कृपा हेंच मोक्षप्राप्तीचें मुख्य साधन आहे. ( ४९ ) गुरूचें लक्ष्य नेहमीं शिवागमाचा अर्थ चिंतन करण्यांत गुंतलेलें असतें, राग आणि द्वेष त्यानें सोडून दिलेले असतात, व ध्यान आणि ज्ञान ह्या दोन गोष्टींचें तो नेहमीं आराधन करितो ह्मणून त्यास आराध्य असें ह्मणतात ( ५० ) गुरू नेहमीं शास्त्राच्या अर्थांचा संग्रह करितो, सदाचाराची जगांत स्थापना करितो आणि आपण स्वतः त्या सदाचारानें वागतो, ह्मणून त्यास आचार्य असें ह्मणतात. ( ५१ ) वातुलांत ह्मटलें आहे कीं, ज्या गुरूच्या स्वतःच्या ज्ञानशक्तीच्या ऐश्वर्या-

शक्तिविभत्रोत्थितकर्तृतत्वं सर्वोपदेशविधितंत्रकृतप्रतिष्ठम् ॥ तेजोनिधिं परमपारसुखांबुराशिं बुद्धेः पदं विनिहितं गुरुलिंगमाहुः ॥ ६१ ॥ योगमुक्तामणौ ॥ नास्ति माता पिता नास्ति नास्ति भ्राता सती सुतः ॥ नास्ति बंधुः सखा चैव परमात्मा गुरोः परः ॥ ६२ ॥ गुरुः पिता गुरुर्माता गुरुर्बांधव एव च ॥ गुरुर्दैवात्परं नास्ति तस्मै श्रीगुरवे नमः ॥ ६३ ॥ सिद्धान्तशेखरे ॥ गुरुः शिवो गुरुर्मंत्रो गुरुर्माता गुरुः पिता ॥ गुरुर्भ्राता गुरुर्बन्धुर्गुरुर्मित्रं गुरुर्धनम् ॥ ६४ ॥ गुरुर्लोको गुरुर्मुक्तिर्गुरुर्भोगो गुरुः सुखम् ॥ गुरुर्वेदो गुरुः शास्त्रं गुरुर्योगो गुरुः फलम् ॥ ६५ ॥ गुरुर्दानं गुरुर्धर्मो गुरुर्दैवं गुरुर्मतिः ॥ गुरुर्नत्रं गुरुर्वक्त्रं गुरुर्वाणी गुरुर्मनः ॥ गुरुः सर्वं गुरुः सत्वं गुरुरेव परः शिवः ॥ ६६ ॥ न मुक्तिर्न च धर्मश्च न पुण्यं न च पापकम् ॥ न कर्म जन्म नेच्छा वै गुरोः पादनिरीक्षणात्॥ ६७॥ योगपट्साहस्रिकायां

---

पासून कर्तृत्व उत्पन्न झालें, सर्व शिष्यजनांला उपदेश करण्याचा ज्या गुरूनें मनापासून निश्चय केला आहे, तो गुरु तेजःपुंज असून फार मोठ्या मनाचा आहे, कृपेचा मूर्तिमंत महासागर आहे, व बुद्धीचें प्रत्यक्ष ठिकाण आहे, त्या गुरूला गुरुलिंग असें विद्वान लोक ह्मणतात ( ५२ ) योगमुक्तामणींत ह्मटलें आहे कीं, गुरूपेक्षां आई श्रेष्ठ नाहीं, बाप श्रेष्ठ नाहीं, भाऊ श्रेष्ठ नाहीं, पतिव्रता बायको श्रेष्ठ नाहीं, मुलगा श्रेष्ठ नाहीं, नातलग श्रेष्ठ नाहीं, मित्र श्रेष्ठ नाहीं फार काय सांगावें? प्रत्यक्ष परमेश्वर देखील गुरूपेक्षां श्रेष्ठ नाहीं? (५३) गुरू हाच बाप आहे, गुरु हीच आई आहे, गुरु हाच नातलग आहे, गुरुदेवाहून जगांत कोणीच श्रेष्ठ नाहीं. त्या श्रीगुरूला नमस्कार असो. ( ५४ ) सिद्धान्तशेखरांत ह्मटलें आहे कीं, गुरु हाच शिव आहे, गुरु हाच मंत्र आहे, गुरु हीच आई आहे, गुरु हाच बाप आहे, गुरु हाच भाऊ आहे, गुरु हाच भाऊबंद आहे, गुरु हाच स्नेही असून गुरु हाच पैसा आहे. ( ५५ ) गुरु हाच लोक आहे, गुरु हाच मोक्ष आहे, गुरु हाच सुखोपभोग आहे, गुरु हेंच सुख आहे, गुरु हाच वेद आहे, गुरु हाच शास्त्र आहे, गुरु हाच योग आहे, व गुरु हेंच फळ आहे. ( ५६ ) गुरु हेंच दान आहे, गुरु हाच धर्म आहे, गुरु हेंच दैव आहे व गुरु ही बुद्धि आहे, गुरु हाच डोळा आहे, गुरु हेंच तोंड आहे, गुरु हेंच वचन असून गुरु हेंच मन आहे, सर्व कांहीं आहे तें गुरुच आहे, गुरु हेंच सत्व आहे व गुरु हाच परशिव आहे. ( ६७ ) गुरुचे चरण) कमल पहावयास मिळालें ह्मणजे झालें, त्याखेरीज मला मुक्ति नको, धर्म नको, पुण्य किंवा पापही नको. कर्म नको, जन्म नको, व इच्छाही नको. गुरूंचें चरणकमलाचें दर्शन झालें ह्मणजे सर्व कांहीं मिळालें. ( ५८ ) योगपट्साहस्रिकेंत ह्मटलें आहे, कीं

गुकारश्च गुणातीतो रुकारो रूपवर्जितः ॥ गुणातीतमरूपं च यत्तत्वं स गुरुः स्मृतः ॥ ५८ ॥ गुकारस्तैलवर्तिश्च रुकारो ज्वलनस्तथा ॥ द्वयोर्योगप्रभावेन स्वयंज्योतिर्गुरुः स्मृतः ॥५९॥ गुकारस्तव रूपं च रुकारो मम रूपकम् ॥ उभयोस्संगसौख्यं च गुरुवर्णं जपेत्सुधीः ॥ ६० ॥ तदहं संप्रवक्ष्यामि गोप्याद्गोप्यतरं परम् ॥ सारात्सारतरं प्रोक्तं पदं प्रश्नाक्षरद्वयम् ॥ ६१ ॥ ज्योतिर्मयमनिर्देश्यं योगिनामात्मनि स्थितम् ॥ कथं विज्ञायते लोके महागुरुदयां विना ॥ ६२ ॥

## ॥ षोडशप्रकरणम् ॥

एवं मनसि स्थिरीकृतलिंगमाहात्म्यवतः भक्तस्य ज्ञानान्तरावस्थितजंगममाहात्म्यं कथमित्याकांक्षायामनंतरं जंगममाहात्म्यस्थलमित्युच्यते ॥ ऋग्वेदादरणे ॥ ईश्वरोऽतिथिरेव चरितस्तद्विहाह स्म ॥ १ ॥ वीरागमे ॥ सर्वलोकोपकाराय यो

---

गुकार हा गुणांहून अतीत (श्रेष्ठ) आहे, रुकार हा रूपरहित आहे, गुणातीत आणि रूपरहित असें जें कांहीं तत्व आहे त्यालाच गुरु असें ह्मणतात. (५९) गुकार ही तेलांत भिजविलेली वात आहे, तसाच रुकार हा (अग्नि) आहे त्या दिव्याचा आणि तेलांत भिजलेल्या वातीचा परस्पर संबंध झाल्याबरोबर जसें एक तेज उत्पन्न होतें, तसेंच गु आणि रु हीं दोन अक्षरें एकत्र झाल्यामुळें गुरु ह्या नांवाचें श्रेष्ठ तेज उत्पन्न झालें. (६०) शिव ह्मणतात, पार्वती, गुकार हें तुझें रूप आहे, आणि रुकार हें माझें रूप आहे, शंकरपार्वतीच्या समागमाचें जें शंकरपार्वतीस परस्पर सुख होतें तें सुखच प्रत्यक्ष गुरु हीं दोन अक्षरें आहेत, तीं दोन अक्षरें उत्तम बुद्धिमान् मनुष्य जपतो. (६१) त्यासाठीं मी तुला सांगतों गुरु हीं दोन अक्षरें अतिशय तत्वाचीं आहेत. तीं गुरु ठेवण्यासारखीं असून श्रेष्ठ आहेत, हें तात्पर्यांतील मुख्य आहे; हीं दोन अक्षरें प्रश्नाचीं अक्षरें आहेत. (६२) गुरुलिंग हें तेजःपुंज आहे, तें अमुक तऱ्हेचें आहे ह्मणून सांगतां येत नाहीं, तें योगीश्वरांच्या मनांत राहतें, तें गुरुलिंग ह्या लोकीं आपणावर गुरूची कृपा असल्याखेरीज कसें ओळखतां येईल ? येणार नाहीं.

श्रीगुरुबसवलिंगास नमस्कार असो. आतां ह्यापुढें जंगममाहात्म्यस्थल सांगतों. ह्याप्रमाणें मनांत लिंगमाहात्म्यस्थल स्थिर झालेल्या भक्ताला ज्ञानान्तरांत (दुसऱ्या ज्ञानांत) राहणाऱ्या जंगमाचें माहात्म्य कसें आहे ही इच्छा झाल्यावर जंगममाहात्म्यस्थल काय आहे तें सांगतों. (१) ऋग्वेद आदरणांत ह्मटलें आहे कीं, ईश्वर हाच अतिथि आहे आणि तो ह्या पृथ्वीवर संचार करितो. याप्रमाणें येथें (ऋग्वेदांत) सांगितलें आहे. (२) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, जो परमात्मा सर्व लोकांवर उपकार करावयासाठीं अति-

देवः परमेश्वरः ॥ चरत्यतिथिरूपेण नमस्ते जंगमात्मने ॥ २ ॥ यजुर्वेदे ॥ देवानां देवोऽतिथिः ॥ ३ ॥ पावनागमे ॥ ब्रह्मविष्णुसुरेंद्राद्यैर्वंद्यमानपदद्वयम् ॥ वेदागमार्थनिरतमुत्तमं जंगमस्थलम् ॥ ४ ॥ नवनाथप्रबोधायाम् ॥ ब्रह्मा विष्णुश्च रुद्रश्च ईश्वरश्च सदाशिवः ॥ सर्वदेवमयः श्रीमानुत्तमं जंगमस्थलम् ॥ ५ ॥ स्कांदे ॥ सर्वानुग्रहणार्थाय जगतां हितकारणात् ॥ तज्जंगममिदं पुत्र जायते मोक्षकारणम् ॥६॥ भन्तर्धाय ललाटाक्षि शशांकं च पिधाय च ॥ अवामभागललनो जंगमः परमेश्वरः ॥ * चरत्येव विचरंति महीलोके सत्यमेव न संशयः ॥७॥ श्रुतिः ॥ एवं सर्वदेवतात्मकं जंगमलिंगं भक्तानुग्रहार्थं पंचेंद्रियेषु पंचवक्त्राणि भुजद्वये दशभुजान् सर्वपादान् चरणद्वये विधाय दिव्यमंगलविग्रहान् दधातीति भगवत्यथर्वणशिखा प्रतिपादयति ॥८॥ वीरागमे ॥ नित्यानंदपदं ज्ञानं चैतन्यं ज्योतिरूपकम् ॥ शांतज्ञानमनंतं स्यादक्षरमित्यु-

---

यीचें रूप घेऊन सर्व जगांत फिरतो, त्या जंगमस्वरूपी परमेश्वरास नमस्कार असो. ( ३ ) यजुर्वेदांत ह्मटलें आहे कीं, देव हा देवांचा अतिथि आहे. ( ४ ) पावनागमांत ह्मटलें आहे कीं, जंगमस्थल हें फार उत्तम आहे, ब्रह्मदेव, श्रीविष्णु वगैरे मुख्य मुख्य देव देखील त्याच्या दोन्ही पायांस नमस्कार करितात. आणि तें जंगमस्थल नेहमीं वेदांचा, आगमांचा अर्थ करण्यांत गुंतलेलें असतें. (तें वेदास आणि आगमांस मान्य आहे). ( ५ ) नवनाथप्रबोधांत ह्मटलें आहे कीं, ब्रह्मदेव, श्रीविष्णु, रुद्र, ईश्वर आणि सदाशिव हें सर्व मिळून एक जंगमस्थल आहे. एका जंगमाच्या अंगांत इतके वर सांगितलेले सर्व देव राहतात. जंगमस्थल श्रेष्ठ आहे. ( ६ ) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात मुला षडानना, सर्व प्राणिमात्रांवर उपकार करण्यासाठीं आणि सर्व जगाचें कल्याण करावयासाठीं हें जंगमस्थल निर्माण झालें आहे, ह्याच्या आराधनानें मोक्षप्राप्ति होते. ( ७ ) कपाळावरील तिसरा डोळा झांकलेला, मस्तकावरील चंद्र लपवून ठेवलेला आणि डावेकडील अंग स्त्रीचें नसणारा हा जंगम प्रत्यक्ष शंकरच आहे. शंकराच्या कपाळावर तिसरा डोळा, मस्तकावर चंद्र आणि डावे अंगास पार्वती आहे, ती जंगमाच्या नाहीं इतकेच परंतु वास्तविक पाहतां ते दोघे ही सारख्या योग्यतेचे आहेत. सारांश जंगमाचें रूप घेऊन प्रत्यक्ष श्रीशंकरच त्रैलोक्यांत फिरतात ह्यांत कांहीं संशय नाहीं. ( ८ ) श्रुती— ह्याप्रमाणें सर्व देवतास्वरूपी जंगमलिंग भक्तांवर कृपा करण्यासाठीं पांच इंद्रियांत पांच तोंडें, दोन्ही हातांत दहा हात, दोन्ही पायांत सर्व पाय असें सुखरूप आणि मंगलकारक रूप धारण करितें असें भगवती अथर्वणशिखा प्रतिपादन करिते, ( ९ ) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, चरस्थल हें नित्यानंदस्थान आहे, तें ज्ञानस्वरूप आहे, आनंदस्वरूप आहे, जोतिषस्वरूप आहे, शांत स्वभावाचें असून ज्ञानसंपन्न आहे, अनंत

नमस्कृतम् ॥ ९ ॥ पैंगलशाखायाम् ॥ एतज्जंगमः शांतमजरममभयममृतं परं ज्योतिः ॥ १० ॥ वीरागमे ॥ निरामयं निराभासं निष्प्रपंचं निरंजनम् ॥ सर्वस्वभावसंप्रमुत्तमं जंगमस्थलम् ॥ ११ ॥ निरंजनं निराभासं निर्विकारं निराश्रयम् ॥ निर्गुणं ज्ञानरूपं च उत्तमं जंगमस्थलम् ॥ १२ ॥ निराकार निरालंबं निर्विकल्पं निरंजनम् ।। निष्पदं निष्प्रकारं च ज्ञानवज्जंगमस्थलम् ॥ १३ ॥ द्वैतातीतं महाद्वैती ध्यानमौनपदद्वयम् ॥ वेदागमार्थनिरतमुत्तमं जंगमस्थलम् ॥ १४ ॥ वेदातीतो महाद्वैती मार्गातीतोऽतिमार्गिकः ॥ शास्त्रातीतो महाशास्त्री तत्स्याज्जंगमलक्षणम् ॥ १५ ॥ वेदातीतं मनोऽतीतमागमातीतमार्गिकम् ॥ शास्त्रातीतं महाशास्त्री तत्स्याज्जंगमलक्षणम् ॥ १६ ॥ क्षरं न चाक्षरं चैव द्वयोर्नाम प्रवर्तकम् ॥ यदुन्मुखपरिज्ञानं दुर्लभं जंगमस्थलम् ॥ १७ ॥ अमृतबिंदूपनिषदि ॥ विश्वातीतो

---

आहे त्याला सर्व प्राणिमात्र नमस्कार करितात. ( १० ) पैंगलशाखेंत ह्मटलें आहे कीं, हें जंगमाचें स्वरूप शांत आहे, जराहीन आहे, भयहीन ( निर्भय ) आणि अमरण ( मरणहीन ) आहे, व तें श्रेष्ठतेज आहे. ( ११ ) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, जंगमस्थल हें निरोगी आहे निराभास आहे, निष्प्रपंच आणि निरंजन आहे, ते सर्व स्वभावानें संपन्न असून उत्तम आहे. ( १२ ) जंगमस्थल निरंजन असून निराभास आहे, निर्विकार असून निराश्रय ( दुसऱ्याच्या आश्रयानें न राहणारें ) आहे, तें निर्गुण असून ज्ञानस्वरूप आहे, आणि उत्तम आहे. ( १३ ) जंगमस्थल हें निराकार असून निरालंब आहे, निराकुल असून निरंजन आहे. निष्पद असून निष्प्रकार आहे. व ज्ञानसंपन्न आहे. ( १४ ) जंगमस्थल द्वैताहून पर ( अतीत ) आहे. तें अद्वैतप्रधान आहे, ध्यान आणि मौन हे दोन गुण त्याचे अंगीं आहेत. वेद आणि आगम ह्यांचे अर्थास अनुसरून आहे. तें फार उत्तम आहे. ( १५ ) जंगम हा वेदाहून अतीत ( श्रेष्ठ ) आहे, तो मोठा अद्वैती आहे, तो सर्व मार्गांहून ( अतीत ) निराळा आहे, तो सर्व मार्गांच्या पलीकडे गेलेला आहे त्यास मार्गांचें मुळींच कारण नाहीं. तो शास्त्राच्या पलीकडे असून तो मोठा शास्त्री असतो, हेंच जंगमाचें लक्षण आहे. ( १६ ) तो वेदाच्या पलीकडे आहे, मनाच्या पलीकडे आहे, आगमांच्या पलीकडे असून मार्गांच्याही पलीकडे आहे. तो शास्त्राच्या पैलतीरास आहे, गेलेला असून मोठा शास्त्रसंपन्न आहे. इतके गुण ज्याच्या अंगीं आहेत त्यालाच जंगम असें ह्मणावें व तेंच जंगमाचें लक्षण आहे. ( १७ ) तें जंगमस्थल नाशिवंत असून अविनाशीही नाहीं. तें नाशिवंत आणि अविनाशी ह्या दोहोंचें नांव चालविणारे आहे. ज्याला त्याला परिज्ञान हें अगदीं प्रत्यक्ष अनुभवास आलेलें आहे हें जंगमस्थल दुर्लभ आहे. ( १८ ) अमृतबिंदूपनिषदांत ह्मटलें आहे कीं, वीरमाहेश्वर पुरुष हा सर्व विश्वापेक्षां श्रेष्ठ आहे, तो विश्वरूप आहे, तो विश्वमूर्ति असून सर्व विश्व त्याचेपासून उत्पन्न

विश्वमयो विश्वात्मा विश्वसंभवः ॥ विश्वचक्षुश्च तत्सर्वं वीरमाहेश्वरः पुमान् ॥१८॥ आर्यभट्टारके ॥ परं ज्योतिः परं लिंगं परमीशं परात्परम् ॥ परं व्योममयं रूपमेतज्जंगमलक्षणम् ॥ १९ ॥ निस्संगत्वं निराभारं निस्सीमं निरुपाधिकम् ॥ निर्देहं निर्मलं नित्यं तत्स्याज्जंगमलक्षणम् ॥२०॥ रूपारूपसमाख्यातं कामनिष्काममेव च ॥ मायानिर्मायमेवोक्तमेतज्जंगमलक्षणम् ॥ २१ ॥ निराकारं सदाकारं निर्विकारं सुखावहम् ॥ साक्षान्मुक्तिपदं भावस्तुत्तमं जंगमस्थलम् ॥ २२ ॥ माता नास्ति पिता नास्ति नास्ति नामकुलेऽपि च ॥ अयोनि शंभुरूपं च उत्तमं जंगमस्थलम् ॥ २३ ॥ परमरहस्ये ॥ शृणु देवि महातंत्रे दीक्षितो जंगमश्च यः ॥ तस्य देहे समस्तं च भुवनं च प्रकाशते ॥ २४ ॥ तस्मिन् सुरासुरास्सर्वे जंगमस्थावरात्मकाः ॥ यत्रैव जंगमाः संति तत्रैव निखिलामराः ॥ २५ ॥ सप्तकोटिमहामंत्रा उपमंत्रास्त्वनेकशः ॥ आम्नायादीनि तंत्राणि सिद्धान्ता बहवश्च ये ॥ २६ ॥ भूतानि भुवनान्येव परिवेष्टंति

---

झालें, त्याला सर्व कांहीं दिसत ( समजत ) असून त्याला चोहोंकडे डोळे आहेत. ( १९ ) आर्यभट्टारकांत ह्मटलें आहे कीं, जंगमस्थल हें श्रेष्ठतेज आहे, तें श्रेष्ठलिंग आहे, तें श्रेष्ठ ईश्वर आहे, तें श्रेष्ठाहून श्रेष्ठ आहे, तें श्रेष्ठ आहे व आकाशरूप आहे. हेंच जंगमस्थलाचें लक्षण होय. ( २० ) जंगमस्थल हें वैराग्यसंपन्न आहे. त्यास निराभार ह्मणतात, तें अमर्याद असून त्यास कोणत्याही प्रकारची उपाधि नाहीं. तें निराकार आणि निर्मल आहे, व तें निर्देह ( देहरहित ) आहे. तें नित्य आहे. इतके सर्व गुण जेथें आहेत तेंच जंगमाचें लक्षण जाणावें. ( २१ ) तें सरूप ( साकार ) असून निरूप ( निराकार ) ही आहे. सकाम असून निष्कामही आहे. मायिक असून निर्मायिकही आहे. इतके गुण अंगीं असणें हें जंगमाचें लक्षण आहे. ( २२ ) जंगमस्थल हें निराकार असून साकारही आहे. निर्विकारही असून सुखकारक आहे. प्रत्यक्ष मोक्षस्थल आहे, तें उत्तम स्वभावाचें आहे. ( २३ ) जंगमस्थलाला आई नाहीं, बाप नाहीं, नांव नाहीं आणि कुलही नाहीं. त्यास योनिमार्गानें जन्मावें लागत नाहीं, तें प्रत्यक्ष शंकरस्वरूप असून श्रेष्ठ आहे. ( २४ ) परमरहस्यांत शिवांनीं पार्वतीस सांगितलें आहे कीं, पार्वती, ऐक मी तुला सांगतों. ज्या जंगमानें महातंत्रांत दीक्षा घेतलेली आहे, त्या जंगमाच्या अंगीं सर्व त्रैलोक्य दिसावयास लागतें, ( २५ ) ज्याठिकाणीं जंगम आहेत त्याठिकाणीं सर्व देव. दैत्य आणि स्थावर ( न चालणारे ) सजीवनिर्जीव प्राणिमात्र राहतात. आणि तेथेंच सर्व देव राहतात, ( २६ ) तेथेंच सात कोटि महामंत्र आणि अनेक प्रकारचें उपमंत्र अम्नाय वगैरे जीं तंत्रें असतील, तीं सर्व तंत्रें आणि सर्व प्रकारचें सिद्धान्त आहेत. ( २७ ) सर्व प्राणिमात्र आणि सर्व त्रैलोक्य हीं नेहमीं जंगमास वेष्टून ( त्याचे आश्रयानें ) राहतात. ह्यासाठीं प्राणलिंगी जे

संततम् ॥ तस्मात्सदा शिवाकाराः साक्षाद्वै प्राणलिंगिनः ॥ प्राणलिंगिपरं नास्ति न भूतो न भविष्यति ॥ २७ ॥ किं च ॥ सामवेदे ॥ यस्यान्तस्थानि भूतानि यस्मात्सर्वं प्रवर्तते ॥ यमाहुस्तत्परं तत्वं स देवः स्यान्महेश्वरः ॥ २८ ॥ ग्रंथान्तरे ॥ पंचवक्त्रसमारूढं जायते भौतिकं तथा ॥ तस्मात्तदुद्भवेल्लिंगं चिद्रूपं जंगमस्थलम् ॥२९॥ वीरागमे ॥ नादनिश्चलितं लिंगं बिंदुनिश्चलजंगमम् ॥ नादबिंदुसमायुक्तं श्रेष्ठं तल्लिंगजंगमम् ॥३०॥ तत्रैव ॥ लिंगं च जंगमश्चैव तदाधिक्यं वदामि ते ॥ जंगमं ज्ञानरूपं तु क्रियारूपं तु लिंगकम् ॥ ३१ ॥ परात्परतरं साक्षात्परब्रह्मस्वरूपकम् ॥ चैतन्यं शंकरं ज्योतिरक्षरं जंगमं स्मृतम् ॥ ३२ ॥ नारायणोपनिषदि ॥ परात्परं यन्महतो महान्तं परात्परं पराद्व्यक्तात्परं यज्जंगमलिंगम् ॥ ३३ ॥ पारमेश्वरागमे ॥ इष्टोत्पत्तिर्गुरोश्चैव गुरूत्पत्तिस्तु जंगमात् ॥ जंगमोत्पत्तिशून्यत्वात्तच्छून्यं चरलिंगकम् ॥ ३४ ॥ स्वायंभुवागमे ॥ निःशब्दं स्थावरं चैव मंत्रशब्दोपदेशयोः ॥ लोकपूज्यतरं श्रेष्ठं देवि जंगमलिंगकम् ॥ ३५ ॥ उत्तरवातुले ॥ दीक्षा-

---

जंगम आहेत ते प्रत्यक्ष शिवस्वरूप आहेत. प्राणलिंगीपेक्षां श्रेष्ठ वस्तु ह्या जगांत कांहीं नाहीं, मागें नव्हती व पुढेंही होणार नाहीं. ( २८ ) आणखी सामवेदांत असें ह्मटलें आहे कीं, ज्या परमेश्वरांत हे सर्व प्राणिमात्र राहतात ज्याच्यापासून हें सर्व जग उत्पन्न होतें, ज्या देवाला श्रेष्ठतत्व असें ह्मणतात तो देव महेश्वरच होय. दुसरा कोणी नाहीं (२९) इतर ग्रंथांत ह्मटलें आहे कीं, पंचमुखांपासून भौतिक होतें त्यापासून लिंग उत्पन्न होतें, जंगमस्थल हें चिद्रूप आहे. ( ३० ) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, लिंग हें नादनिश्चलित ( नादस्वरूप ) आहे, जंगम हा बिंदुनिश्चल ( बिंदुस्वरूप ) आहे. नाद आणि ह्यांनीं युक्त असणारे हें जंगमलिंग श्रेष्ठ आहे. ( ३१ ) तेथेंच असें सांगितलें आहे कीं, लिंग आणि जंगम ह्या दोहोंत श्रेष्ठ कोण हें पार्वती, मी तुला सांगतों ऐक. जंगमलिंग ज्ञानस्वरूप असून लिंग हें क्रियास्वरूप आहे. ( ३२ ) जें श्रेष्ठाहून श्रेष्ठ आहे, प्रत्यक्ष परब्रह्मस्वरूप आहे, चैतन्यस्वरूप असून जें कल्याणकारक आहे, जें तेजःस्वरूप असून अविनाशी आहे, त्यास जंगमस्थल असें ह्मणतात, ( ३३ ) नारायणोपनिषदांत सांगितलें आहे कीं, जें जंगमलिंग श्रेष्ठाहून श्रेष्ठ आहे, मोठ्याहून मोठें आहे, श्रेष्ठाहून श्रेष्ठ आहे, श्रेष्ठापेक्षां आणि अव्यक्तापेक्षांही श्रेष्ठ आहे. (३४) पारमेश्वरागमांत सांगितलें आहे कीं, इष्टलिंगाची उत्पत्ति गुरूपासून आहे. गुरूची उत्पत्ति जंगमापासून आहे. जंगमाची उत्पत्ति शून्यत्वापासून आहे. तें शून्यच चरणलिंग आहे. ( ३५ ) स्वायंभुवागमांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात पार्वती, स्थावरलिंग हें निःशब्द ( निर्जीव ) असून मंत्रशब्द आणि उपदेश ह्यांच्या द्वारानें प्रसन्न होतें, आणि जंगमलिंग हें सर्व त्रैलोक्यांत फार श्रेष्ठ आहे. ( ३६ ) उत्तरवातुलांत ह्मटलें आहे कीं, गुरुदेव हा दीक्षामूर्ती आहे ( गुरु दीक्षा देतो ) सदाशिव हा

मूर्तिर्गुरुर्देवो पूजामूर्तिस्सदाशिवः ॥ दीक्षापूजातिशिक्षा च सर्वकर्ता च जंगमः ॥३६॥ मतंगपारमेश्वरे ॥ आदिमूर्तिश्च तल्लिंगं मूर्त्यनादिस्तु जंगमम् ॥ मायाकुण्डलिसंभूतं न च मूर्तिर्महेश्वरि ॥ ३७ ॥ वीरागमे ॥ आदिलिंगं यथा नाम त्वनादिश्शरणस्तथा ॥ द्विविधं भेदनामानि अभेद्यं जंगमं भवेत् ॥ ३८ ॥ मतंगपारमेश्वरे ॥ गगनं तु निराकारं साकारं लिंगरूपकम् ॥ लिंगं रूपधरं देवि जंगमं रूपवर्जितम् ॥ ३९ ॥ ललितागमे ॥ अणिमादिगुणं लिंगं गुणातीतं च जंगमम् ॥ तत्वरूपमयं लिंगं तत्वातीतं च जंगमम् ॥ ४० ॥ सर्वागमोत्तरे ॥ सप्तकोटिमहामंत्रं लिंगरूपं महेश्वरि ॥ अक्षरं मंत्ररूपं च मंत्रातीतं च जंगमम् ॥ ४१ ॥ परमरहस्ये ॥ मद्रूपं जंगमं देवि मम प्राणं समाधिकम् ॥ मद्गुरुश्च मदंगं च मन्नाथं चरलिंगकम् ॥ ४२ ॥ स्मृत्वा स्मृत्वा सदा देवि जंगम हृदयस्थितम् ॥ सत्यं सत्यं मया ख्यातं चरलिंगं समाधिकम् ॥ ४३ ॥ उत्तरवातुले ॥ नमस्ते चरलिं-

---

पूजामूर्ति ( सदाशिवाची पूजा करावी लागते ) आहे, आणि जंगम हा दीक्षा देतो, भक्तांकडून पूजा घेतो, सन्मार्गाचें शिक्षण देतो सर्व कांहीं करितो. ( ३७ ) मतंगपारमेश्वरांत ह्मटलें आहे तें लिंग हें आदिमूर्ति आहे. जंगमलिंग हें अनादिमूर्ति आहे. हे महेश्वरि, मायाकुंडलीपासून उत्पन्न झालेली मूर्ति नाहीं' ( ३८ ) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, आदिलिंगाचीं दोन नांवें अनादि आणि शरण अशीं आहेत, हीं दोन भेदाचीं नांवें होत, आणि जंगमस्थल हें अभेद्य आहे. ( ३९ ) मतंगपारमेश्वरांत ह्मटलें आहे कीं, जंगमलिंग हें निराकार आहे, आणि लिंगस्वरूप हें साकार आहे, शिव ह्मणतात, पार्वती, लिंग हें साकार आहे आणि जंगमलिंग हें निराकार आहे. ( ४० ) ललितागमांत ह्मटलें आहे कीं, लिंगाच्या अंगीं आणिमा, महिमा वगैरे अष्टमहासिद्धींची शक्ति आहे, आणि जंगमलिंग हें गुणांच्या पलीकडे ( गुणातीत ) आहे, लिंग हें तत्वस्वरूप आहे, आणि जंगमलिंग हें तत्वांपेक्षांही पलीकडे आहे. ( ४१ ) सर्वागमोत्तरांत ह्मटलें आहे कीं शिव ह्मणतात हे पार्वति, लिंग हें सात कोट मंत्रस्वरूप आहे सात कोटि'मंत्रांच्या अंगीं जी कांहीं अलौकिक शक्ति आहे ती एका लिंगाच्याठिकाणीं आहे. लिंग हें अक्षर ( नाशरहित ) असून मंत्रस्वरूप आहे. आणि जंगमलिंग हें मंत्राच्या पलीकडे आहे ( ४२ ) परमरहस्यांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात—पार्वती, जंगमलिंग हें माझें स्वरूप आहे, प्रत्यक्ष माझा प्राण आहे इतकें नाहीं तर प्राणापेक्षां देखील जास्त आहे. चरलिंग ( जंगमलिंग ) हें माझा गुरु आहे, माझें अंग आहे, फार काय परंतु माझा स्वामी आहे. ( ४३ ) पार्वती, नेहमीं हृदयांत राहणाऱ्या जंगमाचें ध्यान करावें. पार्वती, मी तुला अगदीं खरेपणानें असें सांगतों कीं, जंगमलिंग हें प्रसिद्ध असून माझ्यापेक्षां श्रेष्ठ आहे, ( ४४ ) उत्तरवातुलांत ह्मटलें आहे, हे जंगमलिंगा, तुला नमस्कार असो, तुला सत्पुरुष

गाय तत्पुरुपाय वायवे ॥ क्षाराभ्युक्तप्रकाशाय वकारमनुमूर्तये ॥ ४४ ॥ वीरागमे ॥ जंगमस्तु महादेवि महतश्चाप्यगोचरः ॥ जंगमस्तु महाश्रेष्ठो जंगमस्तु प्रशस्यते ॥ ४५ ॥ परमरहस्ये ॥ निर्मलं निष्कलं शान्तं निर्भेद्यं निरुपाधिकम् ॥ अद्वैत-परमानंदं ज्ञेयं जंगमलक्षणम् ॥ ४६ ॥ शंकरसंहितायाम् ॥ वृत्तम् ॥ पुराणवे-दान्तशिवागमेषु विचार्यमाणं च तथान्तहीनम् ॥ सदाशिवाख्यं विमलं चिदंशं परा-त्परं जंगमलिंगरूपम् ॥ ४७ ॥ अथर्वणे ॥ रुद्रः सर्वेषां यो जंगमानां वितर-तचक्षुस्तनुकुले तेजःस्वाहा यस्सर्वेषामधिपतिः परमपुराणि परितो लोकानां जिते-र्जितिर्विभुर्विभूनां भवोद्भवाय स्वाहा यः सुसूक्ष्मः सर्वेषामन्तरात्मा स्तुतस्तेषाम-धिपतिर्जंगमो जंगमानां बभूव भवति स्वाहा यो ब्रह्मशब्दप्रणवाध्रुवशब्दशब्द अन्त-

---

ह्मणतात, तूं वायुस्वरूप आहेस. त्यानें आपल्या अंगास भस्म लाविलें असल्यामुळें तें जास्त सतेज दिसतें. तें वकार बीज मंत्रस्वरूप आहे. ( ४५ ) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, पार्वती, जंगमलिंग हें मोठमोठ्या शास्त्रांसही यथार्थ रीतीनें समजत नाहीं, तें महत्तत्त्वापेक्षांही श्रेष्ठ आहे, जंगम हा फार श्रेष्ठ आहे, जंगमच प्रशंसा करण्यास योग्य आहे. ( ४६ ) परमरहस्यांत ह्मटलें आहे कीं, जंगमलिंग हें निर्मल असून निष्कल आहे, शांत असून निर्भेद्य ( न फुटण्यासारखें ) आहे, निरुपाधिक आहे. अद्वैत असून अत्यानंदस्वरूप आहे. इतके गुण अंगीं असणें हें जंगमाचें लक्षण आहे. ( ४७ ) शंकरसहितेंत ह्मटलें आहे, जंगमलिंगाचें वास्तविक स्वरूप कसें आहे, ह्याचा पुराणांवरून वेदांतावरून आणि शिवागमावरून विचार करावा. त्या जंगमलिंगास अंत नाहीं. त्यालाच सदाशिव असें नांव आहे. तें चित्स्वरूपाचा अंश असून निष्पाप व श्रेष्ठाहून श्रेष्ठ आहे. ( ४८ ) अथर्वणवेदांत ह्मटलें आहे जो रुद्र ( परशिव ) सर्व जंगमाच्या चक्षुरादि ज्ञानेंद्रियांमध्यें व स्थूल सूक्ष्म कारण अशा शरीरामध्यें अचारादि महालिंगांत लिंगरूपानें व्याप्त होऊन राहिला आहे, व तो तेजोमय असून उत्कृष्ट आहे, व पुरातन पुरुष आहे, व चोहोंकडून सर्व जगाला जिंकणारे जे जेते असतील, त्यांना हा जिंकणारा आहे, व आकाशादि विभु पदार्थांचा हा विभु आहे, हा परशिव समस्त जंगमांना शरणसति लिंगपति या प्रकारानें पति झाला आहे, व समस्त जंगममूर्तींना सूक्ष्म असा प्राणलिंगस्वरूप होऊन राहिला आहे, व जो जीवजडात्मक प्रपंचाची सृष्टि करतो. अशा परशिवाला शरीरादि वस्तु समर्पित असो. ज्याची स्तुति सर्व श्रुति करतात. असा परशिव जंगमदेवांमध्यें जंगमलिंग होऊन राहिला आहे, अशा जंगमलिंगास धनादि वस्तु समार्पित असो. व समस्त जंगममूर्तींचा अंतरात्मा होऊन प्राणरूप पति होऊन राहिलेला तो परशिव परब्रह्म, परशिव, महालिंग इत्यादि शब्दांनीं प्रणवसाकल्य प्रणव वगैरे पंचप्रणवरूपी नाशरहित शब्दांनीं जगांत ज्याचा व्यवहार होत आहे त्या जंगमलिंगरूपी परशिवाला मनोमुख्य

रात्मा सर्वेषामधिपतिर्यो जंगमे स्वाहा यो बभूव ॥ ४८ ॥ शिवसंकल्पोपनिषदि ॥ परात्परतरं ब्रह्म ॥ ४९ ॥ परमरहस्ये ॥ वेदमंत्रक्रियायुक्तं सर्वमंत्रमनूद्भवम् ॥ मद्रूपं जंगमं देवि सर्वक्रियाप्रतिष्ठितम् ॥ ५० ॥ वीरागमे ॥ सर्वभावविनिर्मुक्तं सर्वसंकल्पनातिगम् ॥ सर्वशून्यं परानंदं चिद्रूपं जंगमं स्मृतम् ॥ ५१ ॥ अजितागमे ॥ सर्वतत्वाव्यसंभिन्नं देहाद्भिन्नं तथैव च ॥ अहमंशाव्यसंभिन्नं चैतन्यं सर्वतोमुखम् ॥ ५२ ॥ अस्मिन्नर्थे वीरागमे ॥ अणूनामप्यणुतरं महतां च महत्तरम् ॥ मध्यस्थं सर्वदेहेषु उत्तमं जंगमस्थलम् ॥५३॥ गोरक्षसंहितायाम् ॥ शिष्याणां च गुरुर्माता गुरोर्माता तु जंगमः ॥ जंगमस्य न माताऽस्ति ह्यादिनाथस्तु जंगमः ॥५४॥ शिष्योत्पत्तिर्गुरोश्चैव गुरूत्पत्तिस्तु जंगमात् ॥ जंगमोत्पत्तिशून्यत्वात्तच्छून्यो जंगमो भवेत् ॥ ५५ ॥ स्कन्दपुराणे ॥ अहंममत्वशून्यत्वान्निजत्वेबोधैक्यरूपधृत् ॥ स्वयमेव स्वयं भूत्वा चरतीति चरः स्मृतः ॥ ५६ ॥ वीरागमे ॥ शिव एव समुत्पन्नः शिव

---

वस्तु समर्पित असो. ( ४९ ) शिवसंकल्पोपनिषदांत म्हटलें आहे कीं, श्रेष्ठ अशा शिवलिंगापेक्षां जंगमलिंग अत्यंत श्रेष्ठ उत्कृष्ट आहे, यांत संशय नाहीं. ( ५० ) परमरहस्यांत म्हटलें आहे कीं, जंगमलिंग हें वेद, मंत्र आणि क्रिया ह्यांनीं युक्त आहे. सर्व मंत्रांची त्याचेपासून उत्पत्ति झाली, जंगमलिंग हें प्रत्यक्ष माझें रूप आहे. त्यांत सर्व क्रिया राहतात. ( ५१ ] वीरागमांत म्हटलें आहे कीं, जंगमलिंगास कोणताही भाव नाहीं, सर्व भावापासून तें अलिप्त आहे, सर्व प्रकारच्या कल्पनांच्या तें पलीकडे आहे. त्यास कोणतीही कल्पना नाहीं. ते सर्वतोपरी शून्य आहे, ते अत्यानंदस्वरूप आहे, त्यास चिद्रूप असें म्हणतात. ( ५२ ) अजितागमांत म्हटलें आहे, जंगमलिंग हें सर्व तत्वांशीं अगदीं मिळून आहे. कोणत्याही रीतीनें विरुद्ध नाहीं. तसेंच तें देहाहून निराळें आहे. मी असा जो अभिमान प्रत्येक प्राणिमात्राला असतो त्याहून फारसें वेगळें नाहीं. तें चैतन्यस्वरूप आहे व त्यास चोहोंकडे मुखें आहेत. ( ५३ ) ह्यासंबंधानेंच वीरागमांत म्हटलें आहे कीं, जंगमस्थल हें अणूपेक्षां अणु आहे मोठ्यापेक्षां फारच मोठें आहे. सर्व शरीरांत तें मध्यभागीं राहतें व तें उत्तम आहे. ( ५४ ) गोरक्षसंहितेंत म्हटलें आहे शिष्य लोकांची गुरु हीच माता आहे, आणि जंगम हा गुरूची माता आहे, जंगमाला माता नाहीं, जंगम आदिबाप आहे. ( ५५ ) शिष्याची उत्पत्ति गुरूपासून होते आणि गुरूची उत्पत्ति जंगमापासून होते, जंगमाची उत्पत्ति शून्यत्वापासून होते शून्यत्वालाच जंगम असें म्हणतात. ( ५६ ) स्कन्दपुराणांत म्हटलें आहे, जंगमास मी आणि माझें हें मुळींच नाहीं. तो स्वस्वरूपाचा बोध असून त्या बोधाशीं ऐक्य पावलेला असतो, तो स्वतःच स्वयं होऊन फिरतो म्हणून त्यास चर असें म्हणतात. ( ५७ ) वीरागमांत म्हटलें आहे कीं, शिव हा स्वतःच उत्पन्न झाला, शिवच स्वतः अलंकारभूत आहे, शिव

एव विभूषितः ॥ शिव एव जगत्कर्ता जंगमाख्यः प्रशस्यते ॥ ९७ ॥ जंगमं त्र्यक्षरं विंद्याद्भुवनानि चतुर्दश ॥ स्वर्गो मर्त्यश्च पातालं जंगमाख्यं प्रशस्यते ॥९८॥ सद्रूपश्च जकारश्च चिद्रूपश्च गकारकः ॥ आनंदः स्यान्मकारश्च सच्चिदानंदजंगमम् ॥ ९९ ॥ सूतसंहितायाम् ॥ जकारो गुरुरूपं च गकारो लिंगमुच्यते ॥ मकारो जंगमो ज्ञेयस्त्रिमूर्त्यात्मकजंगमः ॥ ६० ॥ वीरागमे ॥ जकारो गुरुरूपं च गकारो लिंगरूपकम् ॥ मकारो जंगमश्चैव सर्वकर्ता च जंगमः ॥ ६१ ॥ जकारः कथ्यते चंद्रो मकारः सूर्य उच्यते ॥ एतयोर्गमनं मध्ये यस्य सोऽपि च जंगमः ॥ ६२ ॥ वीरागमे ॥ जगन्मध्ये स्थितं यस्य जगद्विंद्यते सदा ॥ जरामरणनिर्मुक्तं जकाराय नमो नमः ॥ ६३ ॥ गकारो भावपूर्णश्च गजाननपिता स्वयम् ॥ गगनं व्यापकश्चैव गकाराय नमो नमः ॥ ६४ ॥ महामहो महातेजा महीतलविचारकः ॥ महामूर्तिर्महाध्येयो मकाराय नमोऽस्तु ते ॥ ६९ ॥ वायवीयसंहितायाम् ॥

---

हाच सृष्टि उत्पन्न करणारा आहे, त्यालाच जंगम असें नांव यथार्थरीतीनें लागू पडतें. (५८) जंगम हीं तीन अक्षरें दिसतात परंतु त्या तीन अक्षरांनीं चवदा भुवनें व्यापून टाकलीं आहेत. स्वर्गलोक, मृत्युलोक, आणि पाताळ हें सर्व जंगमाचेंच नांव आहे. (५९) जंगम हें नांव सत्, चित् आणि आनंद मिळून झालेलें आहे. जकार हा सद्रूप गकार हा चिद्रूप आहे आणि मकार हा आनंद रूप आहे. (६०) सूतसंहितेंत ह्मटलें आहे कीं, जकारास गुरुरूप असें ह्मणतात, गकारास लिंगरूप असें ह्मणतात, आणि मकारास जंगम असें ह्मणतात. सारांश, जंगमलिंग हें गुरु, लिंग, आणि जंगम मिळून त्रिमूर्तिरूप आहे. (६१) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, जकार हा गुरुरूप आहे, गकार हा लिंगरूप आहे, आणि मकार हा जंगमरूप आहे. हा सर्व कांहीं करणारा आहे. (६२) जकारास चंद्र ह्मणतात, आणि मकारास सूर्य ह्मणतात. ह्या दोहोंच्या (चंद्र सूर्याच्या) मध्यें ज्याचें जाणें येणें आहे त्यास जंगम असें ह्मणतात. (६३) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, जंगम ह्या शब्दांतील पहिलें अक्षर तो जकार आहे, तो जगामध्यें राहतो, त्यास नेहमीं त्रैलोक्य वंदन करितें, त्यास वृद्धपणा आणि मरण हे दोन गुण नाहींत त्या जकारास नमस्कार असो. (६४) गकार हा भावपूर्ण आहे, तो स्वतः गणपतीचा बाप श्रीशंकरच आहे, तो आकाशासारखा व्यापक आहे, त्या गकाराला नमस्कार असो. (६५) मकाराचें तेज फार मोठें आहे, तें फार तेजस्वी आहे, तें पृथ्वीतलावर संचार करणार आहे. त्याचें स्वरूप मोठें आहे, तें उत्तम रीतीनें ध्यान करण्यासारखें आहे, त्या मकारास नमस्कार असो. (६६) वायवीयसंहितेंत ह्मटलें आहे कीं, जंगम हा महानाद आहे, महाबिंदु आहे, व महदाकाशस्वरूप आहे, महायोगस्वरूप असून जंगम हा प्रत्यक्ष परमेश्वरच

महानादो महाबिंदुर्महदाकाशरूपकः ॥ महायोगमयं रूपं परमात्मेति जंगमः ॥ ॥ ६६ ॥ वीरागमे ॥ जकारोऽभेद्यरूपं च गकारश्चाप्यगोचरम् ॥ मकारो मनसा ग्राह्यमभेद्यं जंगमस्थलम् ॥६७॥ जकारं चैव नादश्च गकारं बिंदुरूपकम् ॥ मकारं च कलातीतं सर्वकर्तृ च जंगमम् ॥ ६८ ॥ जकारं जननं दूरं गकारं गमिवर्जितम् ॥ मकारं मरणं नास्ति जंगमस्थलमुच्यते ॥६९॥ जकारो हंसवाहः स्याद्गकारो गरुडध्वजः ॥ मकारो रुद्ररूपश्च त्रिमूर्त्यात्मकजंगमः ॥ ७० ॥ वीरागमे ॥ जकाराज्जनिता पृथ्वी गकाराव्द्योमसंभवः ॥ मकारान्मर्त्यलोकश्च जंगमो जगदीश्वरः ॥७१॥ अणिमाद्यष्टसिद्धीनां निधीनां च नवाकरम् ॥ सर्वसिद्धिस्रष्टृपदं संत् स्याज्जंगमलक्षणम् ॥७२॥ वीरागमे ॥ आनाभेर्ब्रह्मणो रूपमाकण्ठाद्वैष्णवं वपुः ॥ आललाटान्महादेवस्त्रिरूपं जंगमस्थलम् ॥७३॥ कूर्मपुराणे ॥ भूसुरो ब्राह्मणः प्रोक्तो भूरुद्रो जंगमस्तथा ॥ सुररुद्रद्वयोर्मध्ये रुद्र एव विशिष्यते ॥७४॥ मूलमूर्तिर्महादेवो वेदवेद्यः सदाशिवः ॥

---

आहे. ( ६७ ) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, जकार हा अभेद्यस्वरूप आहे, गकार हा अभेद्य आहे, मकाराचें स्वरूप मनास देखील समजत नाहीं; सारांश जंगमस्थल हें फार गहन आणि अभेद्य असें आहे. ( ६८ ) जकार हा नाद असून गकार हा बिंदु आहे, मकार हा कलातीत आहे, सारांश जंगमस्थल हें सर्वकांहीं करण्यास समर्थ आहे. (६९) जकार ह्याचा अर्थ जन्म नसणें असा होतो, गकाराचा जाणें येणें नसणें असा आहे, मकार ह्याचा अर्थ मरण नसणें असा होतो जंगमस्थल हें जन्ममरणाच्या भीतीस पात्र नाहीं ( जंगमाला जन्ममरण नाहीं ). ( ७० ) जकाराचा अर्थ ब्रह्मदेव असा होतो गकाराचा अर्थ श्रीविष्णु असा होतो, आणि मकाराचा अर्थ रुद्र असा होतो, सारांश, जंगम, हा त्रिमूर्तिस्वरूप आहे. (७१) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, जकारापासून पृथ्वी उत्पन्न झाली, गकारापासून आकाशाची उत्पत्ति झाली; आणि मकारापासून मृत्युलोकाची उत्पत्ति झाली ह्मणून जंगम हीं तीन अक्षरें ज्याच्या नावांत आहेत तो त्रैलोक्याचा ईश्वर होय. ( ७२ ) जंगमास आणिमा, महिमा वगैरे अष्टमहासिद्धि अनुकूल आहेत, द्रव्याचे नऊ निधि त्याचे ताब्यांत आहेत, त्याला सर्व सिद्धि अनुकूल असून तो सृष्टि उत्पन्न करणारा आहे. इतके गुण अंगीं असणें हेंच जंगमाचें लक्षण आहे. त्यालाच जंगम ह्मणतात. ( ७३ ) जंगमाचें शरीर तळपायापासून बेंबीपर्यंत ब्रह्मदेवस्वरूप आहे, बेंबीपासून वर गळ्यापर्यंत श्रीविष्णूचें शरीर आहे. आणि ललाटापासून मस्तकावरील भाग हें सर्व रुद्रांचें शरीर आहे. सारांश, जंगम हें त्रिमूर्तीचें स्वरूप आहे. (७४) कूर्मपुराणांत ह्मटलें आहे कीं, ब्राह्मणास भूसुर असें ह्मणतात. आणि जंगमास भूरुद्र असें ह्मणतात. सुर आणि रुद्र ह्या दोहोंत रुद्रच श्रेष्ठ आहे. ( ७५ ) महादेव हा मूलमूर्ति आहे, सदाशिव हा वेदानें जाणण्यासारखा आहे. जंगम हा मूलकर्ता आहे,

॥ आदिकर्ता जगन्नाथो वर्णानां जंगमो गुरुः ॥ ७५ ॥ प्रभाते जंगमे दृष्टे कोटि-लिंगस्य दर्शनम् ॥ ललाटान्नमते यस्तु सर्वपापैः प्रमुच्यते ॥ ७६ ॥ वीरागमे ॥ प्रभाते जंगमे दृष्टे सर्वलिंगस्य दर्शनम् ॥ ललाटेन नमेद्यस्तु सर्वतीर्थफलं भवेत् ॥७७॥ कोटिलिंगार्चने पुण्यं दृढभक्तस्य भक्तितः ॥ तस्माच्छतगुणं पुण्यं जंगमानां च दर्शने ॥ ७८ ॥ कोटिलिंगार्चने पुण्यं शिलारूपा हि देवताः ॥ तस्मात्कोटिगुणं पुण्यं जंगमानां च दर्शने ॥ ७९ ॥ स्कन्दपुराणे ॥ व्रतिनश्चरलिंगस्य पूजनं श्रेष्ठ-मक्षयम् ॥ दर्शनं चाधिकं वत्स मयोदितमिदं शृणु ॥ ८० ॥ चरस्य पूजावेलायां मत्सेवां शिवभक्तिमान् ॥ आचरेत्सर्ववस्तूनि समर्प्य तदनंतरम् ॥८१॥ वीरागमे ॥ स्थावराराधनात्पुण्यं जंगमाराधनाधिकम् ॥ साधारणं सहस्रेषु जंगमं तु विशेषकम् ॥ ८२ ॥ ग्रन्थान्तरे ॥ नादबिंदुकलातीतं वेदशास्त्रातिवर्तनम् ॥ आदिमध्यान्तर-

---

त्यास जगन्नाथ ह्मणतात व तो सर्व वर्णांचा गुरु आहे. (७६) सकाळच्याप्रहरीं जंगमाचें दर्शन घेतलें असतां एक कोटि शिवलिंगांचें दर्शन घेतल्यासारखें पुण्यकारक आहे. जो कोणी मनुष्य जमिनीस डोकें लावून जंगमास नमस्कार करितो, तो सर्व पातकांपासून मुक्त होतो. (७७) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, सकाळच्याप्रहरीं जंगमाचें दर्शन घेतलें असतां सर्व लिंगांचें दर्शन घेतल्यासारखें होतें, जो जंगमाच्या पायांवर आपलें डोकें ठेवून त्यास नमस्कार करील, त्यास ह्या जगांतील सर्व तीर्थें केल्याचें श्रेय येईल. (७८) भक्तिभावानें दृढनिश्चयानें एक कोटी शिवलिंगांचें पूजन केलें असतां जें कांहीं पुण्य लागतें; त्या पुण्याच्या शंभरपटीनें जास्त पुण्य जंगमाचें दर्शन घेतलें असतां पुण्य लागतें; (७९) एक कोटी शिवलिंगांचें पूजन केलें तर पुण्य लागतेंच, परंतु त्यांतील देवता पाषाणस्वरूप आहेत. त्यामुळें जंगमाचें दर्शन घेतलें तर शिवलिंग दर्शनापेक्षां कोटपटीनें जास्त पुण्य लागतें. (८०) स्कन्दपुराणांत शिवांनीं कार्तिकस्वामीस उद्देशून ह्मटलें कीं, जो व्रतधारी जंगम आहे, त्याचें पूजन केलें तर तें श्रेष्ठ असून अविनाशी आहे; मुला षडानना, मी तुला पुनः असें सांगतों कीं ' जंगमाच्या पूजनाचें व दर्शनाचें फळ अधिक आहे. (८१) शिवाची भक्ति करणारा मनुष्य शिवपूजन करावयाच्यावेळीं ज्या ज्या वस्तु शिवास अर्पण करितो; त्या त्या वस्तु त्यानें जंगमलिंगाची पूजा करावयाच्यावेळीं जंगमाला अर्पण कराव्या. त्यानंतर शिवास अर्पण कराव्या. (८२) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, स्थावरलिंगाचें पूजन करण्यापेक्षां जंगमलिंगाचें पूजन करणें जास्त श्रेयस्कर आहे, असा शेंकडो लोकांस अनुभव आलेला आहे, त्यावरून जंगमलिंग हें श्रेष्ठ आहे. (८३) दुसऱ्या ग्रंथांत ह्मटलें आहे कीं, जंगमलिंग हें नाद, बिंदु आणि कला ह्यांहून अतीत (श्रेष्ठ) आहे. वेद आणि शास्त्र ह्यांच्या ज्ञानशक्तीच्या बाहेर आहे. जंगमलिंगाला जन्म, तारुण्य आणि मरण हीं नाहींत. तें नित्य असून

हितं नित्यानंदात्मकं निजम् ॥ शुचिर्भूत्वा विधानेन चरलिंगं प्रपूजयेत् ॥८३॥ लैंग्ये ॥ कोटितीर्थसदास्नानात्कोटिलिंगार्चनाजपात् ॥ कोटिक्षेत्राटनात्पुण्यं विशेषं चरपूजने ॥ ८४ ॥ वीरागमे ॥ पंचत्वं प्रापिते देहे वस्त्रालंकरणादिवत् ॥ विना जंगमलिंगस्य प्रसादं च ममार्पयेत् ॥ ८५ ॥ शिवरहस्ये ॥ अनादिर्जंगमश्चैव सादिलिंगस्थलं भवेत् ॥ अनादेस्तु विरुद्धो न इष्टोच्छिष्टं तु किल्बिषम् ॥ ८६ ॥ स्कांदे ॥ लिंगस्य चेतनं कृत्वा जंगमस्य प्रसादतः ॥ चरोच्छिष्टं विना वत्स न च लिंगं न च क्रिया ॥ ८७ ॥ लैंग्ये ॥ क्षीरकुंभसहस्राणि घृतकुंभशतानि च ॥ विनार्पयेच्चरोच्छिष्टमिष्टलिंगेन हि प्रिये ॥ ८८ ॥ ॥ वीरागमे ॥ स्वर्णोदकसहस्रैश्च रत्नोदकशतैरपि ॥ स्नापिते चरपादांबु विना लिंगे निरर्थकम् ॥८९॥ तत्रैव ॥ चरपादोदकस्नानं विशेषं मम कथ्यते ॥ एतद्भक्तिविहीनस्य रोचते न च पूजनम् ॥९०॥

---

आनंदस्वरूप आहे. त्या चर ( जंगमलिंगाची ) मनुष्यानें शुचिर्भूत होऊन यथाविधीनें पूजा करावी. ( ८४ ) लिंगपुराणांत ह्मटलें आहे कीं, मनुष्यानें नेहमीं कोटि तीर्थांत स्नानें केलीं, कोटि शिवलिंगांची पूजा केली, शिवपंचाक्षरीमंत्राचा एक कोटि जप केले, किंवा एक कोटि शिवलिंगक्षेत्राच्या यात्रा केल्या, तर जें कांहीं पुण्य लागतें; त्यापेक्षां चरलिंगाच्या ( चरमूर्तींच्या ) पूजनाचें पुण्य जास्त आहे. ( ८५ ) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, शरीरास मरण आल्यानंतर उंचीउंची वस्त्रें आणि सोन्याचे दागदागिने घालणें व्यर्थ आहे, त्याप्रमाणें जंगमलिंगाच्या प्रसादावांचून मला वस्तु अर्पण करणें व्यर्थ आहे. ( ८६ ) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, अनादिजंगम हाच आदिलिंगस्थल होइल. तो अनादीचा ( जंगमलिंगाचा ) प्रसाद वेदशास्त्राविरुद्ध नाहीं, हा जंगमलिंगाचा प्रसाद घेतल्यावांचून इष्टलिंगाचा प्रसाद घेऊं नये. ( ८७ ) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, जंगमाच्या प्रसादानें लिंगास चेतन ( सजीव ) करावें. शिव ह्मणतात—मुला, षडानना, जंगमाच्या उच्छिष्टावांचून लिंगही नाहीं आणि क्रिया नाहीं. ( ८८ ) लिंगपुराणांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात पार्वती, इष्टलिंगाच्या पूजेच्या वेळीं जंगमाचें प्रसाद अर्पण केल्याशिवाय हजार दुधाच्या घागरी किंवा शंभर तुपाच्या घागरी भरलेल्या इष्टलिंगास अर्पण केल्यातरी त्यांचा कांहीं उपयोग नाहीं. ( ८९ ) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, इष्टलिंगाच्या पूजेच्यावेळीं जंगमलिंगाच्या पादतीर्थांचा जर इष्टलिंगास अभिषेक केला नाहीं, आणि सोन्याच्या हजार घागरींनीं किंवा रत्नांच्या शंभर घागरींनीं इष्टलिंगास स्वच्छोदकानें अभिषेक केला, तरी त्याचा कांहीं उपयोग नाहीं. ( ९० ) तेथेंच आणखी असेंही सांगितलें आहे कीं, इष्टलिंगास जंगमपादोदकाचा अभिषेक करणें हें शिवास फार प्रिय आहे असें ह्मणतात, अशा रीतीनें पूजन करणें हें जो मनुष्य शिवभक्त नाहीं

किंच ॥ चरोच्छिष्टेन मां कोऽपि विनापि भजते यदि ॥ नास्ति तस्य विनिर्मोक्षः संसारे जन्मकोटिभिः ॥ ९१ ॥ शिवरहस्ये ॥ चरलिंगस्य शेषं च भुंक्ते लिंगार्पणं विना ॥ गुरुद्रोही शिवद्रोही परलोको न विद्यते ॥९२॥ वीरागमे ॥ प्रसादं शिवलिंगस्य न संदेहात्समर्पयेत् ॥ जारात्तु जन्म भवति विदुः प्राज्ञा नरोत्तमाः ॥९३॥ भैरवागमे ॥ चरोच्छिष्टं विना यो मां भजते श्रद्धयान्वितः ॥ नास्ति तस्य विनिर्मोक्षः संसाराज्जन्मकोटिभिः ॥ ९४ ॥ शिवरहस्ये ॥ निवेदनेन विधिना विशेषाश्रयमीशितुः ॥ निर्मलस्य विभोस्तस्यामयिकं कलुषान्वितम् ॥ ९५ ॥ विनिवेद्यान्तकथनं वद कारुण्यसागर ॥ प्रसादकलुषं वस्तु जंगमं लिंगमेव च ॥ मंत्रवारि विशुद्धं यच्छिवाय विनिवेदयेत् ॥९६॥ सूतसंहितायाम् ॥ इष्टलिंगप्रतिष्ठायां श्रीरुद्रं शतरुद्रियम् ॥ अभिषेको न कर्तव्यः कर्तव्यं पादतीर्थतः ॥ ९७ ॥ वीरागमे ॥ जंगमानां च चरणपूजनं शिवपूजनम् ॥ गन्धाक्षतप्रसूनादिधूपदीपनिवेदनैः ॥ ९८ ॥ चरलिंगस्य

---

त्यास मुळींच आवडत नाहीं. ( ९१ ) आणखी असें ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात, जंगमाच्या उच्छिष्टावांचून जर कोणी मनुष्य माझी उपासना करील, तर त्यानें कोट्यावधि जन्म घेतले तरी त्याची संसारदुखांतून मुक्तता होणार नाहीं. ( ९२ ) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, चरलिंगाचें उच्छिष्ट इष्टलिंगास अर्पण केल्याशिवाय जो कोणी भक्षण करितो तो गुरुद्रोही समजावा, तो शिवद्रोही समजावा; त्यास परलोकाची प्राप्ति होत नाहीं. ( ९३ ) वीरागमांत ह्मटलें आहे कीं जंगमाचें उच्छिष्टान्न इष्टलिंगास अर्पण करणें चांगलें नाहीं असा संशय येऊन जो कोणी इष्टलिंगास जंगमोच्छिष्ट अर्पण करणार नाहीं; त्याला व्यभिचारी स्त्रीचे पोटीं दुराचारी मनुष्यापासून जन्म येतो असें मोठमोठे ज्ञानीलोक ह्मणतात. ( ९४ ) भैरवागमांत ह्मटलें आहे कीं, जंगमाच्या उच्छिष्टावांचून जो कोणी मनुष्य भक्तिभावानें मला भजतो; त्यानें कोट्यावधि वेळ संसारांत जन्म घेतले तरी जन्ममरणापासून त्याची सुटका होत नाहीं. ( ९५ ) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, परमेश्वराला यथाविधीनें वस्तु समर्पण करणें जास्त श्रेयस्कर आहे, तो परमेश्वर निष्पाप स्वभावाचा आहे, त्याला सदोषवस्तु समर्पण करणें चांगलें नाहीं, ती निर्दोष असावी. ( ९६ ) हे कृपासमुद्रा' जंगमाला आणि लिंगास प्रसादकलुषवस्तु समर्पण केली तर शेवटीं त्याचें काय फळ मिळतें तें तूं आह्मांस सांग. तसेंच जें मंत्रोदक स्वच्छ आणि शुद्ध असेल तेंच शिवाला समर्पण करावें. (९७) सूतसंहितेंत ह्मटलें आहे कीं, इष्टलिंगाच्या प्रतिष्ठेच्यावेळीं श्रीरुद्र आणि शतरुद्रीय ह्या मंत्रांनीं अभिषेक करूं नये, जंगमाचे पादतीर्थाचा अभिषेक करावा. ( ९८ ) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, जंगमाच्या चरणाचें पूजन करणें हेंच शिवपूजन आहे. ह्यासाठीं गन्ध, अक्षता, फुलें, धूप, दीप, नैवेद्य वगैरे अर्पण करून जंगमाच्या पादाची पूजा करावी. ( ९९ ) जंगमलिंगाची पूजा करावयाच्यावेळीं पादतीर्थाचीही पूजा करावी. व त्यास गन्ध,

पूजायां पादतीर्थं प्रपूजयेत् ॥ गन्धाक्षतप्रसूनादिधूपदीपं निवेदयेत् ॥ ९९ ॥ शिवलिंगाभिषेकार्थं साधयेत् पापशोधनम् ॥ प्रसादान्नं भोजयेच्च वीरशैवस्य दीक्षया ॥१००॥ ब्रह्माण्डपुराणे॥ममापि चरलिंगस्य प्रसादान्नं समर्पयेत्॥ तच्छेषं शिवभक्तश्च भुंजीयात्सविशेषतः ॥ १०१ ॥ कालिकाखण्डे ॥ जंगमे सर्ववस्तूनि समर्प्यं सुविचारतः ॥ तद्द्रव्यं च पदार्थोक्तं तत्पदार्थं च लिंगके ॥ १०२ ॥ निवेदितप्रसादं च भोजयेत् सततं सुधीः ॥ रसानां लंपटं त्यक्त्वा शिवमार्गानुवर्तिनाम् ॥ भक्तानां सुप्रसादं च शिवलिंगे निवेदयेत् ॥ १०३ ॥ शिवधर्मोत्तरे ॥ लिंगार्पितप्रसादं च न दद्याच्चरलिंगके ॥ चरार्पितप्रसादं च दद्याच्च शिवलिंगके ॥ १०४ ॥ समाघ्रातं परिस्पृष्टं यथा दृढमनिच्छया ॥ मनोवाक्कायकर्मभ्यश्चरलिंगे समर्पयेत् ॥ तत्प्रसादं पुनर्लिंगे दत्वोच्छिष्टं तु सेवयेत् ॥ १०५ ॥ ग्रंथान्तरे ॥ मुक्त्वा पूजां तु लिंगस्य चरलिंगं तु सेवयेत् ॥ तां पूजां चरलिंगस्य कृत्वा द्रव्यं निवेदयेत् ॥ तत्प्रसादविमिश्रं तु श्रेष्ठं लिंगे निवेदयेत् ॥ १०६ ॥ श्रोत्रादींद्रियसौख्यं च मुक्त्वा

---

अक्षत, फूल, धूप आणि दीप वगैरे उपचार करावेत. ( १०० ) शिवलिंगाला अभिषेक करावयासाठीं निर्मळ पाणी मिळवावें आणि वीरशैवांची दीक्षा घेऊन प्रसादान्न भक्षण करावें. ( १०१ ) ब्रह्माण्डपुराणांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात—पार्वती, माझी पूजा केली तरी पूजा करणाऱ्या भक्तानें मला प्रसादान्न समर्पण करावें. व त्या प्रसादान्नाचें जें शेष राहील तें त्यानें ( भक्तानें ) मोठ्या आवडीनें भक्षण करावें. ( १०२ ) कालिकाखण्डांत ह्मटलें आहे कीं, सारासार विचार करून जंगमास सर्व वस्तु समर्पण कराव्या. त्या समर्पण केलेल्या द्रव्यालाच पदार्थ असें ह्मणतात, आणि ते पदार्थ लिंगाला अर्पण करावे. ( १०३ ) लिंगास अर्पण केलेले पदार्थ विद्वान् मनुष्यानें नेहमीं भक्षण करावे; आपल्याला ज्या रसाची फारच आवड असेल, ती आवड न पाहतां, शिवधर्माप्रमाणें आचरण करणाऱ्या भक्तांचा उत्तम प्रसाद शिवलिंगाला समर्पण करावा. ( १०४ ) शिवधर्मोत्तरांत ह्मटलें आहे कीं, शिवलिंगास समर्पण केलेला प्रसाद जंगमलिंगास अर्पण करूं नये, जंगमलिंगास समर्पण केलेला प्रसाद शिवलिंगास अर्पण करावा. ( १०५ ) पदार्थ चांगला सायला आहे, किंवा नाहीं हें आधीं चाखून पाहून, सोंवळें ओंवळें नीट संभाळून सहजरीतीनें दृष्टीस पडलेला पदार्थ कायावाचामनेंकरून जंगमलिंगास समर्पण करावा, तो प्रसाद पुनः शिवलिंगास समर्पण करावा आणि मग बाकी जें शेष राहील तें आपण भक्षण करावें. ( १०६ ) इतर ग्रंथांत असें सांगितलें आहे कीं, अगोदर शिवलिंगाची पूजा न करितां जंगमलिंगाची पूजा करावी व चरलिंगाची पूजा झाल्यावर चरलिंगाला जें द्रव्य समर्पण करावयाचें तें प्रसादमिश्र असून फार श्रेष्ठ असावें. व तें शिवलिंगास समर्पण करावें. ( १०७ ) कान, डोळे, वगैरे इंद्रियांस ज्या वस्तु प्रिय असतील त्या त्या सर्व वस्तु लिंगभक्ति करणाऱ्या भक्तानें शिवलिंगास समर्पण कराव्या.

लिंगोपभोगिना ॥ लिंगेऽपि तु समर्प्यं स्याच्चरलिंगप्रसादकम् ॥ १०७ ॥ पारमेश्वरागमे ॥ वृत्तम् ॥ तापत्रयाणां च मलत्रयाणां गुणत्रयाणां विहतिप्रभावम् ॥ प्रसादलेपं च पुनश्चरस्य लिंगे च दत्वा शरणः प्रभुंक्ते ॥ १०८ ॥ विजयभैरवागमे ॥ लिंगप्रसादं सकलं चरोच्छिष्टं तु निष्कलम् ॥ चरशेषात्पदं नास्ति लिंगोच्छिष्टं फलप्रदम् ॥ १०९ ॥ तन्निमित्ताद्भवांभोधिं तर्तुं तच्चरशेषकम् ॥ स्वेष्टलिंगे तु तद्दत्वा पुनर्भोजनमाचरेत् ॥ ११० ॥ किंच ॥ तच्छेषं स्वेष्टलिंगस्य भोजयेत् सततं सुधीः ॥ १११ ॥ स्थावरं जंगमं चेति द्विविधं लिंगमुच्यते ॥ चराग्रे स्थापयेत्पश्चात् शुद्धान्नमिति कथ्यते ॥ ११२ ॥ तदन्नं शिवलिंगे तु दत्वा निर्मलभावतः ॥ प्रसाद इति निश्चित्य तत्प्रसादं तु सेवयेत् ॥ ११३ ॥ चरलिंगे विचारेण समर्प्य तदनंतरम् ॥ स्वलिंगे च प्रसादान्नं दत्वा भोजनमाचरेत् ॥ ११४ ॥ स्कान्दे ॥ चर एव स्वलिंगं च शेषं लिंगे समर्पयेत् ॥ चरेंद्रियमुखद्वारे सदा सन्निहितः शिवः ॥११५॥

---

आणि चरलिंगाचा प्रसादही इष्टलिंगास समर्पण करावा. (१०८) पारमेश्वरागमांत ह्मटलें आहे कीं, उरलेला प्रसाद हा आध्यात्मिक, आधिभौतिक आणि आधिदैविक या तीन प्रकारच्या तापांचा नाश करितो, आणवमल, मायामल, आणि कार्मणमल ह्या तीन मलांचा नाश करितो, सत्वरजस्तम ह्यांचें प्राबल्य चालूं देत नाहीं. पूर्वोक्त तापत्रयादि सर्व दोष विशेषेंकरून संहार करण्याचें सामर्थ्य ज्यांस आहे, असा जंगमलिंगाचा प्रसाद शिवलिंगाला समर्पण करून मग शरण मनुष्य स्वतः भक्षण करितो. (१०९) विजयभैरवागमांत ह्मटलें आहे लिंगाचा प्रसाद हा सकल (कलासंहित, सप्रपंच) आहे, आणि प्रसाद हा निष्कल (निष्प्रपंच) आहे. जंगमलिंगाचा प्रसादशेष घेतला तर मोक्षपदाखेरीज दुसरें पदच नाहीं; आणि शिवलिंगाचा प्रसाद ग्रहण केला तर स्वर्गलोक आणि ह्या जगांत सुखोपभोग हीं फळें मिळतात. (११०) ह्या कारणासाठीं संसारसमुद्र तरावयास जंगमाचा उरलेला प्रसाद इष्टलिंगास समर्पण करून नंतर भोजन करावें. (१११) आणखी इष्टलिंगाचा जो प्रसाद उरला असेल तो बुद्धिमान् मनुष्यानें भक्षण करावा. (११२) स्थावरलिंग आणि जंगमलिंग असे लिंगाचे दोन प्रकार आहेत, जंगमलिंगास जें अन्न समर्पण केलें त्यास मग शुद्धान्न असें ह्मणतात. (११३) तें अन्न शिवलिंगाला निष्पापमनानें अर्पण करावें, आणि मग तो प्रसाद आहे असें समजून तें अन्न आपण भक्षण करावें. (११४) विचारपूर्वक जंगमलिंगास अन्न समर्पण करावें आणि त्यानंतर तें प्रसादान्न आपल्या इष्टलिंगास समर्पण करून मग भोजन करावें. (११५) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, जंगम हाच स्वतः इष्टलिंग आहे, जंगमाचें शेष इष्टलिंगाला समर्पण करावें; जंगमाच्या मुखरूपी इंद्रियांत सदाशिव नेहमीं जवळ उभा असतो.

ग्रंथान्तरे॥ सिक्थे सिक्थे महादेवि कोटिलिंगार्चनं भवेत्॥ जंगमस्य प्रसादान्नं नैवेद्याय प्रकल्पयेत् ॥ ११६ ॥ प्रदेशान्तरे ॥ द्रव्यं क्रियास्वरूपं च प्रसादं निर्मलं तथा ॥ पदार्थो जन्महेतुः स्यात्प्रसादो भवनाशनः॥ तस्माज्जंगमलिंगस्य प्रसादं च ममापणम्॥ ११७ ॥ ग्रंथान्तरे ॥ निखिलानि पदार्थानि समर्प्य तदनंतरम्॥ ममापि तत्प्रसादं च दत्वोच्छिष्टं तु भोजयेत्॥ ११८ ॥ वीरागमे ॥ द्रव्यस्वरूपं विज्ञाय चरलिंगे समर्पयेत् ॥ तत्प्रसादं स्वेष्टलिंगे दत्वा तच्छेषमुत्तमम् ॥ भोजयेत् सततं भक्त्या स एव शिव उच्यते ॥ ११९ ॥ ब्रह्मांडपुराणे ॥ चरमेव प्रशंसन्ति तच्छेषान्नस्य भोजनात्॥ सायुज्यपदवी देवि मम वाक्यं न संशयः॥ १२० ॥ अस्मिन्नर्थे कालिकाखण्डे ॥ तस्माल्लिंगार्चनं कार्यं शुद्धवस्त्विति भावतः ॥ १२१ ॥ चराचरविभेदेन मद्रूपं द्विविधं स्मृतम्॥ चरेण शुद्धं द्रव्यं चेदचरे चार्पितं मम ॥ १२२ ॥ योऽयं चर इति ख्यातो मम देहात्मतां गतः॥ शब्दादिविषयास्तेन स्पृष्टाः शुद्धिं प्र-

---

(११६) इतर ग्रंथांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात हे पार्वती, प्रसादान्नाचें एकेक शीत शिवास अर्पण केलें तरी एक कोटि शिवलिंगें पूजन केल्याचें पुण्य लागतें, ह्यासाठीं जंगमाचें प्रसादान्न शिवास नैवेद्य दाखविण्याकरितां ठेवावें. ( ११७ ) दुसऱ्या जागीं ह्मटलें आहे कीं, द्रव्य, क्रिया, स्वरूप, प्रसाद, आणि निर्माल्य हे पांच भेद मानलें आहेत. पदार्थ हा जन्ममरणाला कारण आहे आणि प्रसाद हा संसारांतून मुक्तता करण्यास कारण आहे. ह्यासाठींच जंगमलिंगाचा प्रसाद मला समर्पण करावा. (११८) दुसऱ्या ग्रंथांत लिहिलें आहे कीं, अगोदर जंगमलिंगाला सर्व प्रकारचे पदार्थ समर्पण करावे, त्यानंतर तो प्रसाद ( मला ) शिवलिंगाला समर्पण करावा. आणि मग बाकी उरलेला प्रसाद भक्तानें भक्षण करावा. ( ११९ ) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, द्रव्याचें स्वरूप ओळखून तें जंगमलिंगास समर्पण करावें. मग तो प्रसाद आपल्या इष्टलिंगास समर्पण करून बाकी उरलेलें उत्तम अन्न नेहमीं भक्तानें भक्तिपूर्वक भक्षण करावें. असा भक्तिभावानें प्रसाद भक्षण करणारा असतो त्यालाच शिव ह्मणतात. (१२०) ब्रह्माण्डपुराणांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात—पार्वती, जंगमाचीच प्रशंसा करितात. जंगमाच्या प्रसादाचें भक्षण केलें असतां सायुज्यपदवी मिळते, हें माझें बोलणें कधीं खोटें व्हावयाचें नाहीं. ( १२१ ) ह्याच अर्थाचें कालिकाखण्डांत वचन आहे—ह्यासाठीं शुद्धवस्तु अशा समजुतीनें लिंगपूजन करावें. ( १२२ ) शिव ह्मणतात, पार्वती. स्थावर आणि जंगम अशीं दोन प्रकारचीं माझीं रूपें आहेत, जंगमाचे द्वारानें जें द्रव्य शुद्ध झालें, तें माझ्या स्थावरलिंगाला अर्पण करावें. ( १२३ ) ज्याला चर ( जंगम )असें प्रसिद्ध नांव आहे. तो माझें स्वरूप बनलेला असतो तो ज्या ज्या शब्द वगैरे विषयांस स्पर्श करितो ते ते विषय पवित्र हो-

यांति हि ॥ १२३ ॥ तैत्तरीयोपनिषदि ॥ चरणं पवित्रं विततं पुराणं येन पूतस्तरति दुष्कृतानि तेन पवित्रेण शुद्धेन पूता अतिपाप्मानमरातिं तरेम ॥ १२४ ॥ पारातश्रुतौ ॥ लोकस्य द्वारमर्चिमत्पवित्रं ज्योतिष्मत् भ्राजमानं महस्वदमृतस्य धारा बहुधा दोहमानं चरणं नो लोके सुधितां दधातु ॥ १२५ ॥ अथर्वणे ॥ तं त्वौदनस्य पृच्छामि ॥ १२६ ॥ वाचिकत्वाच्छुद्धो लिंगार्पणचेता मुखेन जंगमानां च शुद्धं द्रव्यं भवति ॥ १२७ ॥ जाबालोपनिषदि ॥ चरं मेयमानं दृशे तच्छेषं येन भुज्यते परब्रह्मयस्तच्छेषं मम तृप्तिर्न संशयः ॥ १२८ ॥ अथर्वणशिखायाम् ॥ भ्रुवोर्मध्ये मम रूपं सहस्राब्जे लिंगं स्थितं पश्चिमे शिखायां जंगमः शून्यो विश्वानुग्राहको जंगमः जंगमस्य पादांबुना शिवलिंगस्य स्नपनं तत्प्रसादं च भोजयेत् ॥ १२९ ॥ अथर्वणे ॥ ॐ जंगमस्य सिक्तपादांभो लिंगस्य तन्नुमीरयेत् तत्प्रसादो भोग्यपदं पादां-

---

तात ( १२४ ) तैत्तरीयोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, पवित्र, व्याप्त, पुरातन, पाद ( जंगमाचा-पाद ) जो असेल, त्या पादाच्यायोगानें पाप सर्व निघून जातें( पादपूजेनें पापी तरून जातो)-पवित्र, शुद्ध अशा त्या पादानें ( पादपूजेनें ) पवित्र होऊन अतिशय पापरूपी संसारशत्रूला तरून जातो ( पादपूजेनें पापरूपी संसारशत्रु निघून जातात ). ( १२५ ) पारातश्रुतींत ह्मटलें आहे कीं, सर्व लोकाला कारणीभूत ( उत्पत्तीला कारणीभूत ) असून सतेज आणि पवित्र आहे, व ज्योतिरूप असून प्रकाशमान आहे, व ब्रह्मस्वरूप असून पुष्कळ पादोदकरूपी अमृताच्या धारा दोहन करीत आहे ( अमृताच्या धारा देतें ) असें चरण आह्मांस जगामध्यें उत्तम बुद्धि देवो. ( १२६ ) अथर्वणांत ह्मटलें आहे कीं, हे चरमूर्ति, प्रसिद्ध अशा त्या तुह्मास शेषप्रसादान्न द्या, अशी सविनय प्रार्थना करितों. ( १२७ ) जंगमांच्या मुखानें शुद्ध झालेलें हविर्द्रव्य शिवलिंगास अर्पण करण्याविषयीं ज्याचें मन होतें, तो प्राणी शुद्ध आहे, असें सांगितल्या कारणानें जंगमांचा प्रसाद घेऊन शिवलिंगास समर्पण करून मग आपण घ्यावें, असें तात्पर्य यांतलें आहे. ( १२८ ) जाबालोपनिषदांत ह्मटलें आहे कीं, समजण्यास योग्य अशा वस्तूला प्रमाणभूत होऊन चरलिंगाच्या रूपानें मी दिसतों. त्या चरलिंगाच्या प्रसादाचा उपभोग जो घेतो, त्याचा शेष जो असेल तो शेष पदार्थ परब्रह्म अशा लिंगस्वरूपी मला तृप्ति देणारा आहे, यांत संशय नाहीं ( १२९ ) अथर्वणशिखेंत ह्मटलें आहे कीं, दोन्ही भिवयांच्या मध्यमार्गी ह्मणजे आज्ञाचक्रांत महालिंग नांवाचें माझें रूप आहे, व ब्रह्मरंध्रांत असलेल्या हजार दळांच्या कमलांत निष्कललिंग नांवाचें माझें रूप आहें, व तीन दळांच्या शिखाचक्रांमध्यें शून्यलिंग आहे, व शिखाग्राच्या पश्चिम भागांत सर्व चैतन्यस्वरूप जंगमलिंग आहे, सर्व जगावर अनुग्रह करणारा जो जंगम आहे, तो पश्चिम भागांत राहत आहे त्या जंगमलिंगाच्या पादोदकानें इष्टलिंगाला अभिषेक घालावा, व त्या जंगमाचा प्रसाद इष्टलिंगाला समर्पण करावयास ठेवावा. ( १३० ) अथर्वणवेदांत ह्मटलें आहे कीं, प्रणवस्वरूपी जंगमाचें चरण

बुजसलिलं आसेवितं भुंजीयादन्यं नोपासीत शिवलिंगकारिं पायात् ॥ १२० ॥ यजुर्वेदे ॥ ॐ नमः परमात्मने ब्राह्मे मुहूर्ते उत्थाय शरीरं परिमार्जयेत् गुरुवन्दनं कृत्वास्य मठे आगत्य जंगमपादयोर्नमः जंगमं स्वगृहं प्रवेश्य तत्रादौ प्रोक्षयित्वास्य परमेश्वरस्य आशा नास्ति परमेश्वरो भगवान् स्यात् स्थावरं जंगमं चैव त्रैलोक्यं जंगममध्यात् जंगम ईश्वररूपः जंगमपादोदकं सकलतीर्थानां श्रेष्ठं यदा लिंगस्य समर्पितं तत्तीर्थं पाषाणं लिंगं भवेत् तस्य सेवितभक्तास्ते भक्ताः परमेश्वररूपाः ये जंगमरूपिणः प्रणवस्वरूपाः यथा तद्रूपः परमेश्वर एकमूर्तिस्त्रयो भागाः स्युर्गुरुः स्याद्वेल्लिंगरूपं च तयोर्जंगमाधिकं भवेत् त्रिविधमेकभेदं च एकभेदं त्रिभागं च त्रिविधस्वरूपमेकं भवेत् वेदा वदन्ति सर्वे मुनयो भाषितं सत्यं सत्यं पुराणागमोपपुराणप्रसिद्धं स्मरेत् सर्वदेवानां ब्रह्मविष्णुरुद्राणां च त्रिमूर्तीनां चैतन्यं जंगमं चैव जंगममुखेन परमेश्वरस्तृप्तः रुद्रस्तस्य प्राणायामत्रयं कृत्वा समाघ्रातमूले तत्र स्थितो

---

प्रक्षालन करून ( अभिषेक घालून ) तें पाणी ( पादोदक ) लिंगाच्या ( इष्टलिंगाच्या ) मस्तकावर घालावें. व त्या जंगमाचा प्रसाद शिवलिंगास ( इष्टलिंगास ) समर्पण करावा, शिवलिंगास अर्पण केलेला तो प्रसाद व पादोदक आपण घ्यावें, दुसरें स्थावरलिंग वगैरेचें पादोदक व प्रसाद कधींही घेऊं नये. ( १२१ ) यजुर्वेदांत ह्मटलें आहे कीं, सूर्योदयापूर्वी चार घटका रात्र असतांना उठून "ॐनमः परमात्मने" या मंत्राचा उच्चार करून ( स्मरण करून ) आपल्या शरीरावर अनुलोम विलोम क्रमानें मार्जन करावें, नंतर श्रीगुरूच्या चरणांस नमस्कार करावा, मग या जंगममूर्तीच्या मठांत येऊन त्या जंगमदेवाच्या दोन्ही पायांला नमस्कार करून आपल्या घरीं त्या जंगमाला आणून आपल्या घरांत त्या जंगमाचे पाय धुवून त्याला आसन देऊन बसवावें. या शिवस्वरूप जंगमदेवाला आशा कोणतीही नाहीं, व हा जंगम केवळ षड्गुणैश्वर्यसंपन्न असा साक्षात् शिवच होय. स्थावरजंगमरूप त्रैलोक्य हें या जंगमदेवाच्या मध्यभागीं आहे, व जंगम हा केवळ शिवस्वरूप आहे, व या जंगमाचें पादोदक भागीरथी वगैरे सर्व तीर्थांपेक्षां श्रेष्ठ आहे, व तें जंगमपादोदक जेव्हां इष्टलिंगाला समर्पण केलें जाईल तेव्हां तें लिंग पाषाणलिंग असें न ठरून शिवलिंग असें प्रसिद्धीस येतें. आणि तें जंगमपादोदक सेवन करणारे भक्तलोक ( प्राशन करणारे भक्तलोक ) जे असतील ते भक्तलोक शिवस्वरूप आहेत, व प्रणवस्वरूप ( ॐकारस्वरूप ) आहेत, जसें जंगमरूपी परमेश्वर ( शिव ) एकमूर्ति असून त्याचे तीन भाग ( तीन मूर्ति ) होतात, आणि तोच गुरुरूप होतो, व तोच लिंगरूप होतो, या गुरुलिंगांमध्यें जंगमलिंगच श्रेष्ठ होय. हे तीन्ही भाग ( गुरु, लिंग जंगम, ) मिळून एकच रूप होय, आणि याचेच तीन भाग होतात, याप्रमाणें वेद सांगतात. व पुरातन असे सर्व ऋषि याचविषयीं खरें खरें बोलतात, आणि हें पुराण आगम उपपुराण यामध्यें प्रसिद्ध

ब्रह्ममध्ये मातृगणाः स्मृताः कुक्षौ च सागरास्सर्वऽपि द्वीपाः वसुंधरा ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदो ह्यथर्वणः अंगैश्च सहितास्सर्वे मार्जयेत् वेदा वदन्ति भाषितं सा प्रतिष्ठा त्रैलोक्ये च यजुर्वेदादिसमश्रुतिपंचदशाध्याये प्रोक्तम् ॥ १३१ ॥ जाबालोपनिषदि ॥ चरमियं वै देवता दृश्यते शेषो भुंजते परब्रह्म स्यात्तच्छेषं तृप्तिर्न संशयः ।१३२। ब्रह्मगीतायाम् ॥ जंगमानां च पादांबु तत्प्रसादस्य सेवनम् ॥ सेविनां मोक्षसिद्ध्यर्थं सत्यमीश्वरभाषितम् ॥ १३३ ॥ अस्मिन्नर्थे परमरहस्ये ॥ चरस्य पादतीर्थेन लिंगमज्जनमुत्तमम् ॥ तत्प्रसादो महादेवि नैवेद्यं शुभदं भवेत् ॥ १३४ ॥ स्कांदे ॥ तस्य जंगमलिंगस्य प्रसादं लिंगसेवितम् ॥ मया प्रोक्तं तु कर्तव्यं पज्जलं शिखिवाहन ॥ १३६ ॥ वीरागमे ॥ चरपादोदकाल्लिंगं स्नाप्य प्रसादमर्पयेत् ॥ एतन्मार्गप्रचारी

---

आहे आणि सर्व देवांना व ब्रह्मविष्णुशिव या त्रिमूर्तींना हें जंगमलिंग चैतन्यस्वरूप होऊन राहिलें आहे, अशा जंगमलिंगाचें स्मरण करावें. जंगमाच्या मुखानें परमेश्वर तृप्त होतो, व हा शिव चांगल्या आम्रातकाच्या ( अंबटीच्या ) झाडाच्या मुळीपाशीं बसून तीन प्राणायाम करून त्या जंगमाचें स्मरण करितो. त्या ब्रह्ममध्यें, व त्या ब्रह्मपींच्या मध्यभागीं सप्तमात्रारूप शक्तिदेवतांचे गण ( समूह ) राहतात. भूमि यांतच राहते त्या जंगमाच्या कुक्षींत सात समुद्र राहतात. सर्व द्वीपें यांतच राहतात. व जंगमाच्या पुढच्या प्रदेशावर भूमि राहते, व याचप्रमाणें ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्वणवेद यांशिवाय जे अनंतवेद शिक्षा' व्याकरण, निरुक्त वगैरे अंगांसहित वर्णन करतात, सर्व शास्त्रांचें ह्मणणें असेंच आहे, वेदाचें ह्मणणें असेंच आहे, व यजुर्वेदादि श्रुतींच्या बरोबरीच्या श्रुतींमध्यें, व पांच संख्येचे विष्णुपुराणांमध्यें, व दहा संख्येच्या शिवपुराणांमध्यें ( यांतल्या प्रत्येक अध्यायामध्यें ) असेंच सांगितलें आहे. या तऱ्हेची श्रुत्यर्थांची प्रतिष्ठा तीन्ही लोकांमध्यें रूढीनें मानिली जात आहे. ( १३२ ) जाबालोपनिषदांत सांगितलें आहे कीं, ही परशिव देवता चरवस्तूच्या रूपानें दिसते, त्या चरस्वरूपी परशिवयोग्याचा भुक्तशेष ( प्रसाद ) परब्रह्मस्वरूप आहे. ह्मणूनच त्या प्रसादाचें सेवन करावें. त्या प्रसादान्न भोजनानें तृप्ति होते, ह्यांत संशय नाहीं. ( १३३ ) ब्रह्मगीतेंत ह्मटलें आहे कीं, जंगमाचें पादोदक आणि जंगमाचा प्रसाद सेवन करावा. जंगमाचें पादोदक आणि प्रसाद जे सेवन करितात त्यांस मोक्षाची प्राप्ति होते हें परमेश्वराचें बोलणें अगदीं खरें आहे. ( १३४ ) ह्याचसंबंधानें परमरहस्यांत ह्मटलें आहे कीं, जंगमाच्या पादतीर्थानें शिवलिंगास अभिषेक करणें फार चांगलें आहे, शिव ह्मणतात पार्वती, त्याचा (जंगमाचा) प्रसाद शिवलिंगास नैवेद्य ह्मणून दाखविणें कल्याणकारक आहे. ( १३५ ) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात—हे मयूरवाहना, कार्तिकेया, मी तुला असें सांगतों कीं, जंगमलिंगाचा प्रसाद इष्टलिंगास समर्पण करावा आणि जंगमलिंगाच्या पादतीर्थानें इष्टलिंगास अभिषेक करावा. ( १३६ ) वीरागमांत असें ह्मटलें आहे कीं, जंग-

यः स भक्त इति कथ्यते ॥ १३६ ॥ स्कन्दपुराणे ॥ लिंगभक्ताश्चर्यं वत्स श्रृणुष्वै-कमना इह ॥ चरपादोदकाल्लिंगं स्नाप्य प्रसादमर्पयेत् ॥ १३७ ॥ निरंजनस्य शुद्धस्य निस्स्थलस्य चरस्य च ॥ पादांबुना लिंगमूर्तेः स्नानं कुर्वीत भाजनम् ॥ तत्प्रसादेन तं पश्चाच्छिष्यः प्राणे विनिक्षिपेत् ॥ १३८ ॥ पादोदकं प्रसादान्नं विशेषमधुनोच्यते ॥ मत्प्राणो जंगमो नित्यं मल्लिंगं जंगमस्तथा ॥ १३९ ॥ वीरागमे ॥ पादाभिषेकसलिलं भुक्तशेषान्नमुत्तमम् ॥ अभिषेकं च नैवेद्यप्रसादं शिवलिंगके ॥ ॥ १४० ॥ तत्रैव ॥ पादतोयं च निर्माल्यं प्रसादं च चरस्य च ॥ योऽपि लिंगार्पितं भुंक्ते स रुद्रो नात्र संशयः ॥ १४१ ॥ शिवरहस्ये ॥ पादाब्जतोयनिर्माल्यप्रसादं तु चरस्य च ॥ यस्तु लिंगार्पितं भुंक्ते स रुद्रो नात्र संशयः ॥ १४२ ॥ स्कांदे ॥ तस्माल्लिंगे प्रसादं च निर्माल्यांघ्रिजलं तथा ॥ अर्पयेच्चरलिंगस्य श्रृणु षण्मुख सर्वदा ॥ १४३ ॥ वीरागमे ॥ जंगमस्य प्रसादं तं नैवेद्यार्थं प्रकल्पयेत् ॥ पादोदकजलस्नानं विशेषो हि

---

माच्या पादोदकानें इष्टलिंगास स्नान घालावें आणि जंगमाचा प्रसाद इष्टलिंगास समर्पण करावा. हारीतीनें जो मनुष्य नियमानें चालतो त्यास भक्त असें ह्मणावें. ( १३७ ) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात—मुला कार्तिकेया, मी तुला शिवलिंगभक्तांचा धर्म कसा आहे तें सांगतों, तूं नीट लक्ष्य लावून ऐकून घे. जंगमाच्या पादोदकानें इष्टलिंगास अभिषेक करून जंगमास अर्पण केलेल्या अन्नाचा इष्टलिंगास प्रसाद समर्पण करावा. ( १३८ ) जंगमलिंग हा निरंजन असून निर्दोष आहे, त्यास स्थल नाहीं, त्याचें पादोदक घेऊन त्यानें इष्टलिंगास स्नान घालावें हें योग्य आहे. व त्या जंगमाचा प्रसाद शिष्यानें इष्टलिंगाच्या ठिकाणीं समर्पण करावा. ( १३९ ) पादोदक आणि प्रसादान्न ह्यांमध्यें असलेला विशेष आतां सांगतों, जंगम हा माझा प्राण आहे आणि जंगम हाच माझें लिंग आहे. ( १४० ) वीरागमांत ह्मटलें आहे, जंगमाच्या पादोदकानें शिवलिंगास अभिषेक करावा, आणि जंगमाच्या प्रसादान्नाचा इष्टलिंगास नैवेद्य समर्पण करावा. जंगमाचें पादोदक आणि प्रसाद श्रेष्ठ आहेत. ( १४१ ) तेथेंच आणखी असेंही सांगितलें आहे कीं, जंगमाचें पादोदक, जंगमाचें निर्माल्य आणि जंगमाचा प्रसाद जो कोणी मनुष्य अगोदर शिवलिंगास समर्पण करून मग आपण भक्षण करितो तो प्रत्यक्ष शंकर आहे ह्यांत कांहीं शंका नाहीं. ( १४२ ) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, जंगमाच्या चरणकमलांचें तीर्थ जंगमांचें निर्माल्य आणि जंगमांचा प्रसाद जो कोणी मनुष्य इष्टलिंगास समर्पण करून मग आपण भक्षण करितो तो प्रत्यक्ष शंकरच आहे ह्यांत संशय नाहीं. ( १४३ ) स्कन्दपुराणांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात—मुला, कार्तिकेया, ऐक. जंगमलिंगाचें पादोदक, जंगमलिंगाचें निर्माल्य आणि जंगमलिंगाचा प्रसाद नेहमीं शिवलिंगास समर्पण करावा. ( १४४ ) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात—पार्वती, जंगमलिंगाचा प्रसाद मला नैवेद्याकरितां समर्पण करावा आणि जंगमलिंगाच्या

ममोच्यते ॥ १४४ ॥ शिवरहस्ये ॥ पादतीर्थप्रसादाभ्यां कुर्याल्लिंगार्चनं सदा ॥ यः संवेत स भक्तानां मम रूपं तु पार्वति ॥१४५॥ पारमेश्वरागमे ॥ पादाभिषेकसलिलं लिंगमज्जनमुत्तमम् ॥ मत्प्रसादं च नैवेद्यं तथा मुक्तिफलं ध्रुवम् ॥ १४६ ॥ ब्रह्माण्डपुराणे ॥ जंगमानां च चरणसलिलं पापनाशनम् ॥ प्रसादं मोक्षसिद्ध्यर्थं सत्यमीश्वरभाषितम् ॥ १४७ ॥ जंगमस्य पादतीर्थं लिंगमज्जनमुत्तमम् ॥ तत्प्रसादं महादेवि नैवेद्यं शुभमंगलम् ॥ १४८ ॥ ईश्वर उवाच ॥ तस्माज्जंगमलिंगस्य प्रसादेन ममार्पयेत् ॥ अभिषेकजलस्नानं विशेषं मम कथ्यते ॥ १४९ ॥ चरपादोदकं लिंगे स्नानं प्रसादमर्पयेत् ॥ प्रचारानुभवश्चेति सोऽपि भक्तश्च कथ्यते ॥ १५० ॥ जंगमो ज्ञानरूपश्च क्रियारूपं च लिंगकम् ॥ तदंघ्रिजलस्नानं च शेषं समर्पणं भवेत् ॥१५१॥ तस्माज्जंगमलिंगस्य प्रसादः सेवितो मया ॥ पज्जलेनैव स्नानं हि कर्तव्यं शिखिवाहन ॥ १५२ ॥ लिंगभक्ताश्रयं वत्स शृणुष्वैकमनास्सदा ॥ चरपादोदकं लिंगे स्नाप्य

---

पादोदकानें मला ( शिवलिंगाला ) अभिषेक करणें जास्त श्रेयस्कर आहे. ( १४५ ) शिवरहस्यांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात, पार्वती, जो कोणी मनुष्य जंगमाच्या पादोदकानें मला ( शिवलिंगाला ) अभिषेक करील व जंगमाच्या प्रसादान्नाचा शिवलिंगास नैवेद्य दाखवील आणि शिवभक्तांची चांगली शुश्रूषा करील तो प्रत्यक्ष माझें स्वरूप समजावा. ( १४६ ) पारमेश्वरागमांत ह्मटलें आहे कीं, जंगमाच्या पादोदकानें शिवलिंगाला अभिषेक करणें कल्याणकारक आहे, आणि जंगमाचा प्रसाद शिवलिंगास नैवेद्य ह्मणून समर्पण करणें हें खरोखर मोक्षप्राप्ति करून देणारें आहे. ( १४७ ) ब्रह्माण्डपुराणांत ह्मटलें आहे कीं, जंगमाचें पादोदक सर्व प्रकारच्या पातकांचा नाश करितें, आणि जंगमाचा प्रसाद मोक्षप्राप्ति करून देतो हें परमेश्वराचें ह्मणणें अगदीं खरें आहे. ( १४८ ) शिव ह्मणतात—पार्वती, जंगमाच्या पादोदकानें शिवलिंगास अभिषेक करणें चांगलें, आणि जंगमाचा प्रसाद शिवलिंगाला नैवेद्य ह्मणून समर्पण करणें कल्याणकारक आणि मंगलकारक आहे. ( १४९ ) शिव ह्मणतात—ह्यासाठीं जंगमलिंगाचा प्रसाद मला ( शिवलिंगाला ) समर्पण करावा आणि जंगमाच्या पादोदकानें मला अभिषेक करावा हें जास्त श्रेयस्कर आहे. (१५०) जो मनुष्य जंगमाचें पादोदक घेऊन इष्टलिंगास अभिषेक करितो, जंगमाचा प्रसाद शिवलिंगास नैवेद्य ह्मणून समर्पण करितो व वीरशैवमतांची ज्याला माहिती व अनुभव आहे त्याला भक्त ह्मणावें. ( १५१ ) जंगम हा ज्ञानस्वरूप आहे, इष्टलिंग हें क्रियास्वरूप आहे; त्याचे पादोदकानें इष्टलिंगास अभिषेक करावा आणि त्याच्या प्रसादाचा इष्टलिंगास नैवेद्य समर्पण करावा. ( १५२ ) शिव ह्मणतात—मुला षडानना, ह्यासाठींच मी जंगमलिंगाचा प्रसाद आपणास नैवेद्य ह्मणून मानलेला आहे. जंगमाच्या पादोदकानें मला अभिषेक करावा. ( १५३ ) शिव ह्मणतात—मुला कार्तिकेया, लिंगभक्तांचा वर्तनक्रम कसा

प्रसादमर्पयेत् ॥ १९३ ॥ नंदिकेश्वर उवाच ॥ पादोदकं प्रसादान्नं नित्यमासेविनां नृणाम् ॥ दशपापविनाशस्तु कथ्यते गणपुंगव ॥ १९४ ॥ मत्प्राणो जंगमो देवि मल्लिंगं जंगमस्तथा ॥ आवयोस्ततप्रसादस्तु भोग्यः स्यादिति निश्चितु ॥१९५॥ वीरागमे ॥ स्वयं प्रसादरूपोऽयं सच्चिज्जंगम उच्यते ॥ सौख्यं शतगुणाधिक्यं प्रसादात्प्राप्यते नृणाम् ॥ १९६ ॥ शाकटायने ॥ शिष्यप्राणो गुरुर्देवि गुरुप्राणस्तु जंगमः ॥ जंगमस्य प्रसादः स्यात्सर्वशास्त्रेषु गीयते ॥ १९७ ॥

## वीरशैवाचारप्रदीपिकायां गुरुलक्षणम्

देव्युवाच—कलेः कलुषिते काले दुर्जये दुरतिक्रमे ॥ क्षीणे वर्णाश्रमाचारे संकरे समुपागते ॥ १ ॥ केनोपायेन मुच्यंते भक्तास्तव महेश्वर ॥ २ ॥ ईश्वर उवाच ॥ संसारदुःखकांतारे निमग्नश्च महातपे ॥ चक्रवद्भ्रमते देवि लिंगार्चनविवर्जितः ॥ ३ ॥ यो जातु नार्चयेल्लिंगं न स्मरेन्न च कीर्तयेत् ॥ किं तेन जातमात्रेण भूभार-

---

असतो तो मी तुला सांगतो. तूं नीट लक्ष्य देऊन ऐक. जंगमलिंगाच्या पादोदकानें शिवभक्तानें नेहमीं शिवलिंगास अभिषेक करावा आणि जंगमलिंगाचा प्रसाद शिवलिंगास नैवेद्य ह्मणून समर्पण करावा. ( १५४ ) नंदिकेश्वर ह्मणतो, हे गणश्रेष्ठा, जे कोणी मनुष्य जंगमाचें पादोदक ग्रहण करितात आणि जंगमाचें प्रसादान्न नेहमीं भक्षण करितात, त्यांच्या दहा जन्मांतील पातकांचा नाश होतो असें ह्मणतात. ( १५५ ) शिव ह्मणतात—पार्वती, जंगम हा माझा प्राण आहे आणि जंगम हेंच माझें इष्टलिंग आहे, जंगमाचा व माझा प्रसाद शिवभक्तांनीं अवश्य भक्षण करावा हें पक्कें समज. ( १५६ ) वीरागमांत ह्मटलें आहे कीं, जंगम हा स्वतः प्रसादस्वरूपी आहे, त्यालाच सत् आणि चित् असें ह्मणतात. त्याच्या प्रसादानें मनुष्याला शंभरपटीनें जास्त सुख लागतें. ( १५७ ) शाकटायनांत ह्मटलें आहे कीं, शिव ह्मणतात—पार्वती, गुरु हा शिष्याचा प्राण आहे आणि जंगम हा गुरूचा प्राण आहे, ह्यासाठींच जंगमाचा प्रसाद सर्वांनीं घेतला पाहिजे असें शास्त्रांत सांगितलें आहे.

## वीरशैवचारप्रदीपिकेंतील गुरूचें लक्षण

( १ ) देवी प्रश्न करिते—कलियुगामध्यें काल वाईट आला असून दुर्जय ( जिंकण्यास असाध्य ) झाला आहे, शिवाय तो काल घालविण्यास फार जड जातो. अशा वेळीं वर्ण, आश्रम, आचार वगैरे नष्ट झाले आहेत, जिकडे तिकडे जातीचा संकर दिसतो. असा काल आला असतां. ( २ ) महेश्वरा, तुझ्या भक्तांनीं काय उपाय करावे? आणि ते कोणत्या उपयांनी मुक्त होतील हें सांगा. ( ३ ) ईश्वर उत्तर देतात—हे देवी लिंगपूजा सोडल्यानें संसारांतल्या दुःखरूपी गहन अरण्यामध्यें सांपडून मोठ्या संतापांत बुडून मनुष्य चक्राप्रमाणें फिरत असतो. ( ४ ) जो कधींही लिंगपूजा करीत नाहीं, आणि नामस्मरण

णात्मशत्रुणा ॥ ४ ॥ अपूजयित्वा चेशानं यो हि भुंक्ते नराधमः ॥ पापानामन्नरूपाणां तस्य भोजनमुच्यते ॥ ५ ॥ नास्ति लिंगार्चनं यस्य म्लेंछयोनौ प्रजायते ॥ न शिवार्चनसाम्योऽस्ति धर्मोऽन्यो भुवनत्रये ॥६॥ इति ज्ञात्वा प्रयत्नेन पूजनीयः सदाशिवः ॥ सत्यं वच्मि हितं वच्मि सारं वच्मि पुनः पुनः ॥ ७ ॥ लिंगमध्ये महादेवः साक्षाद्देवो व्यवस्थितः ॥ अनुग्रहाय लोकानां तस्माल्लिंगं प्रपूजयेत् ॥ ८ ॥ उपदेशं विना लिंगं प्रपूजयति यो नरः ॥ नरके पच्यते देवि सूपदेशो ह्यतः स्मृतः ॥ ९ ॥ यथा मृगपतिं दृष्ट्वा भवेद्भीतो वने गजः ॥ अदीक्षितोऽर्चयेल्लिंगं तथा भीतो महेश्वरः ॥ १० ॥ त्रिपुंड्रं चैव रुद्राक्षं नित्यार्चनजपस्तथा ॥ होमध्यानादिकं सर्वं दीक्षाहीनस्य निष्फलं ॥ ११ ॥ अदीक्षितश्चतुर्वेदी न विशेद्गर्भगेहकं ॥ प्रमादाद्गर्भगेहं तु प्रायश्चित्तं तु कारयेत् ॥ १२ ॥ अदीक्षितश्च यो विप्रः कुर्याल्लिंगस्य पूजनं ॥ अरण्ये निर्जने देवि भवति ब्रह्मराक्षसः ॥ १३ ॥ चतुर्वेदी त्वहंकारी शिवलिंगं तु पूजयेत् ॥ राजराष्ट्रविनाशश्च तस्य ग्रामोऽपि नश्यति ॥ १४ ॥ दीयते ज्ञानसंबंधः क्षीयते च मलत्रयम् ॥ दीयते क्षीयते येन सा दीक्षेति निगद्यते ॥ १५ ॥ उपदेशं

---

व कीर्तनही करीत नाहीं, तो केवळ भूमीला भार होऊन अन्नाचा काळ होतो. मग असा मनुष्य जन्मास येऊन काय उपयोग ? (५) जो नीच मनुष्य ईशपूजा केल्यावांचून जेवतो, तो खन्न खात नसून केवळ पापच खातो. (६) जो लिंगार्चन करीत नाहीं; तो मुसलमानाच्या घरीं जन्म घेतो. शिवपूजेसमान दुसरा धर्म त्रिजगांत नाहीं (७ ( असें जाणून प्रयत्नानें सदाशिवाची पूजा करावी. हें खरें सांगतों. हेंच सार आहे ह्मणून वरचेवर पुनः सांगतों. (८) जगाच्या अनुग्रहाकरितां श्री शंकरानें सर्वदा लिंगांत वास केला आहे, ह्मणून लिंगाची पूजा करावी (९) हे देवी गुरूच्या उपदेशावांचून जो लिंगपूजा करतो, तो नरकांत पडून दुःख भोगतो. ह्मणून उपदेश घ्यावा. (१०) जसा रानांत हत्ती एखाद्या सिंहाला पाहून भितो, तद्वत् दीक्षेवांचून लिंगपूजा करणाऱ्या मनुष्याला पाहून महादेव भितो.(११) त्रिपुंड्र धारण, रुद्राक्ष धारण, नित्य पूजा जप, होम, ध्यान वगैरे हीं सर्व दीक्षा नसून केलीं तर निष्फल होतात. (१२) चतुर्वेदी असला तरीही ब्राह्मणानें दीक्षा घेतल्यावाचून देवाच्या गाभाऱ्यांत जाऊं नये. प्रमादानें कदाचित् गेला तर त्यानें प्रायश्चित्त घ्यावें. (१३) दीक्षा न घेतां जो ब्राह्मण लिंगाची पूजा करतो, तो निर्जन अरण्यांत ब्रह्मराक्षस होऊन राहतो- (१४) ब्राह्मण चतुर्वेदी असला तरी जर अहंकारी होऊन त्यानें शिवलिंगाची पूजा केली तर ज्याच्या राज्यांत तो असतो, त्या राजाचें राष्ट्र नष्ट होतें व राजाची राजधानीही नष्ट होते.(१५) ज्ञान दिलें जातें व तीन मल ( आणवमल, मायामल, कार्मिकमल ) नष्ट केले जातात ह्मणून याला दीक्षा असें नांव मिळालें आहे. (१६) हें गुरो, “ उपदेश द्या वीरशैवाची दीक्षा द्या, ” अशीं शिष्यानें

चोपदिश्य वीरशैवीयदीक्षया ॥ गुरुं विचारयेच्छिष्यो महादेवं प्रपूजयेत् ॥ १६ ॥ वृत्तं ॥ नित्यानित्यविचारवानिह परत्रापेक्षितार्थारतिः शांत्याद्यंगसमन्वितः सुचरितो मोक्षाभिलाषी सुखी ॥ सत्यानंदपरं प्रकाशपरिपूर्णात्मावबोधान्वितं कृत्याकृत्यविवेकिनं गुरुवरं प्रेयान्नरो भक्तिमान् ॥ १७ ॥ सद्वंशजः समापूर्णः प्रशांतः प्रियभाषणः ॥ गंभीरः सत्यवाग्वाग्मी संतुष्टः करुणास्पदः ॥ १८ ॥ स्निग्धः स्मितमुखो रागी प्रगल्भो निरहंकृतिः ॥ शुचिः सुशीलो धर्मिष्ठः सदाक्षिण्यो बृहद्ध्वनिः ॥ १९ ॥ निर्मत्सरो गुणग्राही प्रशांतो विजितेंद्रियः ॥ वेदांगेषु कृताभ्यासः पुराणश्रुतिवित्तमः ॥ २० ॥ सर्वागमेषु कुशलः कुलीनश्च महामतिः ॥ मंत्रोद्धारप्रवीणश्च मंत्रार्थप्रतिपादकः ॥ २१ ॥ ( सुप्रबोधागमे ) पदवाक्यप्रमाणज्ञो वेदवेदांतपारगः ॥ तिथिनक्षत्रयोगज्ञो भूपरिग्रहकर्मवित् ॥ २२ ॥ शैवसिद्धांततत्वज्ञः प्रतिष्ठामंत्रपारगः ॥ मोक्षदः करुणोपेतो वीतरागो विमत्सरः ॥ २३ ॥ क्रियापादे तु निपुणश्चर्यापादे तु रंजकः ॥ योगपादे कृताभ्यासो ज्ञानपादे विशेषवित् ॥ २४ ॥ क्रियादिज्ञानपर्यंतं शिवतत्वविनिश्चयः ॥

---

गुरूला विनंती करून महादेवाची पूजा करावी. ( १७ ) प्रथमतः मनुष्यानें प्रेमयुक्त होऊन नित्य आणि अनित्य याचा विचार करणें, इहपरलोकचे सुखास अप्रिय मानणें, शमदमादि षट्कसंपन्न होणें, सद्वर्तन ठेवणें व मोक्षाची इच्छा धरणें, हीं चार साधनें अंगीं बाणवून, स्वात्मानंदी लीन असलेल्या व कर्म अकर्म जाणणाऱ्या गुरूला प्रेमभावानें शरण जावें. ( १८ ) अशा गुरूचीं आणखी विशेष लक्षणें सांगतों, ऐक. उत्तम कुळांत त्याचा जन्म झालेला असून तो पूर्णांग ( सर्व अवयवांनीं परिपूर्ण ) असावा, शांत असून प्रिय बोलणारा असावा, गंभीर असून सत्य राखणारा असावा, वक्ता असून करुणाशील असावा, संतुष्ट असून ( १९ ) मनमिळाऊ असावा, हंसतमुख असून प्रेम ठेवणारा असावा, प्रौढ असून निरभिमानी असावा, शुद्ध असून सत्य सुशील असावा, धर्मनिष्ठ असून भिडस्त असावा, चांगल्या आवाजाचा असून ( २० ) मत्सररहित असावा, गुणग्रहण करणारा असून शांत असावा, जितेंद्रिय असून वेदांग जाणणारा असावा, पुराण वेद उत्तम जाणणारा असून ( २१ ) सर्व आगमांत कुशल असावा, कुलीन असून मोठा बुद्धिमान असावा, मंत्राची उद्धरणी करण्यांत प्रवीण असून मंत्राचा अर्थ सांगणारा असावा. ( २२ ) ( सुप्रभेदागमांतलें गुरूचें वर्णन येणेंप्रमाणें आहे ) वेदांतलीं पदें व वाक्यें प्रमाणभूत आहेत असें जाणणारा असून वेद व वेदांतांत पारंगत असावा; तिथी नक्षत्र, योग जाणणारा असून भूशुद्धि करण्यांत निपुण असावा; ( २३ ) शैवसिद्धांतांतलीं तत्त्वें जाणणारा असून प्रतिष्ठान मंत्रांत पारंगत असावा; मोक्ष देणारा असून करुणाशील असावा, विषयांविषयीं निर्लोभी असून मत्सररहित असावा; ( २४ ) क्रियापादांत निपुण असून चर्यापादांत रंजक (रंजन करणारा) असावा; योगपादाचा अभ्यास केलेला असून विशेषकरून ज्ञानपाद जाणणारा असावा; ( २५ ) कर्मकांडापासून ज्ञानकांडापर्यंत जरी त्याचें ज्ञान उत्तम

॥ संप्रदायागतज्ञानो लोभदंभविवर्जितः ॥ २९ ॥ लिंगांगस्थलभेदज्ञः पट्स्थल-ज्ञानतत्परः ॥ शिवसिद्धांततत्त्वज्ञः षडध्वज्ञानवत्सलः ॥ २६ ॥ नित्यकर्मादिकुशलो नमित्तिकविचक्षणः ॥ काम्यादिकर्मचतुरो दीक्षाकर्मादिकर्मठः ॥ २७ ॥ मंडले मंडपे कुंडे प्रासादे प्रतिमासु च॥ लिंगपीठे शिलायां च परीक्षानिपुणाग्रणीः ॥ २८ ॥ शिवस्य च गुरोर्भक्तः शिवैकाहितमानसः ॥ शिवार्चनासक्तचित्तः शिवध्यानैकतत्परः ॥ २९ ॥ गुकारं च गुणातीतं रुकारं रूपवर्जितं ॥ गुणातीतमरूपं च यो दद्यात्स गुरुः स्मृतः ॥ ३० ॥ निराकारं निरालंबं निर्मलं निर्विकल्पकं ॥ निर्गुणं निष्कलं नित्यं परात्परपदं गुरुं ॥ ३१ ॥ ( वीरागमे ) ललाटलोचनं चांद्रीं कलामपि च दोर्द्वयं ॥ अंतर्निधाय वर्तेऽहं गुरुरूपो महेश्वरि ॥ ३२ ॥ वसते पादयुग्मे तु त्रैलोक्यं सचराचरम् ॥ अंगुष्ठाग्रे चाष्टषष्ठितीर्थान्यस्मिन्वसंति वै ॥ ३३ ॥ सप्ताब्धयस्तु पादाधस्तदूर्ध्वं चाष्ट ते नगाः ॥ जंघयोर्वसते नित्यं षट्त्रिंशत्तत्वसंचयः ॥३४॥

---

असलें तरी शिवतत्वांत निश्चय ठेवणारा असला पाहिजे; संप्रदाय ( परंपरेनें चालत आलेलें ) पूर्वक ज्ञान संपादन केलेला असून लोभ दंभ सोडलेला असावा. ( २६ ) लिंगांगस्थलांचे भेद जाणणारा असून पट्स्थलांच्या ( भक्त, महेश, प्रसादि, प्राणलिंगी, शरण, ऐक्य, अशीं सहा स्थलें ) ज्ञानांत तत्पर असावा, शिवसिद्धांतांचीं तत्वें जाणणारा असून षडध्वांचें ( भुवनाध्व, पदाध्व, वर्णाध्व कलाध्व, तत्वाध्व मंत्राध्व ) ज्ञान संपादन करून देण्यांत वत्सल ( प्रेम दाखविणारा ) असावा; ( २७ ) नित्यकर्म करण्यांत कुशल असून नैमित्तिक ( पर्वकाल वगैरे अशा निमित्तानें करावयाचीं कर्में ) कर्मांत पंडित असावा; काम्य कर्म ( फलाची अपेक्षा धरून करावयाचीं कर्में ) करण्यांत चतुर असावा; दीक्षा कर्मांत पूर्ण पंडित असून ( २८ ) मंडल, मंटपः प्रासाद, प्रतिमा, लिंगपीठ, शिला इत्यादिकांच्या परीक्षेंत अग्रेसर ( श्रेष्ठ ) असावा; ( २९ ) शिवाचा व गुरूचा भक्त असून शिवाविषयीं आसक्तमनाचा असावा; शिवपूजा करण्यांत तत्पर असून शिवध्यानांत निमग्न असावा. ( ३० ) गुकार ह्मणजे गुणातीत ( सत्व, रज, तम यांच्या पलीकडचें ) रुकार ह्मणजे रूपवर्जित ( निराकार ] अशा परब्रह्म स्वरूपाचें तत्व देणारा असा गुरु असावा. इतक्या लक्षणांनीं जो युक्त आहे त्यालाच गुरु असें ह्मणतात. ( ३१ ) हे देवि, निराकार, दुसऱ्याच्या आश्रयाची अपेक्षा न करणारा, निर्मल, विकल्परहित, सत्व, रज, तम यांपासून दूर असलेला, दुष्ट मायेच्या कलेला सोडलेला, नित्य व परात्पर पद पावलेला, असा गुरु पहावा. ( ३२ ) ( असें वीरागमांत सांगितलें आहे ) हे महेश्वरि, कपाळावरचा डोळा, चंद्राची कला आणि दोन हात इतके सर्व आंत लपवून घेऊन, गुरूचें रूप घेऊन मीच फिरत असतों. ( ३३ ) या गुरूच्या दोनी पायांत स्थावर जंगममय जग राहतें. याच्या आंगठ्याच्या अग्रभागांत अडुसष्ट ६८ तीर्थें राहतात. ( ३४ ) याच्या पायांखालीं सात समुद्र असून वरच्या भागावर सात कुलपर्वत आहेत. याच्या पोटऱ्यांमध्यें छत्तीस तत्वें नित्य आहेत.

स्मर्तव्यः पठनीयश्च गुरुः परमकारणः ॥ गुरुदेवं महादेवं चैकभावेन भाविताः ॥३५॥ त्रिषु लोकेषु पूज्यंते ते नरा गुरुभक्तितः ॥ गुरुर्गृहस्थ एव स्यान्न कदाचिद्यतिर्गुरुः ॥ ३६ ॥ यथाहं सर्वलोकानां गुरुरंबिकया सह ॥ ३७ ॥ ( क्रियासारे ) ईश्वर उवाच ॥ गृहस्थः सर्ववर्णेषु श्रेष्ठो गुरुरुदाहृतः ॥ नैष्ठिकस्त्वधमो ज्ञेयो भांतिकस्तु ततोऽधमः ॥ ३८ ॥ वानप्रस्थयतीनां तु गुरुत्वं निष्फलं सदा ।। शिष्यस्य शिक्षणीयत्वाद्गुरुगौरवभावतः ॥ ३९ ॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन गुरुगौरवमाचरेत् ॥ वयः षोडशकादूर्ध्वमिष्यते सप्ततेरधः ॥ ४० ॥ शिवज्ञानामृतस्वादपरिसंतुष्टमानसः ॥ तत्त्वविच्छिवसंयुक्तो मुक्तिदो न तु चापरः ॥ ४१ ॥ गुरवो बहवः संति शिष्यवित्तापहारकाः ॥ दुर्लभोऽयं गुरुर्देवि शिष्यहृत्तापहारकः ॥ ४२ ॥ ( सिद्धांतशिखामणौ ) ज्ञानहीनं गुरुं प्राप्य कुतो मुक्तिमवाप्नुयात् ॥ भिन्ननौकागतः[१] सिंधोर्यथा पारं न गच्छति ॥ ४३ ॥ तस्माज्ज्ञानाधिकं शिष्यो गुरुमेव समाश्रयेत् ॥ इत्थं

---

( ३५ ) याकरितां गुरु आणि ईश्वर एक आहेत अशी भावना ठेवून परमकारण अशा गुरूचें स्मरण पठण करीत असावें. ( ३६ ) अशा गुरूवर भक्ति करणारा मनुष्य त्रैलोक्यांत पूज्य मानला जातो. असें जे गुरूचें वर्णन केलें तो गुरु गृहस्था ( बायको असलेला ) श्रमांत राहणारा असावा. केव्हांही संन्यासी गुरु होत नाहीं. ( ३७ ) जसा मी अंबिकेसहित असून सर्व लोकांचा गुरु ह्मणवितों, तसा तोही गुरु पत्नीसहित असावा. ( ३८ ) ( क्रियासारांतले श्लोक ) ईश्वर ह्मणतात—सर्व वर्णांत गृहस्थ गुरु श्रेष्ठ मानला गेला आहे. नैष्ठिक ब्रह्मचारी गुरु अधम जाणावा; व भांतिक ब्रह्मचारी गुरु त्याच्याहून अधम जाणावा. ( ३९ ) वानप्रस्थ, ( अरण्यांत राहणारे ) आणि यती हे गुरु निष्फल मानले आहेत शिष्याला चांगल्या तऱ्हेचें शिक्षण देत असल्यामुळें व गौरवभाव असल्या कारणानें गुरु ह्मणतात. ( ४० ) याकरितां गुरूनें सर्वदा गौरवानेंच वागलें पाहिजे. गुरूचें वय सोळापासून सत्तरपर्यंतअसावें. ( ४१ ) जो शिवाच्या ज्ञानामृताचे घोट घेऊन संतुष्ट आहे, आणि तत्व जाणणारा असून शिवमय आहे, तोच मुक्ति देणारा गुरु आहे. दुसरा होऊं शकत नाहीं. ( ४२ ) हे देवि, शिष्याचें द्रव्य हरण करणारे गुरु पुष्कळ सांपडतात, परंतु शिष्यांच्या हृदयांतला ताप हरण करणारा गुरु फारच दुर्लभ आहे. ( ४३ ) ( सिद्धांतशिखामणींतले श्लोक ) फुटक्या नावेंत वसून समुद्र तरणाऱ्याची जी अवस्था होते, तीच दशा ज्ञानहीन गुरु करणाऱ्याची होते. तो जसा समुद्र तरून जात नाहीं, तद्वत् हाही मुक्तीला जात नाहीं, ( ४४ ) ह्मणून ज्ञानानें श्रेष्ठ जो गुरु आहे, त्याचाच आश्रय शिष्यानें करावा. याप्रमाणें सद्गुरूचें लक्षण सांगितले आतां वाईट गुरूचीं लक्षणें सांगतों

---

१ भिन्ननावं गतः

गुरुः समाख्यातो वर्जनीयोऽधुनोच्यते ॥ ४५ ॥ व्यसनी वामनः कुब्जः कोपी च कुलटः शठः ॥ चपलोऽधिकहीनांगः पापीयान्सूचकोऽन्यजः ॥ ४६ ॥ व्याधिगस्तार्किकः शूरः काकनादो बकव्रती ॥ गुरुदेवद्विजातीनां निंदको वृषलीपतिः ॥ ४६ ॥ अपूज्यकुलसंभूतस्त्रीकर्मी शिववर्जितः[1] ॥ लंबोष्ठो वक्रनासश्च गवीनः कलहप्रियः ॥ ४७ ॥ परापवादशीलश्च परग्रंथोपजीवकः ॥ बाला बहुगुणैर्युक्ता वृद्धाः खंजास्तथैव च ॥ ४८ ॥ एवमादिगुणैर्युक्ता वर्जनीयाः प्रयत्नतः ॥ पूर्वं गुरुं परित्यज्य योऽन्यं गुरुमुपाश्रयेत् ॥ ४९ ॥ स पुनर्भूरिति ज्ञेयः सर्वकर्मसु गर्हितः ॥ द्विजातिर्वा ततः शूद्रः स्वस्वोक्ताचारवान् शुचिः ॥ ५० ॥ सत्यवाग्गुरुभक्तश्च दंभाहंकारवर्जितः ॥ रागद्वेषविनिर्मुक्तः शांतः सर्वजनप्रियः ॥ ५१ ॥ अहिंसको दयावांश्च नित्यमुद्युक्तचेतनः[2] ॥ गुरुशुश्रूषणरतो मनोवाक्कायकर्मभिः ॥ ५२ ॥ बहिरंतश्चरैः प्राणैर्गुरुभक्तियुतो नरः ॥ गुरुरेवंविधं शिष्यं वर्षमेकं परीक्षयेत् ॥ ५३ ॥ गुर्वाज्ञा-

---

तीं लक्षणें पाहून तसल्या गुरूचा त्याग करावा. ( ४५ ) व्यसनी, गिड्डा, कुबडा, रागीट, जार, मदांध, चंचल, अंगहीन, पापी, दुर्जन, जारकर्मानें उत्पन्न झालेला, ( ४६ ) रोगी, कुतर्क करणारा, शूर, कावळ्याप्रमाणें आवाज असलेला, बकध्यानी, गुरु, देव, ब्राह्मण यांची निंदा करणारा, शूद्रस्त्रीशीं लग्न केलेला, ( ४७ ) वाईट कुलांत जन्मलेला, बायकांप्रमाणें कर्म करणारा, शिवाला न भजणारा, लांब ओठाचा, वांकड्या नाकाचा, गाय राखणारा, ( गुराखी ), तंटेखोर ( ४८ ) चहाडखोर, परक्याच्या द्रव्यावर उपजीविका करणारा, बाल ( अज्ञानी ), बहुगुणी असून ज्ञातारा असलेला, पांगळा, ( ४९ ) अशा प्रकारचा गुरु करूं नये. अशा दुर्गुणांनीं युक्त जे आहेत त्याना प्रयत्नपूर्वक सोडावें. पूर्वी एक गुरु करून त्या गुरूला सोडून पुनः दुसरा गुरु जो करतो, ( ५० ) तो पुनर्भू जाणावा ( रांडेचा मुलगा जाणावा ); शिवाय तो सर्व कर्मांत निंद्य जाणावा. ब्राह्मण असो, शूद्र असो. आपापल्या धर्माप्रमाणें वागणारा असून शुद्ध असावा. ( गुरूनें शिष्याची पुढील वर्णनाप्रमाणें परीक्षा करावी ) ( ५१ ) सत्य बोलणारा, गुरूवर भक्ती ठेवणारा, दंभ अहंकार, सोडलेला, राग द्वेषाचा त्याग केलेला, शांत, लोकप्रिय, ( ५२ ) हिंसा न करणारा, दयाशील, निरंतर उद्योग करणारा, काया, वाचा, मनेंकरून गुरुसेवेंत रत ( आसक्त ) आसणारा, ( ५३ ) बाहेरच्या प्राणानें ( द्रव्यानें ) व आंतल्या पंच प्राणापासून गुरूची भक्ति करणारा, असा शिष्य असून याची परीक्षा गुरूनें एक वर्षपर्यंत करावी. ( ५४ ) गुरूच्या आज्ञेला भिणारा असून सौम्य असेल, तर

---



१ सेव्यवर्जितः ॥ २ नित्यविंध्युक्तचेतनः ॥

चकितः सौम्यः शिष्य इत्यभिधीयते ॥ ज्ञानेन क्रियया चाथ गुरुः शिष्यं विशोधयेत् ॥ ९४ ॥ योऽन्यथा कुरुते मोहात्स विनश्यति दुर्मतिः ॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन गुरुः शिष्यं परीक्षयेत् ॥ ९६ ॥ भक्तिश्च शिवभक्तेषु श्रद्धा तच्छासनाविधौ ॥ देहपातस्तथा कंपः परमानंदहर्षणे ॥ स्वेदो रोमांच इत्येतच्छक्तिपातस्य लक्षणं ॥ ९६ ॥ (इति शक्तिपातलक्षणम्) उक्तलक्षणसंपन्नो यस्मिन् देशे गुरुः स्थितः ॥ तत्र शिष्यः स्वयं गत्वा प्रणमेद्दंडवद्गुरुं ॥ ९७ ॥ स्वगुरुं वा महेशं वा प्रणमेदेकपाणिना ॥ यदि पूर्वार्जितं पुण्यं तत्सर्वं च विनश्यति ॥ ९८ ॥ अष्टांगैरथ पंचांगैस्त्रिभिरंगैर्नमस्त्रिधा ॥ उरसा शिरसा दृष्ट्या मनसा श्रद्धया गिरा ॥ ९९ ॥ पद्भ्यां कराभ्यां जानुभ्यां प्रणामोऽष्टांग उच्यते ॥ शिरः कराभ्यां जानुभ्यां पंचांगैः प्रणमेच्छिवं ॥ ६० ॥ ब्रह्मा विष्णुश्च रुद्रश्च ईश्वरश्च सदाशिवः ॥ एते गर्भगता यस्य तस्मै श्रीगुरवे नमः ॥ ६१ ॥ अज्ञानतिमिरांधस्य ज्ञानांजनशलाकया ॥ चक्षुरुन्मीलितं येन तस्मै श्रीगुरवे नमः ॥ ६२ ॥ अनंतजन्मसंप्राप्तकर्मेंधनविदाहिने ॥ ज्ञानानलप्रभावेन तस्मै श्रीगुरवे नमः ॥ ६३ ॥ भवारण्यप्रविष्टस्य दिङ्मोहभ्रांतचेतसः ॥ येन मे द-

---

त्याला शिष्य असें नांव येतें. ज्ञानानें व कृतीनें शिष्याची परीक्षा गुरूनें करावी. ( ५५ ) मोहांत पडून परीक्षा न करितां शिष्य करून घेतला असतां तो गुरु लवकरच नष्ट होतो. अतएव गुरूनें सर्व प्रयत्नानें शिष्याची परीक्षा पहावी. ( ५६ ) ( शक्तिपाताचीं लक्षणें सांगतात. ) शिवभक्ताविषयीं भक्ति, शिवभक्ताची आज्ञा पाळण्याविषयीं श्रद्धा, परम आनंद व हर्ष झाला असतां शरीर गळणें, कंप सुटणें, घाम येणें, रोमांच उभे राहणें, इत्यादि शक्तिपाताचीं लक्षणें होत. ( ५७ ] पूर्वी सांगितलेल्या लक्षणांनीं युक्त गुरु जेथें असेल, तेथें स्वतः शिष्यानें जाऊन दंडवत नमस्कार करावा. ( ५८ ) आपला गुरु, आणि, शंकर यांना जो प्राणी एका हातानें नमस्कार करतो, त्या प्राण्याचें पूर्वार्जित पुण्य असेल तें सर्व लयाला जातें. ( ५९ ) नमस्काराचे प्रकार, आठ अंगांनीं, तीन अंगांनीं असे तीन आहेत. ऊर, डोकें, ( ६० ) पाय, हात गुडघे, अशा आठ अवयवांनीं, दृष्टी लावून, मनापासून व विश्वासपूर्वक वाणीनें, केलेल्या नमस्काराला अष्टांग नमस्कार अस म्हणतात. डोकें हात, गुडघे, या पांच अवयवांनीं शिवाला नमस्कार करावा, (६१) ज्या गुरूच्या पोटांत ब्रह्मा, विष्णु; रुद्र, ईश्वर, सदाशिव हे राहतात, त्या सद्गुरूला नमस्कार असो. ( ६२ ) ज्या गुरूनें अज्ञानरूपी अंधारानें आंधळा झालेल्या प्राण्याचे डोळे ज्ञानरूपी अंजनयुक्त सळईनें स्वच्छ केले, त्या श्रीगुरूला नमस्कार असो. ( ६३ ) ज्या गुरूनें अनेक जन्मांपासून संचित केलेल्या कर्मरूपी लांकडाचें, ज्ञानरूप अग्नीच्या प्रभावानें दहन केलें, त्या श्रीगुरूला नमस्कार असो. ( ६४ ) संसाररूपी रानांत भटकत जाऊन दिशांची भूल पडून भ्रांत मन झालेल्या मला ज्या गुरूनें उत्तम रस्ता दाखवून

ज्ञितः पंथास्तस्मै श्रीगुरवे नमः ॥ ६४ ॥ देशिकस्य मुखं दृष्ट्वा प्रणमेद्दंडवद्भुवि ॥ पतंति सर्वपापानि नोत्तिष्ठंति पुनः सह ॥ ६५ ॥ गुरुं दिदृक्षुर्यः शिष्यः सद्भक्त्याऽनुदिनं स तु ॥ रिक्तपाणिर्न तं पश्येद्यथा राजा तथा गुरुः ॥ ६६ ॥ स्वामिन् भट्टारकाचार्य मय्येवं त्वं कृपां कुरु ॥ इत्युक्तं प्रवदेच्छिष्यमुपदेशं करोम्यहम् ॥ ६७ ॥ अनुग्रहकरणार्थे जपे विनियोगः निष्कलो देवता सुज्ञान ऋषिः ॥ अनुष्टुप् छंदः नादरूपे प्रणवं बीजम् ॥ मूलमंत्रेण पंचतत्वानां सादाख्यानां समारभेत् ॥

## दशमाध्याये

गुरुशुश्रूषणं वक्ष्ये तद्यथा श्रृणु यत्नतः ॥ ततः कुर्वीत शुश्रूषां सद्भक्त्याऽहरहर्गुरोः ॥ १ ॥ शुश्रूषायाः क्रमं चाथ श्रृणुष्व चतुरानन ॥ मनस्यविरतं सम्यग्गुरोराकारचिंतनम् ॥ २ ॥ शुश्रूषोपायता काचित् हृच्छुश्रूषेत्युदाहृता ॥ देव किं कर्म कर्तव्यं तदेवेत्युत्तरं पुनः ॥ ३ ॥ एवमादिप्रियोक्तिश्च सा वाक्शुश्रूषिका स्मृता ॥ समीपे वापि दूरे वा स्वशरीरनिवेदनम् ॥ ४ ॥ गमनागमनायासैः स्व-

---

मनाची भ्रांति दूर केली त्या गुरूला नमस्कार असो. ( ६५ ) गुरूचें तोंड पाहिल्यावरोबर दंडवत् जमीनींवर नमस्कार केला तर त्याचीं सर्व पापें खालीं पडून जातात, पुनः त्याच्या बरोबर उठत नाहींत. ( ६६ ) गुरूचें दर्शन घेण्याच्या बुद्धीनें प्रतिदिवशीं भक्तिपूर्वक जातेवेळेस रिकाम्या हातानें जाऊं नये. कारण जसा राजा तसा गुरु आहे असें शास्त्रांत सांगितलें आहे. शिवाय राजाच्या आणि गुरूच्या भेटीला कांहीं बरोबर न घेतां जाऊं नये' असेंही सांगितलें आहे. ( ६७ ) हे प्रभो, ऋषिवर्या, या संसारामध्यें माझें रक्षण करा; कृपा करा, याप्रमाणें बोलणाऱ्या शिष्याला बोध करावा व उपदेश करतां, असा संकल्प करून पुढें सांगितल्याप्रमाणें अनुग्रह करण्याकरितां जप करावा. निष्कलो देवता सुज्ञान ऋषिः अनुष्टुप् छंदः नादरूपे प्रणवं बीजं असें तोंडानें ह्मणून मूल मंत्रानें सादाख्य पांच तत्वांचें उपक्रमण करावें.

## दहाव्या अध्यायांतील गुरुसेवेचें लक्षण.

( १ ) आतां गुरुसेवेचें लक्षण सांगतों एकाग्रमनानें ऐक. अहोरात्र आणि प्रतिदिवशीं उत्तम भक्तीनें गुरूची सेवा करावी- ( २ ) हे ब्रह्मदेवा, सेवेचा क्रम तुला सांगतों ऐक. निरंतर मनांत गुरूच्या मूर्तीचें चिंतन करावें. ( ३ ) गुरूचें ध्यान कसें करावें? गुरूची सेवा कशी करावी? इत्यादि कल्पना मनांत ज्या चालतात, त्या मानसिक कृतीला मानसिक सेवा ह्मणतात- महाराज काय करूं? असा प्रश्न केला असतां अमुक कर, असें उत्तर मिळालें ह्मणजे त्यांच्या आज्ञेला अनुसरून करणें ( ४ ) इत्यादि; प्रियवाणीनें जी सेवा घडते, ती वाचिक सेवा होय. जवळ असो, दूर असो, आपलें सर्वस्व शरीर गुरूला अर्पण करणें त्यास कायिक सेवा ह्मणतात. कायिक सेवेचा विस्तार सर्व ऐक. ( ५ ) गुरू असेल तेथें जाण्यायेण्याचे श्रम घेणें, त्यांच्या स्वभावाला अनुसरून काम करून

भावानंदैस्तथा ॥ प्रदक्षिणनमस्कारान्सम्यक् पादावनेजनम् ॥ ५ ॥ पयसाऽऽज्येन दध्ना वा लब्धेनांघ्रिप्रपूजनम् ॥ ततः सूक्ष्मैर्मुद्गचूर्णैरुष्णेन सलिलेन च ॥ ६ ॥ प्रक्षाल्य शुद्धवस्त्रेण तदूर्ध्वोदकमार्जनम् ॥ ७ ॥ शय्यासंस्तरणं कृत्वा केशान्संमार्जयेन्नखैः ॥ तैलाभ्यंगक्रियाश्चाथ स्नानकर्म यथा शुभम् ॥ ८ ॥ श्रीखंडलेपनं पुष्पमालिकाचारुबंधनम् ॥ शौचार्थं मृज्जलादीनि दंतकाष्ठप्रदापनम् ॥ ९ ॥ पूजास्थानानुलेपं च गोमयेन सवारिणा ॥ पूजायै जलपुष्पाणि तत्र योग्यानि विन्यसेत् ॥ १० ॥ एवमादीनि चान्यानि गृहकर्माणि यानि वै ॥ एतैः कृता च सा सेवा कायिकेत्यभिधीयते ॥११॥ धान्यस्वर्णपशुक्षेत्रदासीदासांबराणि च ॥ पर्यंकभूषणान्यत्र त्रिपादचषकानि च ॥ १२ ॥ चंदनान्यनुलेपोक्तद्रव्याणि सुरभीणि च ॥ केशानुलेपद्रव्याणि कस्तूर्यादीनि यानि च ॥ १३ ॥ तुरंगमगजांदोलस्यंदनानि शुभानि च ॥ तेषां प्रदानं सद्भक्त्या धनशुश्रूषिका स्मृता ॥ १४ ॥ द्रव्यसामर्थ्यसंपन्नो यः कश्चिच्छिष्यकस्सदा ॥ सर्वशुश्रूषिकां कुर्यात्स गुरोरेव भक्तितः ॥१५॥ न्यायार्जितं स्थितं स्वर्णमुख्यं यद्व्यावहारतः ॥ तदेव द्रव्यं गुरवे दद्याद्दाने हि तद्वरं ॥ १६ ॥ अन्यायेन

---

त्यांस आनंद देणें, त्यांस प्रदक्षिणा व नमस्कार करणें, चांगल्या रीतीनें त्यांचें पादप्रक्षालन करणें, ( ६ ) दूध, दहीं, तूप यांतून मिळेल त्यानें त्यांची पादपूजा करणें, नंतर बारीक मुगाचें पीठ लावून ऊन पाण्यानें त्याचें पाय धुवून काढणें. ( ७ ) नंतर स्वच्छ कपड्यानें पुसून तें पाणी आपल्या अंगाला लावून घेणें, ( ८ ) मग आंथरूण पसरून नखांनीं केंसाच्या गुंता सोडविणें, मग तेल लावून क्रमानें त्यांस न्हाऊं घालणें- ( ९ ) अंगाला चंदन लाऊन त्यांच्या गळ्यांत फुलांची माळ घालणें, तांब्या घेऊन जाण्याकरितां माती व पाणी ठेवणें, दांत घासण्याकरितां दांतकाडी ठेवणें, ( १० ) पूजेच्या जागेंत पाणी शेण घालून सारवून गुरूला पूजेकरितां भक्तीनें पाणी, फुलें आणून देणें, ( ११ ) यावांचून दुसरीं घरांतलीं कामें करणें इत्यादि सेवेला कायिकसेवा असें ह्मणतात. ( १२ ) धान्य, सोनें, गाई वगैरे, जमीन, दास, दासी, वस्त्र, पलंग, दागिने, आडणा ( जेवावयाला ताटाखालीं ठेवण्याचें पीठ ) पंचपात्र अंगाला लावण्याचें चंदन वगैरे सुगंध द्रव्य, आणि केसानां लावण्याचीं तैलें वगैरे आणि ( १३ ) कस्तूरी, इतर सुगंधि पदार्थ, (१४) घोडे, हत्ती, पालखी, रथ, इत्यादि पदार्थांनीं केलेली सेवा तिला द्रव्यसेवा ह्मणतात. ( १५ ) श्रीमान शिष्य असला तर त्यानें द्रव्यानें गुरूची सेवा करावी. त्याच शिष्यानें केव्हांही सर्वदा सर्व रीतींनीं भक्तिपूर्वक गुरूची सेवा करावी. ( १६ ) न्यायानें मिळविलेलें, मिळालेलें सोनें वगैरे द्रव्य गुरूला दान देण्यास तेंच द्रव्य योग्य आहे असें ह्मणतात. (१७) कोणत्या तरी मनुष्यानें अन्यायानें द्रव्य मिळविलेलें असेल तर तें रत्न किंवा सोनें असलें

यदानीतं पुरुषेण तु केन चित् ॥ न दद्याद्गुरवे तत्तु रत्नं स्वर्णमपि क्वचित् ॥१७॥ नूतनं सदृढं स्निग्धं धवलं नेत्रवल्लभम् ॥ दद्यादाच्छादनं भक्त्या गुरवे सर्वदा बुधः ॥ १८ ॥ * विशीर्णं स्फुटितं दग्धं प्राक्तनं स्वधृतं पुरा ॥ * दष्टं कीटादिभिर्वस्त्रं न दद्याद्गुरवे बुधः ॥१९॥ परुषं दुष्क्रियायुक्तं नीलसूत्रविनिर्मितम् ॥ पट्टवस्त्रेतरं वस्त्रं सुजीर्णं न प्रदापयेत् ॥ २० ॥ पट्टदेवांगचीनानि वासांस्यन्यानि यानि च ॥ चित्राणि दद्यान्नृपतिरितरो वा धनाधिपः ॥२१॥ गुरोः प्रियाणि द्रव्याणि यानि कानि चिदन्वहं ॥ तानि भक्त्या प्रदेयानि शिष्येण सुलभानि वै ॥ २२ ॥ दरिद्रश्च स्वयं शिष्यः प्रतिसंवत्सरं यजेत् ॥ वासः प्रावरणार्थाय दद्यात्तन्नेत्रवल्लभम् ॥ २३ ॥ गुरुं स्वगृहमायांतं दृष्ट्वा भक्तियुतो नृपः ॥ तस्मै दत्वाऽऽसनं नत्वा चाग्रे तिष्ठेदनुज्ञया ॥ २४ ॥ आचार्यचरणद्वंद्वप्रक्षालितजलं सदा ॥ यः पिबेद्धारयेद्भक्त्या सर्वपापैः प्रमुच्यते ॥ २५ ॥ चंदनं साक्षतं पुष्पं स्वर्णं तांबूलमंबरम् ॥ पात्रे विधाय गुरवे शिष्यो दद्यात्स्वपाणिना ॥ २६ ॥ संभोजयित्वा स्वगुरुं पश्चाद्भुंजीत बुद्धिमान् ॥ गुरोः पुरस्ताद्यो भुंक्ते गुरुद्रोही न संशयः ॥ २७ ॥ यानि भक्त्या च नूत्नानि कंद-

---

तरी गुरूला देऊं नये. ( १८ ) ज्ञात्यानें केव्हांही गुरूला नवीन, मजबूत, दाट, पांढरें, पाहण्यास लायक असें वस्त्र पांघरण्याकरितां भक्तीनें द्यावें. ( १९ ) पातळ, फाटलेलें, जळालेलें, जुनें, आपण उपभोग घेतलेलें, ऊंदीर किडे इत्यादिकांनीं फाटलेलें वस्त्र ज्ञात्यानें गुरूला देऊं नये. ( २० ) राठ असलेलें, वाईट विणलेलें, काळ्या सुताचें असलें वस्त्र, देऊं नये. उत्तम वस्त्रावांचून दुसरें जुनाट वगैरे देऊं नये. ( २१ ) राजानें चित्रविचित्र शालजोड्या, दुपेटे, शेले वगैरे द्यावे. श्रीमानानें सुद्धां हीं असलीं उत्तम वस्त्रें द्यावीं. ( २२ ) गुरूला जी जी प्रिय वाटेल ती ती कोणतीही वस्तु आपल्या योग्यतेंतील असेल तर शिष्यानें भक्तिपूर्वक दररोज गुरूस द्यावी. ( २३ ) शिष्य दरिद्री असेल तर प्रतिवर्षी एकदां तरी त्यानें गुरूची पूजा करावी. त्यास पांघरण्याकरितां डोळ्यांस आनंद देणारें चांगलें वस्त्र द्यावें. ( २४ ) राजानें आपल्या घरीं येणाऱ्या गुरूला पाहून भक्तीनें आसन देऊन नमस्कार करून त्याच्या आज्ञेनें पुढें उभें राहावें. ( २५ ) बुद्धिमानानें गुरूचे दोन्ही पाय धुऊन भक्तीनें तें पाणी पोटांत घ्यावें, ( प्यावें ) आणि अंगाला लेपन करावें. तर तो सर्व पापांपासून मुक्त होतो, ( २६ ) चंदन, अक्षता, फूल, सोनें, तांबूल, वस्त्र हे सर्व पदार्थ एका ताटांत घालून शिष्यानें आपल्या हातानें गुरूला द्यावें. ( २७ ) गुरूला प्रथमतः जेवावयाला घालून नंतर आपण जेवावें. गुरूच्या समोर जो जेवतो तो गुरुद्रोही होय ह्यांत संशय नको. ( २८ ) तीं ताजीं ताजीं कंद, मूळ, फळें असतील, आणखी दुसरे तळलेले जे अनारसे वगैरे असतील ते गुरूला प्रथम दिल्यावांचून आपण खाऊं

मूलफलानि च ॥ अपूपान्यपि चान्यानि गुरोः पूर्वं न भक्षयेत् ॥ २८ ॥ शिष्येण भोजनात्पूर्वं न भोक्तव्यं कदाचन ॥ भोजनानंतरेऽश्नीयात्स्वगुरोर्यः स पुण्यभाक् ॥ २९ ॥ यो भक्त्या गुरुणा भुक्तं पात्रस्थं न च मुंचति ॥ स भोक्ता सर्वदुरितैर्मुच्यते नात्र संशयः ॥ ३० ॥ तांबूलमुत्तमं तस्मै ततः पात्रेण दापयेत् ॥ पश्चादिष्टानि वस्तूनि दत्वा नत्वा क्षमापयेत् ॥ ३१ ॥ प्रदत्तं च स्वगुरुणा तांबूलं परिचर्वितम् ॥ शिष्यस्तद्भक्षयेद्भक्त्या शुद्धांतःकरणो भवेत् ॥ ३२ ॥ शुभकार्येषु सर्वेषु विवाहादिषु भक्तितः ॥ गुरुमभ्यर्चयेच्छिष्यो वस्त्रहेमादिभिस्तदा ॥ ३३ ॥ तत्रापि च सभापूजाविधेः पूर्वं गुरुं यजेत् ॥ ततः सभां यजेद्योग्यः क्रमेणैव यथाशुभम् ॥ ३४ ॥ सभांतरे गुरुं धीमान् कदाचिदपि नार्चयेत् ॥ आसनस्थं विशोध्यांघ्री गंधपुष्पाक्षतैर्यजेत् ॥ ३५ ॥ ततोऽर्पयेत्स्वगुरवे वस्त्रहेमांगुलीयकान् ॥ दरिद्रश्चोदितेष्वेषु यथाशक्ति त्ववंचयन् ॥ ३६ ॥ एवमेवार्चयेच्छिष्यो गुरुं लब्धधनेन वा ॥ गुरुयात्रा देवयात्रा तीर्थयात्रेति च त्रिधा ॥ ३७ ॥ आसां त्रिविधयात्राणां गुरुयात्रा फलाधिका ॥ गुरोः संदर्शनार्थं तु भक्त्या यात्रां करोति यः ॥ ३८ ॥ पुण्यदेही स विज्ञेयः समस्तामरवल्लभः ॥ शिष्यो गुरुस्थितं ग्रामं न विशेद्वाहनेन च ३९ ॥ वर्जयेद्गृहसामीप्ये

---

नयेत. ( २९ ] शिष्यानें कधींहि गुरूच्या पूर्वी जेऊं नये, त्याच्या जेवणानंतर आपण जेवावें, तर तो जगांत पुण्यवान् होतो. ( ३० ) गुरूनें जेऊन ताटांत उरलेलें उच्छिष्ट न टाकतां जो जेवतो, तो जेवणारा सर्व पापांपासून मुक्त होऊन उत्तम पदाला जातो यांत संशय नाहीं. ( ३१) नंतर ताटांत पानसुपारी घालून गुरूच्या पुढें ठेवावें, मग इष्ट वस्तु ( मनास येईल ती वस्तु ) देऊन गुरूची क्षमा मागावी. ( ३२ ) गुरूनें खाल्लेल्या पानाचा चोथा त्यानें दिला व शिष्यानें भक्तिपूर्वक खाल्ला तर त्याचें मन शुद्ध होतें. ( ३३) शिष्यानें आपल्या घरीं लग्न वगैरे शुभ कार्यें होतील तेव्हां भक्तीनें वस्त्र, सोनें वगैरे पदार्थांनीं गुरूची पूजा करावी. ( ३४ ) ह्या विवाहादि कार्यांत सुद्धां विधानपूर्वक गुरूची पूजा करावी. नंतर आलेल्या योग्य लोकांचा आदरसत्कार क्रमानें करावा. ( ३५ ) बुद्धिमानानें सभेमध्यें गुरूची पूजा कधींहि करूं नये. आसनावर बसवून पाय धुऊन नंतर, गंध; फूल, अक्षता वाहून पूजा करावी, ( ३६ ) नंतर गुरूला वस्त्रें मुद्या ( आंगठ्या ) वगैरे द्यावें. दरिद्री असेल तर वर सांगितलेल्या ह्या पदार्थांपैकीं वंचना न करतां शक्त्यनुसार कांहीं तरी द्यावें. ( ३७ ) मिळालेल्या द्रव्यानें याप्रमाणें शिष्यानें गुरूची पूजा करावी. यात्रेमध्यें गुरुयात्रा, देवयात्रा, तीर्थयात्रा असे तीन प्रकार आहेत, ( ३८ ) ह्या तीन यात्रेंत गुरुयात्रा श्रेष्ठ फलाची होय. गुरूच्या दर्शनाकरितां भक्तिपूर्वक जो जातो, ( ३९ ) तो पुण्यवान जाणावा, शिवाय तो सर्व देवांना प्रिय होतो. शिष्यानें गुरूच्या गावांत वाहनावर बसून शिरूं नये. ( ४० ) गुरूला ब्राह्मण्याच्या इच्छेनें गेलेल्या शिष्यानें के-

तथा वै पादुकानि च ॥ गुरोर्दिदृक्षुर्यः शिष्यः सद्भक्त्याऽनुदिनं तदा ॥ ४० ॥ रिक्तपाणिर्न तं पश्येद्यथा राजा तथा गुरुः ॥ फलं प्रसूनं तांबूलमन्यत्किमपि वस्तु च ॥ ४१ ॥ एष्वेकं गुरवे दत्वा नमस्कुर्यात्ततो गुरुम् ॥ श्रीमांश्चापि तपस्वी च शास्त्रज्ञः कुलशीलवान् ॥ ४२ ॥ कुर्यादंडनमस्कारं निर्लज्जो गुरुसंनिधौ ॥ उपचारेषु सर्वेषु द्वावेवात्यंतशोभनौ ॥ ४३ ॥ प्रियवाणी प्रणामश्च तौ विनान्ये वृथा स्मृताः अग्रे दृष्ट्वा नमस्कृत्वा प्रदक्षिणमनुस्मरन् ॥ ४४ ॥ प्रदक्षिणं च कुर्वीत यथाशक्त्यनुसारतः ॥ प्रदक्षिणज्ञो यो धीमान्न तु दीर्घपदं न्यसेत् ॥ ४५ ॥ न गच्छेत्त्वरितो धीमान्न जल्पेदितरैः सह ॥ पदे पदान्तरं न्यस्य करौ चलनवर्जितौ ॥ ४६ ॥ स्तुतिं वाचा हृदा ध्यानमेवं कुर्यात्प्रदक्षिणं ॥ एवं शिष्यः शुचिः कुर्याद्भक्त्या सह परिक्रमम् ॥ स्वगुरोः पुरतः शिष्यो नेतरान्कीर्तयेज्जनान् ॥ ४७ ॥ असह्यभाषणं चैव न वदेदितरेतरम् ॥ नानृतं नाप्रियं वाक्यं न गुह्यं चापि भाषयेत् ॥ ४८ ॥ नाप्रच्छन्नमुखो ब्रूयाद्गुरोरग्रे कदाचन ॥ स्वामिभट्टारकाचार्यदेवश्रीगुरुनामभिः ॥ ४९ ॥ वाच्यः सदा गुरुः शिष्यैर्जातुचिन्नात्मनामभिः ॥ त्वं शब्दं न प्रयुंजीत गुरौ शिष्यः कदाचन ॥ ५० ॥ आज्ञां न लंघयेत्तस्य समं नोपविशेद्यथा ॥ आसनं वाहनं वस्त्रं भूषणं शयनं तथा ॥ ५१ ॥ न कुर्याद्गुरुसादृश्यं गतिसिद्धिहितेच्छुकः ॥ गुरुगेहे समीपे वा

---

व्हांही घराजवळ जोडा काढून मग आंत जावें. (४१) रिकाम्या हातानें न जातां फल, फूल, तांबूल, वगैरें दुसरें कांहीं तरी घेऊन गुरूचें दर्शन घ्यावें. कारण जसा राजा श्रेष्ठ तसा गुरूही श्रेष्ठ आहे. (४२) मागें सांगितलेल्या वस्तूंपैकीं कांहीं तरी घेऊन जाऊन तें गुरूपुढें ठेवून नमस्कार करावा. श्रीमान् तप करणारा, शास्त्र जाणणारा, कुलीन, सुशील असा जो शिष्य असतो, त्यानें (४३) गुरूजवळ लाज न धरितां दंडाकार नमस्कार घालावा, सर्व उपचारांमध्यें दोन उपचारच शोभणारे आहेत. (४४) एक, मंजुळ गोड वाणी, दुसरा नमस्कार, यावांचून बाकीचे सर्व व्यर्थ आहेत. गुरूला पाहिल्यावरोबर मनांत प्रदक्षिणा घालून तात्काल नमस्कार करावा. (४५) यथाशक्ति प्रदक्षिणा ही घालावी. प्रदक्षिणा घालणाऱ्या ज्ञात्यानें लांब लांब पावलें ठेवूं नये. (४६) प्रदक्षिणा करतांना लवकर चालूं नये इतरांबरोबर बोलूं नये. प्रत्येक पाऊल ठेवतांना हात हालवूं नये. (४७) वाणीनें स्तुति करीत, मनानें ध्यान करीत प्रदक्षिणा घालाव्या. याप्रमाणें शिष्यानें शुद्ध असून भक्तीनें प्रदक्षिणा करावी. गुरूपुढें दुसऱ्याची स्तुति करूं नये. (४८) परस्पर असह्य भाषण करूं नये. खोटें अप्रिय, एकांत भाषण करूं नये. (४९) गुरूच्यापुढें तोंड न झांकतां कधींही बोलूं नये, बोलतांना स्वामिन्, भट्टारका, आचार्य, देवा, श्रीगुरो, अशीं संबोधनें देऊन त्या त्या नांवांनीं (५०) बोलावें, शिष्यानें गुरूचें निजनाम घेऊन बोलावूं नये. गुरूविषयीं तूं या शब्दाचा प्रयोग शिष्यानें करूं नये. (५१) त्याची आज्ञा मोडूं नये. त्याचे बरोबर बसूं नये. आसन, वाहन, वस्त्र, दागिने, आंथरूण (५२) इत्यादि

न यथेष्टासनो भवेत् ॥ ६२ ॥ गुरुर्देवो यतः साक्षात्तद्गृहं शिवमंदिरम् ॥ गरु-स्थितस्थलादुच्चैः स्थले वा चोन्नतासने ॥ ६३ ॥ उदग्रवेदिकायां तु शिष्यो नासीत जातु चित् ॥ ६४ ॥ नोल्वणं धारयेद्वेषं नालंकारांश्च जातु चित् ॥ नानाभोगादि-कान्कुर्यान्न विलासपरो भवेत् ॥ ६५ ॥ न चोत्तिष्ठेद्विशेन्नैव न वृथा कार्यमाचरेत् ॥ दीक्षां व्याख्यां प्रमत्तत्वं गुरोरग्रे विवर्जयेत् ॥ ६६ ॥ अतिहासमवष्टंभं लीलामं-घ्रिप्रसारणम् ॥ विनोदोज्ज्वलवेषं च पर्यंकं दंतधावनम् ॥ ६७ ॥ पर्वस्फोटविकार च पादप्रक्षालनं तथा ॥ तद्वाक्यप्रतिकूलं च न कुर्याद्गुरुसंनिधौ ॥ ६८ ॥ पात्रं स्नानजलं छायां माल्योपकरणानि च ॥ भक्तिहीनोऽपि पादाभ्यां न स्पृशेन्नैव लंघयेत् ॥ ६९ ॥ पादुकासनशय्यादि गुरुणा यद्यदीहितं ॥ नमस्कुर्वीत तत्सर्वं पादाभ्यां न स्पृशेत्कचित् ॥ ६० ॥ न गुरोराश्रमे कुर्यादुपानट्परिसर्पणम् ॥ गच्छतः पृष्ठतो गच्छेद्गुरोश्छायां न लंघयेत् ॥ ६१ ॥ नोपविष्टे भवेदूर्ध्वं नोच्चासनगते वि-शेत् ॥ पश्चात्पादेन निर्गच्छेन्नमस्कृत्वाऽग्रतो गुरोः ॥ ६२ ॥ स्वगुरोर्मनसाभीष्टं य-त्तदेवाचरेत्सुधीः ॥ कार्यविज्ञापनार्थं तु गुरूणां दूरवासिनां ॥ ६३ ॥ या त्रिरेखावृता

---

गुरूच्या पदार्थांच्या बरोबरीचे पदार्थ असतील तर त्या पदार्थांचा उपभोग सिद्धीची अपेक्षा करणाऱ्यानें कधींही करूं नये. गुरूच्या घरीं किंवा गुरूजवळ मनास येईल त्याप्रमाणें आसन घालून वसूं नये. ( ५३ ) कारण गुरु हा साक्षात् शिव असून गुरूचें घर शिवालयच होय. गुरूच्या जागेपासून वरच्या जागेंत वसूं नये. उंच आसन, ( ५४ ) उंच ओटा अशावर शि-ष्यानें कधींही वसूं नये. ( ५५ ) गुरूच्या समक्ष क्रूर वेष, अलंकार घालणें, अनेक उपभोग घेणें, व विलास वगैरे करूं नयेत. ( ५६ ) एकदम उठूं नये. एकदम प्रवेश करूं नये. व्यर्थ कार्य करूं नये. गुरूच्या पुढें दीक्षा घेणें व्याखान ( टीका ) मदांधपणा इत्यादि करूं नये. ( ५७ ) अति हसणें, गर्व, खेळणें, पाय पसरणें, विनोदाचे पोषाख करणें, प-लंगावर वसणें, दांत घांसणें, ( ५८ ) बोटें मोडणें, पाय धुवून घेणें, प्रत्युत्तर देणें इतकीं कृत्यें गुरूजवळ करूं नयेत. ( ५९ ) पाण्याचें भांडें स्नानाचें पाणी, माळ, उपकरणाचे पदार्थ, यांचा अभक्तीनें सुद्धां पायानें स्पर्श करूं नये. यांना ओलांडूं नये. ( ६० ) खडाव, आसन, आंथरूण इत्यादि जे गुरूचे पदार्थ असतील त्यांना पाय लावूं नये. शिवाय त्यांना नमस्कार करावा. ( ६१ ) गुरूच्या आश्रमांत जोडा घालून जाऊं नये. जातांना गुरूच्या पाठीमागें जावें. त्यांची सावली ओलांडूं नये. ( ६२ ) गुरु वसला असतां त्यांच्यापेक्षां आपण उंच ठिकाणीं वसूं नये. उच्चासनावर गुरु अ-सतांना त्यापेक्षा उंच जागीं वसूं नये. गुरूच्या पुढें नमस्कार करून त्यांच्या पाठी-मागून पायी चालत जावें. ( ६३ बुद्धिमानानें गुरूच्या मनाला येईल तेंच करावें. गुरु दूर गेला असेल तेव्हां कार्याकरितां विज्ञापना करावयाची असेल तर पुढील क्रमानें विज्ञापना करावी. (६४) तीन रेखा केल्या असून सहा रेखा पंडिताकडून गणिल्या जातात, तसलें ( पत्र

संख्या पडित्यभिहिता बुधैः ॥ ताडपत्रं दृढं सौम्यमृजुं साग्रं द्विधा कृतम् ॥ ६४ ॥ मृदुलं यत्प्रशस्तं तन्मतं लेखाविलेखने ॥ कर्कशं कल्मषं वक्रं हीनाग्रं स्फुटितं युगम् ॥ ६५ ॥ तालपत्रं न तच्छ्रेष्ठं मतं लेखाविलेखने ॥ विसर्गमात्रानुस्वारैर्वर्णस्पष्टं यथा भवेत् ॥ ६६ ॥ तथैव विलिखेत्पत्रे छिंद्याद्वर्णं न जातुचित् ॥ संदिग्धं छिन्नवर्णं चाप्रशस्तं गूढभाषणम् ॥ ६७ ॥ न कदाचिल्लिखेत्पत्रे स्वाचार्याय सदा सुधीः ॥ प्रशस्तभाषासंयुक्तं विनयस्तुतिपूर्वकम् ॥ ६८ ॥ विज्ञापनीयं गुरवे यत्कार्यं तत्समालिखेत् ॥ पत्रं चाल्पमिति ज्ञेयं प्रविलिख्य प्रयोजनम् ॥ ६९ ॥ गुरोर्विज्ञापनार्थाय प्रेषयेदंतिकं गुरोः ॥ गच्छंस्तिष्ठन्स्वपन्जाग्रन् यद्यत्कर्म तमाचरेत् ॥ ७० ॥ समक्षं त्वपरोक्षं वा कर्तव्यं गुर्वनुज्ञया ॥ गुरोर्गुरुस्तस्य गुरुस्तद्गुरोरग्रजा अपि ॥ ७१ ॥ तद्भार्यांश्च नमस्कुर्यात्सदा वै प्रीतिवत्सलैः ॥ तथापि स्वगुरोः पुत्रं पश्येद्गुरुमिवापरम् ॥ ७२ ॥ आत्मा वै पुत्रनामासीदागमोक्तिनिदर्शनात् ॥ ७३ ॥ कदाचिदपि शिष्यो वै न निंदेदीश्वरं गुरुं ॥ शिवस्य च गुरोर्निंदां तथा न श्रृणुयात्सदा ॥ ७४ ॥ स्वमातृपितृभार्यादिभ्रातृबंधुसुतेषु च ॥ ये गुरुद्वेषिणस्तान् हि नत्वा

---

लिहिण्याकरितां कागद दुपदरी घेऊन घड्या तीन केल्या तर सहा होतात हें लोकांत प्रसिद्ध आहे. ) ताडपत्र घ्यावें. तें मजबूत असून सौम्य असावें. आणि सरळ असून सवंध एक असावें. त्याच्या दोन घड्या केलेल्या असून ( ६५ ) तें मऊ असावें. अशा तऱ्हेचें प्रशस्त ताडपत्र लिहिण्यास लायक असें ह्मटलें आहे. कर्कश, मळकट, वाकडें, अग्र नसलेलें, फाटलेलें, दोन भाग झालेलें ( ६६ ) असें ताडपत्र लिहिण्यास योग्य नव्हे, असें मोठ्यांचें मत आहे. विसर्ग, मात्रा, अनुस्वार, स्पष्ट अक्षर यांत चूक न होईल तसें ( ६७ ) पत्र लिहावें. यांत अक्षर विछिन्न ( अर्धें अक्षर ) होऊं देऊं नये. संशययुक्त, छिन्नाक्षर ( अर्धे अक्षर ) अप्रशस्त, गूढ शब्द ( ६८ ) अशा तऱ्हेचें पत्र कधींहि लिहूं नये. बुद्धिमानानें सर्वदां गुरूला प्रशस्त भाषण घालून विनय स्तुति अक्षरें लिहून पत्र पाठवावें. ( ६९ ) प्रथम विज्ञापना करून नंतर कार्याकरितां यावें, असें लिहून पत्र अल्प आहे असें समजून मुख्य अंश त्यांत लिहून ( ७० ) गुरूच्या विज्ञापनेकरितां पत्र गुरूजवळ पाठवावें. चालतां, उठतां निजतां, जागृत असतां जें जें करितो, ( ७१ ) तें तें गुरूसमक्ष असो, दूर असो, त्यांची आज्ञा घेऊन करावें, गुरूच्या गुरूला, त्याच्या गुरूला, पुनः त्याच्या गुरूला, गुरुबंधूंना, ( ७२ ) त्यांच्या बायकांना प्रीतीनें सर्वदा नमस्कार करावा. तसेच गुरुपुत्रांना गुरुप्रमाणेंच मान द्यावा. ( ७३ ) कारण, ( आत्मा वै पुत्रनामासि ) या श्रुतीनें आपणच पुत्राचें रूप घेतो, असा अर्थ होतो, ह्मणून गुरुपुत्राला गुरूप्रमाणेंच समजावें. ( ७४ ) केव्हांही शिष्यानें ईश्वराची व गुरूची निंदा करूं नये. आणि त्यांची निंदा केव्हांही ऐकूं नये. ( ७५ ) आई, बाप, बायको, भाऊ, मुलगा, इ० हे गुरूचें द्वेष करणारे असतील तर त्यानां नमस्कार करून सोडून द्यावें,

शिष्यः परित्यजेत् ॥ ७९ ॥ गुरुं निंदति यः शिष्यो द्रव्यं हरति तस्य च ॥ करोति द्वेषिभिः स्नेहं स चांडालो न संशयः ॥ ७६ ॥ सन्मानं गुरुभापायां गुरोः शिष्यो य इच्छति ॥ स महापातकी ज्ञेयः पतत्येव स दुर्गतौ ॥ ७७ ॥ यः पश्यति गुरुं शिष्यः साधारणमनुष्यवत् ॥ तस्य भक्तिर्वृथा ब्रह्मन्नेवास्त्यत्र न संशयः ॥ ७८ ॥ यः पश्यति गुरुं शिष्य उदासीनमनीषया ॥ स पापात्मा महाघोरे नरके परिवर्तते ॥ ७९ ॥ दूरतो यो गुरुं दृष्ट्वा चोदासीनतया व्रजेत् ॥ श्वानयोनिशतं गत्वा भवेच्चांडालवेश्मनि ॥ ८० ॥ समस्तदेवतावासं सर्वमंत्रास्पदं गुरुम् ॥ उपेक्षते यः पापात्मा रौरवं नरकं व्रजेत् ॥ ८१ ॥ हृदि नायं ममाचार्य इत्युपेक्षां करोति चेत् ॥ मयि भक्तिर्वृथा तस्य तथैव च समर्चनम् ॥ ८२ ॥ योग्यमाद्यं गुरुं त्यक्त्वा शिष्यः क्षुद्रक्रियान्वितम् ॥ गुरुं समाश्रयेदन्यं यः स याति सुदुर्गतिं ॥ ८३ ॥ गुरोरत्यंतभक्तस्य शिष्यस्येह परत्र च ॥ न किंचिद्दुर्लभं ब्रह्मन् समस्तं सुलभं सदा ॥ ८४ ॥ अथ किं बहुनोक्तेन गुरुर्देवो महेश्वरः ॥ प्रत्यक्षे वा परोक्षे वा गुरोः प्रीतिं समाचरेत् ॥ ८९ ॥ गुरुप्रीतिकरः शिष्यो यः स प्रीतिकरो मम ॥ तस्य प्रिय-

---

( ७६ ) जो शिष्य गुरूची निंदा करतो, आणि त्याचें द्रव्य हरण करतो, शिवाय गुरूच्या शत्रूशीं स्नेह करतो तो चांडालच होय. ह्यांत संशय नाहीं. ( ७७ ) गुरूच्या बोलण्यामध्यें जो आपल्या सन्मानाची अपेक्षा करतो, आणि गुरूपासूनही सन्मान राहावा असें इच्छितो तो महापातकी समजावा, व तो नरकांत पडतो. ( ७८ ) जो आपल्या गुरूला साधारण मनुष्याप्रमाणें मानतो, हे ब्रह्मदेवा, त्याची भक्ति व्यर्थच आहे, ह्यांत संशय नाहीं. ( ७९ ) जो गुरूला उदासीन बुद्धीनें पाहतो, तो महापापी घोर नरकांत सदोदित फिरत असतो. ( ८० ) जो गुरूला दुरून पाहून उदासीनतेनें जातो, तो शंभर वेळां कुत्र्याचें जन्म घेऊन शेवटीं चांडाळाच्या घरीं जन्म घेतो. ( ८१ ) सर्व देवता ज्याच्या शरीरांत आहेत, मंत्रमय ज्याचा देह आहे, अशा गुरूची उपेक्षा केली तर तो पापी रौरव नरकाला जातो. ( ८२ ) जो आपल्या मनांत तो माझा गुरु नव्हे अशी उपेक्षा, करतो,. त्याची माझ्यावरची भक्ति, आणि माझी पूजा व्यर्थ होते. (८३) जो योग्य, व पुरातन गुरूला सोडून क्षुद्र कर्म करणाऱ्या गुरूचा आश्रय करतो, तो अधोगतीला जातो. ( ८४ ) हे ब्रह्मदेवा, अत्यंत भक्त शिष्याला गुरूपासून अमुक एक न मिळण्यासारखें आहे असें नाहीं, सारांश गुरु प्रसन्न झाला असतां सर्व सुलभच आहे. ( ८५ ) ,आतां फार काय सांगावें? गुरु साक्षात् शंकरच होय. याकरितां प्रत्यक्ष असो, पाठीमागें असो गुरूंवर सर्वदा प्रीति करावी. ( ८६ ) गुरूवर प्रेम ठेवणारा जो शिष्य असेल तो माझ्या प्रीतीला पात्र होय. गुरूला जो प्रिय झाला असेल तो मला अत्यंत प्रि-

करः शिष्यो मम प्रियकरो भृशं ॥८६॥ तस्मात्सर्वप्रयत्नेन गुरोः प्रीतिकरो भवेत् ॥ गुरुभक्तिं विना तस्य मयि भक्तिर्वृथा भवेत् ॥ ८७ ॥ शिष्यस्तस्मात्प्रयत्नेन गुरौ भक्तिं समाचरेत् ॥ यः कश्चिद्गुरुभक्तः स्यात्स याति परमां गतिम् ॥ ८८ ॥

## पारमेश्वरतंत्रे २ पटले.

मुमुक्षुरीश्वरे भक्तः श्रीगुरुं शिवमाश्रयेत् ॥ सर्वलक्षणसंपन्नं सर्वज्ञं सर्वसंमतम् ॥ ६३ ॥ सदाचाररतं शुद्धं शिवभक्तमलोलुपम् ॥ यथार्थवादिनं शांतं द्वेषासूयादिवर्जितम् ॥ ६४ ॥ विदिताखिलशास्त्रार्थमिंगितज्ञमनाकुलम् ॥ अर्थेऽनातुरमात्मज्ञमकामुकमवंचकम् ॥६५॥ वाग्मिनं शिवतत्त्वार्थबोधकं हृष्टमानसम् ॥ एतादृशगुणोपेतमुपेयाद्गुरुमीश्वरम् ॥ ६६ ॥ रिक्तहस्तेन नोपेयादुपसर्पन् गुरुं शुचिः ॥ नमस्कृत्य विधानेन साष्टांगं भक्तिपूर्वकम् ॥ ६७ ॥ कृतांजलिपुटः स्थित्वा स्तुत्वा विज्ञापयेत्ततः ॥ नमस्ते नाथ भगवन् शिवाय गुरुरूपिणे ॥ ६८ ॥ देहि शिष्याय मे

---

यकर होतो. ( ८७ ) ह्मणून सर्व प्रयत्नानें गुरूवर प्रीति करावी. गुरुभक्तीवांचून माझ्यावरची भक्ति व्यर्थ होय. ( ८८ ) ह्मणून शिष्यानें प्रयत्नपूर्वक गुरूची भक्ति करावी. जो गुरुभक्त असेल तो उत्तम गतीला जातो.

## पारमेश्वरागम २ रें पटल.

( ६३ ) मोक्षपदप्राप्तीची इच्छा करणारा व ईश्वराचे ठिकाणीं भक्ति ठेवणारा असा जो कोणी असेल त्यानें साक्षात् शिवरूपी गुरूचा आश्रय करावा. सर्व लक्षणांनीं संपन्न, ( सुलक्षणी ), सर्वज्ञ ( सर्व जाणणारा ), सर्वांना संमत ( सर्व लोकांच्या पसंतीस उतरलेला ), ( ६४ ) सदाचरणामध्यें निमग्न ( आचरणानें चांगला ), शुद्ध असणारा, द्वेष किंवा मत्सर वगैरे कोणाचाही न करणारा. ( ६५ ) सर्वशास्त्रार्थ समजणारा, इंगित ( मर्म ) जाणणारा, अव्याकुल ( दुःख शोकादि रहित ), अर्थातुर ( द्रव्यलोभी ) नसणारा, आत्मज्ञान प्राप्त झालेला ( स्वताला ओळखणारा ) निष्कामी ( विषयासक्त नसणारा ), कोणालाही न फसविणारा, ( ६६ ) चांगला वक्ता, शिवतत्वार्थांचें ज्ञान करून देणारा व मनामध्यें सदा संतुष्ट, अशा प्रकारच्या गुणांनीं युक्त जो ईश्वररूपी गुरु असेल त्याच्याच सन्निध जावें ( त्याचाच आश्रय करावा ) ( ६७ ) शुचिर्भूत मनुष्यानें, गुरूकडे जावयाचें असल्यास, रिक्त हस्तानें ( गुरूला अर्पण करण्याकरितां कांहीं तरी घेतल्यांशिवाय ) केव्हांही जाऊं नये. भक्तिपूर्वक यथाप्रकार गुरूला साष्टांग नमस्कार करावा. ( ६८ ) हात जोडून उभे राहून स्तुतिपूर्वक गुरुचरणीं विज्ञप्ति करावी कीं, " हे नाथ, भगवन्, आपण गुरुरूपी साक्षात् शिवच आहांत! मी शरण आलों आहे. ( ६९ ) तर सर्व इच्छा परिपूर्ण करणारी अशी वीरशैव दीक्षा या आपल्या शिष्याप्रत द्यावी. " असें शिष्यानें वि-

वीरशैवदीक्षामभीप्सताम् ॥ इति पृष्टोऽथ शिष्येण यदि दातुमना गुरुः ॥ ६९ ॥ विशोध्य वर्षत्रितयमथ तं दीक्षयेद्बुधः ॥ कुशलं श्रीगुरोर्भक्तं श्रीगुरोः प्रियकारिणम् ॥ ७० ॥ कर्मणा मनसा वाचा छायेवानुचरं सदा ॥ गुरुमंत्रात्मदैवेषु तथैवासनमुद्रयोः ॥ ७१ ॥ अभेदभावनाधीरं सत्यवादिनमास्तिकम् ॥ प्राणार्थमानवसुभिर्मनोवाक्कायकर्मभिः ॥ ७२ ॥ सर्वदा सर्वभावेन गुरुशुश्रूषणे रतम् ॥ अप्रमत्तमुदारांगं दृढचित्तमनामयम् ॥ ७३ ॥ असत्यवादरहितमवंचकमदुर्हृदम् ॥ अनर्थलोभमर्थाढ्यं मृदुसंभाषणप्रियम् ॥ ७४ ॥ इत्यादिगुणसंपन्नमथ तं दीक्षयेच्छिवं ॥ हस्तमस्तकसंयोगमाचरेच्च शिवं स्मरेत् ॥ ७६ ॥

## ७ पटले.

नात्मार्थं पाचयेदन्नं नाद्यादातिथ्यनर्पितं ॥ शक्त्या संपूजयेल्लोके जंगमं गृहमागतं ॥ ४१ ॥ नाद्यादलिंगिनश्चान्नं दृष्टं चान्नमलिंगिना ॥ याचयेद्गृहमागत्य दद्यादन्नमलिंगिने ॥ ४२ ॥ नोदासीनं न च द्वेषं न हिंसां नापि वंचनं ॥ कुर्वीत

---

चारिल्यावर गुरूच्या मनांत त्या शिष्याला दीक्षा द्यावयाची असल्यास ( ७० ) प्रथम तीन वर्षेपर्यंत त्या शिष्याची शुद्धि करून ( आचार व मनःशुद्धि वगैरे करून ) नंतर त्या ज्ञानी गुरूनें शिष्याला दीक्षा द्यावी. कुशल; श्रीगुरूच्या ठिकाणीं भक्ति ठेवणारा; गुरूला जें चांगलें असेल तेंच करणारा, ( ७१ ) कायावाचामनेंकरून छाये प्रमाणें गुरूच्या मागोमाग निरंतर सेवेकरितां हजर असणारा; गुरु, मंत्र, आपलें दैवत, व त्याप्रमाणेंच आसन व मुद्रा यांच्या ठिकाणीं, ( ७२ ) धैर्यानें भेदभाव न ठेवणारा; खरें बोलणारा; आस्तीक मताचा; प्राण, धन, मान, संपत्ति व तसेंच कायिक, वाचिक, व मानसिक कृती, यांहीं करून ( ७३ ) निरंतर सर्वभावानें गुरूच्या सेवेंत निमग्न असणारा; अप्रमत्त ( उद्धट नसलेला ); उदार प्रकृतीचा; दृढमनाचा; निरोगी; ( ७४ ) खोटें न बोलणारा; कोणालाही न फसविणारा; चांगल्या अंतःकरणाचा; द्रव्याविषयीं लोभी नसणारा, अर्थाढ्य ; ( धनवान् ) व मृदु संभाषणाविषयीं प्रीति ( ७५ ) इत्यादि गुणांनीं जो युक्त असतो त्यालाच, पार्वती, दीक्षा द्यावी. हाताचा व मस्तकाचा संयोग करून ( मस्तकावर आशीर्वादयुक्त हात ठेवून ) परमेश्वराचें स्मरण करावें.

## पटल ७

( ४१ ) लिंगधारकानें आपल्या करितांच स्वयंपाक करूं नये. अतिथीला दिल्यावांचून जेऊं नये. घरीं आलेल्या जंगमाची शक्त्युनुसार पूजा करावी. ( ४२ ) अलिंगीजनांचें अन्न भक्षण करूं नये. त्यांनी पाहिलेलेंहीं भक्षण करूं नये. अलिंगीजनांनीं घरीं येऊन, याचना केली तर अन्न द्यावें. ( ४३ ) उदासीनता, द्वेष, हिंसा, वंचना, हीं अ-

लिंगी यत्नेन विमतेऽप्यलिंगिषु ॥ ४३ ॥ पूज्यपूजकभावादौ भोजनादिषु कर्मसु ॥ विमतत्वादयोग्यत्वादेवमेवाखिलं जगत् ॥ ४४ ॥ गृहमायांतमालोक्य गुरुं वाऽगुरुमेव च ॥ यो गृही भवते नम्रः स गुरुर्नेतरः क्व चित् ॥ ४५ ॥ तदागतं गृहे वीक्ष्य प्रत्युत्थायाभिवादयेत् ॥ श्रमापनोदनं कुर्याद्व्यजनादिभिरादरात् ॥४६॥ प्रणम्य स्वागतं ब्रूयात्पादप्रक्षालनं चरेत् ॥ प्रथमं पूजयेद्गंधपुष्पैः संक्षालयेत्ततः ॥ ४७ ॥ अंगुष्ठे भावयेद्रुद्रं तर्जन्यां शंकरं स्मरेत् ॥ मध्यमायां महादेवमनामिक्यां त्रियंबकं ॥ ४८ ॥ कनिष्ठिकायामीशानं पादोपरि कपर्दिनं ॥ पादाधः पंचवदनं गुल्फयोरुग्रभर्गकौ ॥ ४९ ॥ सर्वं लिंगमयं ध्यात्वा पादं जंगमलिंगिनः ॥ पिबेत्संक्षालितं तोयं पीत्वा शिरसि धारयेत् ॥ ५० ॥ न पातयेदधो बिंदुं पादप्रक्षालनांभसां ॥ पुनः संपूजयेद्गंधपुष्पधूपादिभिः क्रमात् ॥ ५१ ॥ स्त्रियो वा पुरुषो वापि सर्वत्रातिथिपूजने ॥ पुंभिः पुंसां स्त्रियां स्त्रीभिर्दद्याद्गंधादिकं करे ॥ ५२ ॥ न जातिभेदस्तत्रास्ति लिंगिनां शिवयोगिनां ॥ न दृष्टिस्पृष्टदोषो वा सर्वे एव शिवाः शिवे ॥ ५३ ॥ गुरुर्लिंगं जंगमश्च पादतीर्थं प्रसादकं ॥ देहे विभूतिरुद्राक्षौ मम

---

लिंगीमनुष्य विरुद्धमताचा जरी असला तरी, यत्नानें करूं नये. ( ४४ ) पूज्यपूजकभावामध्यें, भोजनादिव्यवहारामध्यें *अलिंगीजन* विरुद्धमताचे असल्यामुळें ते, अयोग्य होत व सर्व जग विरुद्धमताचें असल्यानें तें ही अयोग्यच आहे. ( ४५ ) घरीं आलेला प्राणी श्रेष्ठ असो, लहान असो, जो गृहस्थ ( गृहस्थाश्रमी ) त्याला पाहून नम्र होतो तोच श्रेष्ठ होय. इतर मनुष्यें श्रेष्ठ नव्हेत. ( ४६ ) घरीं आलेल्या प्राण्याला पाहून, प्रत्युत्थान द्यावें. नमस्कार करावा. पंख्यानें आदरानें वारा घालून, त्याचे श्रम निवारण करावेत. ( ४७ ) नमस्कार करून, सत्कार करावा. नंतर पादप्रक्षालन करावें प्रथमतः गंध पुष्पादिकांनीं पूजा करून, मग क्षालन करावें. ( ४८ ) अतिथि जंगमाच्या अंगुष्टामध्यें रुद्राला, तर्जनीमध्यें शंकराला, मध्यमेमध्यें महादेवाला, अनामिकामध्यें त्रियंबकाला, ( ४९ ) कनिष्ठिकेमध्यें ईशानाला, पायांवर कपर्दीला, पायांच्याखालीं पंचमुखाला, दोन्ही गुडघ्यांमध्यें उग्राला व भर्गाला स्मरावें. ( ५० ) याप्रमाणें जंगमलिंगीचें सर्व शरीर लिंगमय आहे असें ध्यान करून, त्याचे पाय धुवून घेतलेलें उदक प्यावें, आणि डोक्यावर शिंपडावें. ( ५१ ) पाद प्रक्षालन केलेल्या उदकाचे थेंब खालीं पडूं देऊं नयेत. पुनः क्रमानें गंधपुष्पादिकांनीं पूजा करावी. ( ५२ ) स्त्री असो, अथवा पुरुष असो, अतिथि असेल तर, वरच्याप्रमाणें पूजा करावी. स्त्रियांची पूजा स्त्रियांनीं करावी. पुरुषांची पुरुषांनीं करावी. गंधादिक हातांत द्यावें. ( ५३ ) शिवयोगी लिंगीजनामध्यें जातिभेद नाहीं. दृष्टिदोष, स्पृष्ट ( स्पर्शाचा ) दोष कांहीं नाहीं. हे शिवे, सर्वलिंगी जंगम लोक मंगलकारकच होत. ( ५४ ) गुरु, लिंग, जंगम, पादतीर्थ,

पंचाक्षरीमंत्रः ॥ ५४ ॥ अष्टावरणसंयुक्ता वीरमाहेश्वरा नराः ॥ मम रूपधराः देवि विचरंति महीतले ॥ ५५ ॥ न त्यजेल्लिंगिना भुक्तं शिष्टमुच्छिष्टधीहतः ॥ न क्षालयेच्च तत्पात्रं न भेदं तत्र कारयेत् ॥ ५६ ॥ येन केनापि भुक्ते तु लिंगिनोच्छिष्टपात्रके ॥ पात्राभावैककालादौ सर्वेऽप्यश्नंति लिंगिनः ॥ ५७ ॥

---

प्रसाद, देहावर विभूति ( भस्म ) रुद्राक्ष, माझा पंचाक्षरी ( नमः शिवाय ) मंत्र. (५५) अशीं ( अष्टावरणें ) असून माझें स्वरूप धारण केलेले जंगम प्राणी पृथ्वीवर फिरतात. ( ५६ ) लिंगधारकानें जेऊन राहिलेलें अन्न उच्छिष्ट असें समजून, टाकून देऊं नये. उष्टें पात्र धुऊं नये. त्याविषयीं काहीं एक भेद करूं नये. ( ५७ ) लिंगधारक ज्या पात्रावरून जेऊन उठला असेल त्या पात्रांत कोणीही भोजन केलें असलें, तरी त्यावेळीं पात्र मिळत नसेल तर, सर्व लिंगीजन जेवतात.

---

# सिद्धांतशिखामणौ

## " अथ गुरुमाहात्म्यस्थलम् "

अवतरणिका–अथ प्रसादनिष्ठेन ज्ञातव्यं गुरुमाहात्म्यस्थलं निरूपयति–

श्लोकः–गुरुरेवात्र सर्वेषां कारणं सिद्धिकर्मणाम् ॥
गुरुरूपो महादेवो यतः साक्षादुपस्थितः ॥ १ ॥

व्याख्यानं—अत्र लोके भोगमोक्षलक्षणसकलसिद्धिकर्मणां गुरुरेव कारणं " न गुरोरधिकं न गुरोरधिकं " इति शिवरहस्यवचनात् यतः परमेश्वर एव साक्षाद्गुरुरूपः सन् उपस्थितः तिष्ठतीत्यर्थः ॥ १ ॥

अर्थ–॥ १ ॥ भोग मोक्ष वगैरे सर्वप्रकारच्या सिद्धि प्राप्त करून देण्यास ह्या लोकीं गुरु कारण आहे ( गुरूच्या कृपेनें ह्या लोकीं सर्वप्रकारच्या सिद्धि प्राप्त होतात ) कां तर, गुरु हा प्रत्यक्ष शंकरच असून तो गुरूचें रूप घेऊन आलेला आहे.

अवतरणिका–ननु निष्कलः शिवः किमर्थं सकलगुरुरूपेण प्रकाशत इत्यत्राह—

श्लोकः–निष्कलो हि महादेवो नित्यज्ञानमहोदधिः ॥
सकलो गुरुरूपेण सर्वानुग्राहको भवेत् ॥ २ ॥

व्याख्यानं–नित्यज्ञानार्णवपरमेश्वरः निष्कलोऽपि निरवयवोऽपि गुरुरूपेण स-

कलः सन् करचरणादिविशिष्टः सन् सर्वानुग्राहको–भवेत् लोकानुग्रहार्थं भातीत्यर्थः ॥ २ ॥

अर्थ–॥ २ ॥ महादेव हा निष्प्रपंच आहे, शाश्वत ( चिरकाल ) टिकणाऱ्या ज्ञानाचा तो महासमुद्र आहे, तो सर्वान्तर्यामी असून सर्वांवर कृपा करणारा आहे, तो गुरूच्या रूपानें अवतरला आहे असें समजावें.

अवतरणिका–तस्माद्गुरुशिवयोर्भेदो नास्तीत्याह—

श्लोकः–यश्शिवस्स गुरुर्ज्ञेयो यो गुरुस्स शिवः स्मृतः ॥
न तयोरंतरं कुर्यात् ज्ञानवान्सो महामतिः ॥ ३ ॥

व्याख्यानं—गुरोर्मोक्षकारणीभूतज्ञानप्रदत्वेन शिवाभिन्नत्वात् अन्यथा ज्ञानानुदयप्रसंगात् तदर्थं सूक्ष्मदृक् तयोरंतरं भेदं न कुर्यादित्यर्थः ॥ ३ ॥

अर्थ–॥ ३ ॥ जो शिव आहे तोच गुरु आहे जो गुरु आहे तोच शिव आहे, जो बुद्धिमान आणि पूर्णज्ञानी आहे तो गुरूमध्यें आणि शंकरामध्यें निराळेपणा आहे असें मुळींच मानीत नाहीं.

अवतरणिका–"यथाहं सर्वलोकानां गुरुरंबिकया सह" इत्यागमोक्तेः शिवसदृशं श्रीगुरुं प्राकृतैस्सदृशमनुक्त्वा पूजयेदित्याह–

श्लोकः–हस्तपादादिसाम्येन नेतरैस्सदृशं वदेत् ॥
आचार्यं ज्ञानदं शुद्धं शिवरूपतया स्थितम् ॥ ४ ॥

व्याख्यानं–शुद्धं निर्मलांतःकरणम् शिवज्ञानप्रकाशकम् उमामहेश्वररूपेण स्थितम् श्रीगुरुं हस्तपादादिसाम्येन प्राकृतैस्सदृशं संतं न वदेत् ॥ ४ ॥

अर्थ–॥ ४ ॥ ह्या गुरूलाही इतर लोकांप्रमाणेंच हात पाय वगैरे आहेत, ह्मणून इतर लोकांत आणि गुरूंत अंतर काय आहे? असें मुळींच ह्मणूं नये. आचार्य हा निष्पाप शिवज्ञानाची प्राप्ति करून देणारा असून प्रत्यक्ष शंकराच्या रूपानें अवतरलेला आहे.

अवतरणिका–तेन किं भवतीत्यत्राह—

श्लोकः–आचार्यस्यावमानेन श्रेयःप्राप्तिर्विहन्यते ॥
तस्मान्निश्श्रेयसप्राप्त्यै पूजयेत्तं समाहितः ॥ ५ ॥

व्याख्यानं–आचार्यस्यावमानेन प्राकृतजनसमोक्त्या भोगमोक्षलक्षणश्रेयःप्राप्तिर्विहन्यते तस्मात् निःश्रेयसप्राप्त्यै भोगमोक्षावाप्त्यै समाहित एकाग्रचित्तः सन् तं श्रीगुरुं पूजयेदित्यर्थः ॥ ५ ॥

अर्थ–॥ ५ ॥ आचार्यांचा अपमान केला तर आपलें कल्याण व्हावयाचें असलें तरी

होतें नाहीं, ह्यास्तव भोग व मोक्ष ह्यांची प्राप्ति व्हावी अशी इच्छा असल्यास भक्तानें एक-नि ष्ठपणानें गुरूची पूजा केली पाहिजे,

अवतरणिका–अथ " यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ " इति श्वेताश्वतरश्रुत्यर्थं प्रकटयन् गुरुमहत्वस्थलं समापयति—

श्लोकः-गुरुभक्तिविहीनस्य शिवभक्तिर्न जायते ॥
ततः शिवे यथा भक्तिस्तथा भक्तिर्गुरावपि ॥ ६ ॥

व्याख्यानं–स्पष्टं ॥ ६ ॥

" इति गुरुमहत्वस्थलम् "

अर्थ–॥ ६ ॥ ज्यानें गुरुभक्ति केली नाहीं, त्याचे हातून शिवभक्ति घडत नाहीं ह्यास्तव शिवाची जशी भक्ति करावयाची तशीच गुरूचीही भक्ती केली पाहिजे.

 " अथ जंगममाहात्म्यस्थलम् "

अवतरणिका–अथ गुरुलिंगमहत्वात्संवेद्यजंगमस्थलं प्रकाशयति—

श्लोकः-गुरुशिष्यसमारूढलिंगमाहात्म्यसंपदः ॥
सर्वं चिद्रूपविज्ञानाज्जंगमाधिक्यमुच्यते ॥ १ ॥

व्याख्यानं–" आचार्यः पूर्वरूपमंतेवास्युत्तररूपं विद्यासंधिः " इति श्रुतेः गुरुशिष्यमध्यगतशिवलिंगमहत्वसंपदः सर्वं विश्वप्रपंचं चिद्रूपविज्ञानात् चित्क्रियारूपत्वेन विज्ञानात् जंगमाधिक्यमुच्यते, गुरुशिष्ययोरिष्टप्राणभावेषु तादात्म्यभावनया समारूढलिंगमहत्वसंपत्या सर्वं विश्वं शिवशक्त्यात्मकमिति विज्ञानमेव जंगमाधिक्यमित्यर्थः ॥ १ ॥

अर्थ–॥ १ ॥ गुरूनें शिष्यास शिकविलेल्या लिंगमाहात्म्याच्या संपत्तीपेक्षां चैतन्यस्वरूपाचें ज्ञान असल्यामुळें सर्वांपेक्षां जंगमस्थलाची योग्यता मोठी आहे.

अवतरणिका–अथ ते केषु जंगमा इत्यत्राह—

श्लोकः-जानंत्यतिशयाद्ये तु शिवं विश्वप्रकाशकम् ॥
स्वस्वरूपतया ते तु जंगमा इति कीर्तिताः ॥ २ ॥

व्याख्यानं–" तस्य भासा सर्वमिदं विभाति " इति श्रुतेः ये विश्वप्रकाशकं स्वकीयचित्क्रियाशक्तिभ्यां प्रपंचप्रकाशं शिवं अतिशयेन सर्वासर्वशब्दार्थयोर्मायाकार्यको-

टिप्रविष्टत्वे ग्रासनातनत्वात् एतज्जीवनभूतत्वकर्तृत्वयोस्सनातनत्वात् अन्यथा स्व-विषयकज्ञानशून्यत्वेन स्फटिकादिप्रकाशवज्जडत्वप्रसंगात् तयोर्जीवेश्वरसाधारणीभूतास्मद्रूपात्मतत्वनिजस्वभावत्वात् स्वयं तदनतिरिक्त इति दृढतरनिश्चयेन स्वस्वरूपतया जानंति ते जंगमा इत्यर्थः. ॥ २ ॥

अर्थ–॥ २ ॥ जे लोक त्रैलोक्यांचा प्रकाश करणाऱ्या शिवास आपल्या अनुभवज्ञानावरून यथार्थरीतीनें जाणतात त्यांस जंगम ह्मणतात.

**अवतरणिका–अथ शिवयोगित्वेन प्रसिद्धजंगममहत्वं पंचभिस्सूत्रैः प्रतिपादयाति—**

**श्लोकः**–ये पश्यंति जगज्जालं चिद्रूपं शिवयोगतः ॥
निर्धूतमलसंस्पर्शास्ते स्मृताश्शिवयोगिनः ॥ ३ ॥

व्याख्यानं–ये जंगमा देवा विश्वं शिवयोगतो विश्वस्य शिवसंबंधाभावे चिद्बाह्यत्वेन संकल्पतापत्तेः शिवसंबंधोऽङ्गीकरणीय एव स च संयोगरूपो न भवति तस्य क्रियापूर्वत्वेन भिन्नदेशस्थितयोरेवोपपद्यत इति ब्रह्मवाह्यदेशाभावेन तादात्म्यरूप एवेत्युपपादितत्वात् चिद्रूपं चित्क्रियास्वरूपमिति पश्यंति जानंति ते निर्धूतमलसंस्पर्शा निर्गताणवादिमलसंबंधिनः शिवयोगिन इति स्मृता इत्यर्थः ॥ ३ ॥

अर्थ–॥ ३ ॥ जे त्रैलोक्याच्या पसाऱ्यास शिवयोगसाधनानें चित्स्वरूप आहे असें मानतात, ज्यांचा पापाचा सर्व संबंध नाहींसा झालेला आहे ( जे पातकी नाहींत ) त्यांस शिवयोगी असें ह्मणावें.

**श्लोकः**–घोरसंसारतिमिरपरिध्वंसनकारणम् ॥
येषामस्ति शिवज्ञानं ते मताश्शिवयोगिनः ॥ ४ ॥

व्याख्यानं–भयंकरसंसारांधकारनिवारकं शिवाधिक्यज्ञानं येषामस्ति ते शिवयोगिन इति मताः स्मृता इत्यर्थः ॥ ४ ॥

अर्थ–॥ ४ ॥ शिवज्ञान हें भयंकर संसाररूप अंधकाराचा नाश करणारें आहे, तें शिवज्ञान ज्या लोकांस आहे त्या लोकांस शिवयोगी ह्मणतात.

**अवतरणिका-अथ ते कीदृशाः कथं तिष्ठंतीत्यत्राह—**

**श्लोकः**–जितकामा जितक्रोधा मोहग्रंथिविभेदिनः ॥
समलोष्टाश्मकनकास्साधवश्शिवयोगिनः ॥ ५ ॥
समाः शत्रौ च मित्रे च साक्षात्कृतशिवात्मकाः ॥
निस्पृहा निरहंकारा वर्तंते शिवयोगिनः ॥ ६ ॥

व्याख्यानं–स्पष्टं ॥ ५ ॥ ६ ॥

अर्थ-॥ ५ ॥ ज्यांस मदनाची पीडा होत नाहीं, ज्यांस क्रोधाची पीडा होत नाहीं, ज्यांची मोहाची गांठ सुटलेली आहे ( ज्यांस अज्ञानपणा नाहीं ) ज्यांस मातीचें ढेंकूळ आणि सोनें सारखेंच आहे, त्या सज्जनांस शिवयोगी असें ह्मणावें, ॥ ६ ॥ शिवयोगी लोकांस शत्रु आणि मित्र हे दोन्हीही सारखेच वाटतात, त्यांस प्रत्यक्ष शिवस्वरूपाचें ज्ञान झालेलें असतें; ते निस्पृह असतात, त्यांस अभिमान मुळींच नसतो. ते सर्वांशी प्रेमभावानें आणि अगदीं साध्या स्वभावानें वागतात.

अवतरणिका-एवमुक्तलक्षणज्ञानसंपन्नाः साक्षाच्छिवा एवेत्याह-

श्लोकः-दुर्लभं हि शिवज्ञानं दुर्लभं शिवचिंतनम् ॥
येषामेतद्द्वयं चास्ति ते च साक्षाच्छिवात्मकाः ॥ ७ ॥

व्याख्यानं-शिवज्ञानं शिवाधिक्यज्ञानं शिवचिंतनम् उक्तयुक्तिभिः स्वयमेव शिव इति भवनं च दुर्लभं एतद्द्वयं येषामस्ति ते साक्षाच्छिवरूपा इत्यर्थः ॥ ७ ॥

अर्थ-॥ ७ ॥ शिवज्ञान दुर्लभ असून नेहमीं शिवचिंतन करणें हें ही काम कठिण आहे, त्या दोन्ही गोष्टी ज्यांच्या हातून नेहमीं घडतात ते शिवयोगी प्रत्यक्ष शंकरस्वरूपच होत.

अवतरणिका-अथ पुनस्तेषां महत्वं श्लोकद्वयेनाह—

श्लोकः-पादाग्ररेणवो यत्र पतंति शिवयोगिनाम् ॥
तदेव सदनं पुण्यं पावनं गृहमेधिनाम् ॥ ८ ॥
सर्वसिद्धिकरं पुंसां दर्शनं शिवयोगिनाम् ॥
स्पर्शनं पापशमनं पूजनं मुक्तिसाधनम् ॥ ९ ॥

व्याख्यानं-शिवयोगिनाम् जंगमदेवानामित्यर्थः गृहमेधिनाम् गृहस्थानामित्यर्थः पुण्यं पुण्यक्षेत्रमित्यर्थः पावनं पवित्रं शिष्टं स्पष्टं ॥ ८ ॥ ९ ॥

अर्थ-॥ ८ ॥ शिवयोगी लोकांच्या चरणाची धूलि जेथें पडते तेंच गृहस्थाश्रमी लोकांचें घर पवित्र आणि दुसऱ्यास पवित्र करणारें आहे असें समजावें- ॥ ९ ॥ शिवयोगी लोकांचें दर्शन झालें ह्मणजे मनुष्यास सर्व प्रकारच्या सिद्धि प्राप्त होतात, शिवयोगी लोकांचा स्पर्श झाला असतां पातक नष्ट होतें आणि शिवयोग्याचें पूजन केल्यानें मोक्ष प्राप्ति होते.

अवतरणिका-अथैवं तादृशशिवयोगिनां संपर्कात्सर्वेप्सितार्थसिद्धिरित्याह—

श्लोकः-महतां शिवतात्पर्यवेदिनामनुमोदिनाम् ॥
किं वा फलं न सिद्ध्येत संपर्काच्छिवयोगिनाम् ॥ १० ॥

व्याख्यानं—शिवरहस्याभिप्रायवेदिनाम् शिवसुखानुमोदिनां महतां सत्पुरुषाणाम् जंगमदेवानां संपर्कात्किं वा फलं न सिध्येत सर्वं सिध्येदित्यर्थः ॥ १० ॥

" इति जंगममहत्वस्थलम् "

अर्थ-॥ १० ॥ शिवयोगी लोक श्रेष्ठ असतात, शिवरहस्य जाणणारे असतात, ते नेहमीं आनंदी असतात. त्या शिवयोगी लोकांची सेवा केली तर अमुक एक फलप्राप्ति होणार नाहीं असें काय आहे? सर्वप्रकारची फलप्राप्ति होईल.

" भक्तमाहात्म्यस्थलम् "

अवतरणिका-अथ गुरुलिंगजंगममहत्वलंपटस्य भक्तस्य महत्वं द्वादशसूत्रैः प्रतिपादयति—

श्लोकः—गुरोर्लिंगस्य माहात्म्यकथनाच्छिवयोगिनाम् ॥
सिद्धं भक्तस्य माहात्म्यं तथाप्येष प्रशस्यते ॥ १ ॥

व्याख्यानं—गुरुलिंगजंगमेष्वेवंविधमाहात्म्यज्ञानपूर्वकं भक्तैः क्रियमाणत्वेन भक्तमाहात्म्यं सिद्धमिति तथैवायं शास्त्रे प्रशस्यते उत्कर्षेण भण्यत इत्यर्थः ॥ १ ॥

अर्थ-॥ १ ॥ गुरूचें माहात्म्य, लिंगाचें माहात्म्य, जंगमाचें माहात्म्य सांगितलें त्यावरून भक्तांचें माहात्म्य उघड दिसतच आहे तरी पण तें आतां सांगतों.

अवतरणिका-अथ के भक्ता इत्यत्र " यद्धि मनसा ध्यायति तद्वाचा वदति तत्कर्मणा करोति " इति श्रुत्यर्थानुसारेण भक्तस्वरूपमाह—

श्लोकः-ये भजंति महादेवं परमात्मानमव्ययम् ॥
कर्मणा मनसा वाचा ते भक्ता इति कीर्तिताः ॥ २ ॥

व्याख्यानं—हस्ताभ्यामर्चनारूपकायिकक्रियया शिवमूर्तिध्यानरूपमानसक्रियया स्तुतिरूपवाचिकक्रियया च ये परमात्मानं लिंगरूपिणं महादेवं भजंति ते भक्ता इत्यर्थः ॥ २ ॥

अर्थ-॥ २ ॥ महादेव हा परमेश्वरच आहे. त्याचा कधींही नाश होत नाहीं त्या महादेवाला जे लोक कायावाचामनेंकरून भजतात त्यांस भक्त ह्मणावें,

अवतरणिका-शिवभक्तेः जातिभेदोऽस्ति किमित्यत्राह—

श्लोकः-दुर्लभा हि शिवे भक्तिस्संसारभयतारिणी ॥
सा यत्र वर्तते साक्षात्स भक्तः परिगीयते ॥ ३ ॥

व्याख्यानं—स्पष्टं ॥ ३ ॥

॥ ३ ॥ संसाराची भीति नाहींशी करणारी शिवाची भक्ति दुर्लभ आहे, सर्वांस भक्ति घडत नाहीं. ती भक्ति ज्याच्या आंगांत ( मनांत ) असते त्यास भक्त ह्मणावें.

अवतरणिका-तस्माज्जननमरणपरिपीडितानां जनानां शिवभक्तिव्यतिरेकेण केनापि सत्कर्मणा प्रयोजनं नास्तीत्याह—

श्लोकः किं वेदैः किं ततः शास्त्रैः किं यज्ञैः किं तपोव्रतैः ॥
नास्ति चेच्छांकरी भक्तिर्देहिनां जन्मरोगिणाम् ॥ ४ ॥

व्याख्यानं—शास्त्रैः वेदार्थानुगैः शिवागमसूत्रपुराणादिभिरित्यर्थः शिष्टं स्पष्टं ॥४॥

अर्थ—॥ ४ ॥ वेद शिकून काय करावयाचें आहे? शास्त्र शिकून काय करावयाचें आहे? यज्ञ करून काय करावयाचें? तपश्चर्या व व्रतें करून ती काय करावयाचें ? जर जन्ममरणरूपी रोग लागलेल्या मनुष्यांस शिवभक्ति चांगली घडत नसेल तर, वर सांगितलेल्या गोष्टींचा कांहीं उपयोग नाहीं.

अवतरणिका-अथ शिवभक्तिव्यतिरेकेण विधीयमानं सत्कर्म विफलं विपरीतफलं चेति दृष्टांतपूर्वकमाह —

श्लोकः-शिवभक्तिविहीनस्य सुकृतं चापि निष्फलं ॥
विपरीतफलं च स्याद्दक्षस्यापि महाध्वरे ॥ ५ ॥

व्याख्यानं—स्यात् अभवदित्यर्थः ॥ ५ ॥

अर्थ—॥ ५ ॥ जो मनुष्य शिवभक्ति करीत नसेल त्यानें सत्कर्म केलें तरी त्याचा उपयोग नाहीं, तें व्यर्थ जातें. दक्षप्रजापतीनें प्रत्यक्ष यज्ञ केला तरी शिवभक्ति नसल्यामुळें त्याचा वाईट परिणाम झाला.

अवतरणिका-अथ शिवभक्त्या दुष्कर्मापि सत्कर्म भवेदिति दृष्टान्तपूर्वकमाह —

श्लोकः-अत्यंतपापकर्माऽपि शिवभक्त्या विशुध्यति ॥
चंडो यथा पुरा भक्त्या पितृहाऽपि शिवोऽभवत् ॥ ६ ॥

व्याख्यानं—शिवः शिवगणाधीश इत्यर्थः शिष्टं स्पष्टं ॥ ६ ॥

अर्थ—॥ ६ ॥ मनुष्य अतिशय पातकी असला तरी जर तो शिवभक्ति करील तर लागलाच पातकांतून मुक्त होऊन शुद्ध होतो. ह्याला प्रत्यक्ष उदाहरण हें कीं, चंडानें पूर्वी आपल्या प्रत्यक्ष बापाचा जीव घेतला होता तरी शिवभक्ति केल्यामुळें शंकराचें सायुज्य पावला.

अवतरणिका-नन्वेवं चेत् शिवभक्तानां पुण्यपापसंबंधोऽस्ति वा नवेत्यत्राह —

श्लोकः-सुकृतं दुष्कृतं चापि शिवभक्तस्य नास्ति हि ॥
शिवभक्तिविहीनानां कर्मपाशनिबंधनम् ॥ ७ ॥

व्याख्यानं—स्पष्टं ॥ ७ ॥

अर्थ-॥ ७ ॥ शिवाची भक्ति करणाराला पुण्य नाहीं, पाप नाहीं. शिवभक्ति न करणारांला मात्र त्यांच्या त्यांच्या कर्मांप्रमाणें सुखदुःखें भोगावीं लागतात.

अवतरणिका-तत्कथमित्यत्र दृष्टांतपूर्वकं सूत्रद्वयेनाह—

श्लोकः-शिवाश्रितानां जंतूनां कर्मणा नास्ति संगमः ॥
वाजिनां दिननाथस्य कथं तिमिरजं भयम् ॥ ८ ॥

व्याख्यानं—दिननाथस्य रवेर्वाजिनामश्वानां यथांऽधकारप्रयुक्तभीर्नास्ति तथा शिवभक्तानां कर्मणा पुण्यपापमयेन कर्मणा संगमः संबंधो नास्तीत्यर्थः ॥ ८ ॥

अर्थ ॥ ८ ॥ जसें सूर्यांचे रथास जुंपलेल्या घोड्यांस अंधाराचें भय नाहीं तसेंच शिवभक्तांस पुण्यपाप वगैरे कर्मांचा संबंध नाहीं.

श्लोकः-निरोद्धुं न क्षमं कर्म शिवभक्तान्विशृंखलान् ॥
कथं मत्तगजान् रुंधेच्छृंखला बिसतंतुजा ॥ ९ ॥

व्याख्यानं—शिवदीक्षयाऽऽणवादिमलत्रयस्य निवृत्तत्वेन विशृंखलान् शिवभक्तान् कर्म निरोद्धुं न क्षमं न समर्थं तत्र दृष्टांतः मृणालतंतुनिर्मिता शृंखला यथा मत्तगजं न रुंधेत न तथेत्यर्थः ॥ ९ ॥

अर्थ-॥ ९ ॥ एखाद्या उन्मत्त हत्तीला कमळाच्या देंठांनीं बांधूं ह्मटलें तर तें जसें होऊं शकत नाहीं तसेंच शिवाची भक्ति करणारे शिवभक्त हे स्वतंत्र आणि सशक्त आहेत ह्मणून त्यांस कर्मांच्यानें पीडा करवत नाहीं.

अवतरणिका-तस्माच्छिवभक्त एव पूज्य इत्याह—

श्लोकः-ब्राह्मणः क्षत्रियो वाऽपि वैश्यो वा शूद्र एव वा ॥
अंत्यजो वा शिवे भक्तः शिववन्मान्य एव सः ॥ १० ॥

व्याख्यानं—स्पष्टं ॥ १० ॥

अर्थ-॥ १० ॥ ब्राह्मण असो, क्षत्रिय असो, वैश्य असो शूद्र असो, किंवा चांडाल असो, जो शिवाची भक्ति करितो तो शिवासारखाच मान्य आहे.

अवतरणिका—ननु शूद्रादीनां ब्राह्मणाद्यपेक्षया निकृष्टत्वात् कथं तेषां तत्समानत्वमित्यत्राह—

श्लोकः-शिवभक्तिसमावेशे क्व जातिपरिकल्पना ॥

इंधनेष्वग्निदग्धेषु को वा भेदः प्रकीर्त्यते ॥ ११ ॥

व्याख्यानं—स्पष्टम् ॥ ११ ॥

अर्थ—॥ ११ ॥ ज्याचे आंगीं शिवभक्ति परिपूर्णपणानें भरलेली आहे त्याचे जातीबद्दल विचार करण्याचें कांहींएक कारण राहिलें नाहीं, लांकडें विस्तवांत जळून त्यांचे कोळसे झाले ह्मणजे त्यांत निराळेपणा अमुक राहिलेला ह्मणून काय सांगावा ? सांगतांच येत नाहीं.

**अवतरणिका—तस्माच्छिवभक्ता एव गणेश्वरा इत्युक्त्वा भक्तमाहात्म्यं समापयति—**

श्लोकः—शुद्धा नियमसंयुक्ताः शिवार्पितफलागमाः ॥
अर्चयंति शिवं लोके विज्ञेयास्ते गणेश्वराः ॥ १२ ॥

'व्याख्यानं—ये शुद्धाः दीक्षया परिपूताः नियमसंपन्नाः शिवव्रतिनः शिवार्पितफलागमाः तदर्पितपुण्यपापफलागमाः संतः लोके शिवलिंगमर्चयंति ते " नाशिवस्य शिवोपास्तिः " " नारुद्रो रुद्रमर्चयेत् " इत्यादिवचनैः गणेश्वरा इति रुद्रा इति विज्ञेया इत्यर्थः ॥ १२ ॥

" इति भक्तमाहात्म्यस्थलम् "

अर्थ—॥ १२ ॥ जे दीक्षेमुळें पवित्र झाले असतात, नेहमीं शिवव्रतें व नियम वगैरे पाळितात. जीं जीं कांहीं कर्मे करितात, त्यांचीं फळें ते शिवास अर्पण करितात, व नेहमीं ते शिवाचें पूजन करितात त्यांस प्रमथपति ( रुद्र ) आहेत असें जाणावें.

**अवतरणिका-गुरुस्वरूपं विशदयति—**

श्लोकः—गुणातीतं गुकारं च रूपातीतं रुकारकम् ॥
गुणातीतमरूपं च यो दद्यात्स गुरुः स्मृतः ॥ ८ ॥

व्याख्यानं—गुकारं प्राकृतगुणातीतं रुकारं अशुद्धमायारूपातीतं गुणातीतमरूपं च मंडलत्रयात्मकगुणत्रयं ज्योतिर्मयबैंदवकलाशून्यचिन्मयवस्तु यः ददाति उपदिशति सः गुरुः स्मृतः गुरुरिति स्मृत इत्यर्थः ॥ ८ ॥

अर्थ—॥ ८ ]। गुरु हीं दोन अक्षरें आहेत गु ह्या अक्षरानें मोठा गुणातीत ( प्राकृत गुण नसलेला. ) आहे असें समजावयाचें व रु ह्या अक्षरावरून तो रूपातीत ( निर्मायी ) आहे असें समजावें तें गुणातीत व रूपातीत स्थल ( चित्स्वरूपस्थल ) तो प्राप्त करून देतो ह्मणून त्याला गुरु ह्मणतात.

**अवतरणिका—अथैतत्प्रसंगादाचार्यस्वरूपं च विशदयति—**

श्लोक—आचिनोति च शास्त्रार्थानाचारे स्थापयत्यलम् ॥

स्वयमाचरते यस्मादाचार्यस्तेन चोच्यते ॥ ९ ॥

व्याख्यानं—शास्त्रार्थान् वीरशैवशास्त्ररहस्यार्थान् प्रकटीकृत्य कथयति आचारे वीरशैवाचारे शिष्यान् अलं आधिक्येन स्थापयति नियमयति स्वयं च वीरशैवाचारे आचरते तेन हि तेन कारणेन आचार्यो वक्ता " कुशलोऽस्य लब्ध " इति कठवल्ली-श्रुत्यनुसारेणाचार्य इत्युच्यत इत्यर्थः ॥ ९ ॥

अर्थ—॥ ९ ॥ गुरु, शिष्यास अनेक वीरशैवशास्त्रांतील रहस्यार्थ शिकवितो व वीरशैवांचे चांगलें आचरण त्याकडून करवितो व आपणही स्वतः वीरशैवाचारानें वागतो त्यामुळें त्या गुरूस आचार्य असें ह्मणतात.

अवतरणिका-अथ देशिकशब्दनिर्वचनं च कृत्वा शिवलिंगैक्य एव जगद्गुरुरिति सूत्रद्वयेनोक्तदीक्षागुरुस्थलं समापयति—

श्लोकः—षडध्वातीतयोगेन यतते यस्तु देशिकः ॥

मायाब्धितारणोपायहेतुर्विश्वगुरुः शिवः ॥ १० ॥

व्याख्यानं—ज्ञानान्मुक्तिं दिशति " यस्स देशिक इति स्मृतः " इति कामिक-वाक्यप्रसिद्धो यो देशिकः षडध्वातीतयोगेन " अध्वनामध्वपते श्रेष्ठस्याध्वनः पार-मय " इति श्रुतिप्रसिद्धवर्णपदादिषडध्वातीतयोगेन यतते उद्योगवानास्ते स शिवः शिवलिंगैक्यः मायाब्धितारणोपायहेतुभूतजगद्गुरुरित्यर्थः ॥ १० ॥

अर्थ—॥ १० ॥ शिष्यांस ज्ञान शिकवून मोक्षप्राप्ति करून देतो ह्मणून गुरूस देशिक असें ह्मणतात जो देशिक ( गुरु ) १ वर्णाध्व २ पदाध्व ३ मंत्राध्व ४ कलाध्व वगैरे सहा मार्गांहून पार गेलेला आहे माया ( अज्ञानरूप ) समुद्र तरून जाण्यास जो उपयोगी असून जो सर्व जगाचाही गुरु आहे तोच शंकर होय.

अवतरणिका—अथ कथमयं जगद्गुरुरित्याह—

श्लोकः—अखंडं येन चैतन्यं व्यज्यते सर्ववस्तुषु ॥

आत्मयोगप्रभावेन स गुरुर्विश्वभासकः ॥ ११ ॥

व्याख्यानं—सर्ववस्तुषु नीलपीतादिसकलवस्तुषु आत्मयोगप्रभावेन स्वानुभवब-लात् अखंडं सच्चिदानंदात्मकं चैतन्यं येन व्यज्यते नीलपीतादिप्रतिनियतपदार्थाव-भासनकालेऽप्यहमित्यखंडचैतन्यमनुवर्तत एव अन्यथा तद्व्यवदर्शनं न स्यादिति स्फुटी-क्रियते स गुरुः विश्वभासकः विश्वप्रकाशक इत्यर्थः ॥ ११ ॥

॥ इति दीक्षागुरुस्थलम् ॥

अर्थ—॥ ११ ॥ असें चैतन्य भरलेलें आहे असें निळ्या, पिंवळ्या वगैरे सर्व वस्तूंत स्वानुभवबलानें सच्चिदानंदात्मकचैतन्य ज्यामुळें प्रकाशमान होतें त्या प्रकाशमानकालांतही

अखंड चैतन्यास अनुसरून असतो त्यास विश्वप्रकाशक ह्मणावें.

॥ अथ शिक्षागुरुस्थलम् ॥

अवतरणिका-अथ " बोध्यबोधकभावेन ज्ञानद्वारेण शास्यते ॥ शिष्यो हि येन गुरुणा स शिक्षागुरुरुच्यते " इति वातुलोत्तरवचनानुसारेण शिक्षागुरुस्थलं निरूपयति—

श्लोकः—दीक्षागुरुरसौ शिक्षाहेतुः शिष्यस्य बोधकः ॥
प्रश्नोत्तरप्रवक्ता च शिक्षागुरुरितीर्यते ॥ १ ॥

व्याख्यानं—असौ दीक्षागुरुः शिष्यस्य बोधकः सन् प्रश्नोत्तरप्रवक्ता शिष्यकृतप्रश्नस्योत्तरं दत्वा शिक्षाहेतुश्च शिक्षाकारणः सन् शिक्षागुरुरिति कथ्यत इत्यर्थः ॥ १ ॥

अर्थ—॥ १ ॥ हा दीक्षागुरु शिष्यास बोध व्हावयासाठीं शिक्षा ( वर्तनक्रम ) शिकवितो शिष्यास संशय येऊन त्यानें प्रश्न केल्यास त्याचीं समाधानकारक उत्तरें देऊन त्याचे सर्व संशय दूर करितो तेव्हां त्यास शिक्षागुरु असें ह्मणतात.

अवतरणिका-अथामुमेवार्थं स्फुटयति—

श्लोकः—बोधकोऽयं समाख्यातो बोध्यमेतादिति स्फुटम् ॥
शिष्ये नियुज्यते येन स शिक्षागुरुरुच्यते ॥ २ ॥

व्याख्यानं—अयं शिवसिद्धांतबोधकः परतत्वप्रकाशक इत्यर्थः " न सोऽस्ति प्रत्ययो लोके यः शब्दानुगमादृते । " इति वैयाकरणोक्तेः स्फुटं देशिकोपदेशस्फुटीभूतं एतत् शिवयोगज्ञानं बोध्यं इति येन गुरुणा शिष्यः समाख्यातः बोधकः सन् नियुज्यते नियम्यते स शिक्षागुरुरित्युच्यत इत्यर्थः ॥ २ ॥

अर्थ—॥ २ ॥ देशिक शिष्यास शिकवावयाचें शिवज्ञान चांगल्या रीतीनें बोध होईल असें सांगतो ह्मणून त्याला बोधक असें ह्मणतात, व बोधकानें करून दिलेलें शिवज्ञान शिष्याचे मनांत चांगल्या रीतीनें ठसतें ह्मणून त्यास शिक्षागुरु असें ह्मणतात.

अवतरणिका-अथ " आचार्यः पूर्वरूपं अंतेवास्युत्तररूपं विद्या संधिः आचार्योऽतेवासिनमाशास्ति " इति श्रुत्यनुसारेण द्विविध्येन तत्स्वरूपं वर्णयति—

श्लोकः—संसारतिमिरोन्माथिशरच्चंद्रमरीचयः ॥
वाचो यस्य प्रवर्तंते तमाचार्यं प्रचक्षते ॥ ३ ॥

व्याख्यानं—यस्य वाचः उपदेशवाक्यानि संसारतिमिरविनाशने शरच्चंद्रमरी-

चय इव प्रवर्तते तं आचार्यं संतं प्रचक्षते कथयंति ॥ ३ ॥

अर्थ—॥ ३ ॥ संसाररूप अंधकाराचा नाश व्हावयासाठीं ज्याच्या वाचा ( धर्मोपदेश ) शरदृतूंतील स्वच्छ चांदण्याप्रमाणें शोभतात त्याला आचार्य ह्मणावें.

श्लोकः-ददाति यः पतिज्ञानं जगन्मायानिवर्तकम् ॥
अद्वैतवासनोपायं तमाचार्यवरं विदुः ॥ ४ ॥

व्याख्यानं—यो जगन्मायानिवर्तकम् प्रापंचिकभेदभ्रांतिनिवर्तकम् पतिज्ञानं "पतिं विश्वस्यात्मेश्वरं शाश्वतम् शिवमच्युतम्" इति नारायणोपनिषत्प्रसिद्धस्वात्माभिन्न-शिवज्ञानम् ददाति प्रकाशयति तं आचार्यवरं आचार्यश्रेष्ठं संतं विदुः जानंती-त्यर्थः ॥ ४ ॥

अर्थ—॥ ४ ॥ जो शिवाचें यथार्थज्ञान करून देतो, तें ज्ञान सर्वजग मिथ्या आहे माया खोटी आहे असें अनुभवास आणतें, व अद्वैतमताकडे आपलें मन वळवितें तें शिवज्ञान करून देणाऱ्यास आचार्यश्रेष्ठ ह्मणतात.

अवतरणिका—अथ शिवाद्वैतज्ञानसंपन्नः सन् शिष्यसंदेहवा-रक एव गुरुश्रेष्ठ इति सूत्रद्वयेनाह—

श्लोकः-पूर्वपक्षं समादाय जगद्भेदविकल्पनम् ॥
अद्वैतकृतसिद्धांतो गुरुरेष गुणाधिकः ॥ ५ ॥

व्याख्यानं—जगद्भेदविकल्पनं प्रापंचिकभेदद्वैविध्यविशिष्टं पूर्वपक्षं समादाय अं-गीकृत्य अद्वैतकृतसिद्धांतवानेष गुरुः शिक्षागुरुरेव गुणाधिकः श्रेष्ठ इत्यर्थः ॥५॥

अर्थ—॥ ५ ॥ जगाच्या निराळेपणाचा विकल्पाभास पूर्वपक्षाप्रमाणें घेऊन अद्वैतशा-स्राचा सिद्धांत करितो त्यास गुरु ह्मणावें तो सर्वांपेक्षां गुणवान् होय.

श्लोकः-संदेहवनसंदोहसमुच्छेदकुठारिका ॥
यत्सूक्तिधारा विमला स गुरूणां शिखामणिः ॥ ६ ॥

व्याख्यानं—विमला निर्मला यत्सूक्तिधारा यस्य गुरोरुपदेशवाक्यधारा सं-देहवनसंदोहसमुच्छेदकुठारिका संशयारण्यसमुच्छेदपरशुः सः गुरूणां शिखामणिः श्रेष्ठ इत्यर्थः ॥ ६ ॥

अर्थ—॥ ६ ॥ ज्याची मधुर भाषणाची शैली संशयरूपी अनेक वनें साफ कराव-याची कुऱ्हाडच, अशी वाटते ( ज्याच्या गोड आणि मुद्देसूद बोलण्यानें शिष्याच्या म-नांतील सर्व संशय दूर होतात. ) तो गुरूंचाही मुख्य गुरु समजावा.

अवतरणिका—अथेममर्थमेव विशेषयति सूत्रद्वयेन—

श्लोकः-यत्सूक्तिदर्पणाभोगे निर्मले दृश्यते सदा ॥

मोक्षश्रीर्बिंबरूपेण स गुरुर्भवतारकः ॥ ७ ॥

व्याख्यानं—निर्मले यस्योपदेशोक्तिदर्पणमंडले मोक्षलक्ष्मीः बिंबरूपेण प्रतिबिंबरूपेणेत्यर्थः दृश्यते प्रकाशते स गुरुः भवतारकः संसारार्णवतारक इत्यर्थः ॥७॥

अर्थ—॥ ७ ॥ ज्या गुरूच्या निर्मळ उत्तम भाषणरूप आरशांत मोक्षलक्ष्मी प्रतिबिंब पडलेल्याप्रमाणें दिसते, ( त्या गुरूच्या उपदेशानें शिष्यास मोक्ष प्राप्ति होते. ) तो गुरु संसारांतून तारणारा होय.

अवतरणिका-अथ प्रकारांतरेणाह—

श्लोकः-शिष्याणां हृदयालेख्यं प्रद्योतयति यः स्वयम् ॥
ज्ञानदीपिकयाऽनेन गुरुणा कः समो भवेत् ॥ ८ ॥

व्याख्यानं—यः श्रीगुरुः शिष्याणां हृदयालेख्यं हृत्कमलस्थनिजरूपचित्रं ज्ञानदीपिकया ज्ञानदीपेन प्रद्योतयति प्रकाशयति अनेन गुरुणा शिक्षागुरुणा कः समो भवेत् न कोऽपि सम इत्यर्थः ॥ ८ ॥

अर्थ—॥ ८ ॥ जो गुरु आपल्या ज्ञानरूप दीपानें शिष्यांच्या चित्तरूप चित्रास प्रकाशित करितो त्या गुरूची बरोबरी कोणाच्यानेंही करवत नाहीं.

अवतरणिका-अथैतादृशगुरुरस्ति वेत्यत्रास्ति दुर्लभ इत्युक्त्वा शिक्षागुरुस्थलं समापयति—

श्लोकः-परमाद्वैतविज्ञानपरमौषधिदानतः ॥
संसाररोगनिर्माथी देशिकः केन लभ्यते ॥ ९ ॥

व्याख्यानं—शिवकारुण्यरहितेन केनापि न लभ्यत इत्यर्थः ॥ ९ ॥

इति शिक्षागुरुस्थलम् ॥

अर्थ—॥ ९ ॥ उत्तमतऱ्हेचें अद्वैत ज्ञानरूप उत्तमतऱ्हेच्या औषधदानानें संसाररूपरोग दूर करणारा देशिक ( गुरु ) कोणाला मिळणार ? असा देशिक मिळणें दुर्मिळ आहे.

॥ अथ ज्ञानगुरुस्थलम् ॥

अवतरणिका-अथ "शिवरूपानुसंधायि ज्ञानं येनोपदिश्यते ॥ मुमुक्षोर्मोक्षसिद्ध्यर्थं स ज्ञानगुरुरुच्यते" इति वातुलोत्तरवचनानुसारेण ज्ञानगुरुस्थलं निरूपयति—

श्लोकः-उपदेष्टोपदेशानां संशयच्छेदकारकः ॥
सम्यग्ज्ञानप्रदस्साक्षादेष ज्ञानगुरुः स्मृतः ॥ १ ॥

व्याख्यानं—उपदेशानां रहस्यार्थानां उपदेष्टा उपदेशकृत् संशयच्छेदकारकः शिष्य-

संदेहवारक एषः शिक्षागुरुरेव सम्यक् साक्षात् ज्ञानप्रदः प्रत्यक्षीभूतशिवज्ञानप्रदः सन् ज्ञानगुरुरिति स्मृत इत्यर्थः ॥ १ ॥

अर्थ—॥ १ ॥ उपदेश करावयाच्या ज्ञानाचा ( रहस्यार्थांचा ) उपदेश करणारा, शिष्यजनांचे संशय दूर करणारा, उत्तमरीतीच्या ज्ञानाचा उपदेश करणारा हा देशिक ज्ञानगुरुच होय.

अवतरणिका—ननु शिवज्ञानं कीदृशं तत्कथं प्रत्यक्षीकरोतीत्यत्राह—

श्लोकः—निरस्तविश्वसंभेदनिर्विकारं चिदंबरम् ॥
साक्षात्करोति यो युक्त्या स ज्ञानगुरुरुच्यते ॥ २ ॥

व्याख्यानं—निरस्तविश्वसंभेदं न किंचिद्वेदिपमिति शून्यप्रतीतिवलात् निराकृतविश्वभेदं विकाररहितं चिदाकाशं चिद्व्योम युक्त्या स्फुटतरभासमाननीलसुखादिप्रमात्रन्वेषणद्वारा पारमार्थिकप्रमातृलांभ इहोपदिश्यत इति शिवाद्वैतशास्त्रोक्तस्वानुभवयुक्त्या यः प्रत्यक्षीकरोति स ज्ञानगुरुरित्यर्थः ॥ २ ॥

अर्थ—॥ २ ॥ ज्याचे अनेकप्रकारचे निराळेपणा नाहींसे झाले असून ज्यास कोणताही विकार राहिलेला नाहीं, तें चैतन्यस्वरूप ( ज्ञानाकाश ) आपल्या युक्तीच्या गोष्टी सांगून जो अनुभवास आणून देतो त्यास ज्ञानगुरु ह्मणावें.

अवतरणिका-अथ शिवज्ञानं प्रस्तौति सूत्रद्वयेन—

श्लोकः—कलंकवानसौ चंद्रः क्षयवृद्धिपरिप्लुतः ॥
निष्कलंकस्थितो ज्ञानचंद्रमा निर्विकारवान् ॥ ३ ॥

व्याख्यानं—क्षयवृद्धिपरिप्लुतः क्षयवृद्धिपीड्यमानः असौ चंद्रः कलंकवान् निर्विकारवान् विकाररहितः ज्ञानचंद्रमाः चिचंद्रः निष्कलंकस्थितः कलंकरहितः सन् तिष्ठतीत्यर्थः ॥ ३ ॥

अर्थ—॥ ३ ॥ हा आकाशांतील चंद्र कलंकी आहे त्याची शुक्लपक्षांत वृद्धि होत जाते व कृष्णपक्षांत क्षय होत जातो, हा देशिकानें शिष्यास सांगितलेला ज्ञानचंद्र निष्कलंक असून त्यांस क्षयवृद्धि होण्याची मुळींच भीति नाहीं.

श्लोकः—पार्श्वस्थतिमिरं हंति प्रदीपो मणिनिर्मितः ॥
सर्वगामि तमो हंति बोधदीपो निरंकुशः ॥ ४ ॥

व्याख्यानं—मणिनिर्मितः रत्ननिर्मितः दीपः पार्श्वस्थांधकारं निवारयति निरंकुशः अनर्गलः बोधदीपः चित्प्रदीपः सर्वगामि तमः सर्वत्र विद्यमानं तमः निवारयतीत्यर्थः ॥ ४ ॥

अर्थ—॥ ४ ॥ रत्नाचा दीप असला तर तो आजुबाजूचा आंधार नाहींसा करितो देशिकापासून प्राप्त झालेला ज्ञानदीप सर्वजगांत जितकें अज्ञान ( अंधकार ) पसरलेला असेल तितकें सर्व दूर करितो व त्यास कोठंही प्रतिबंध होत नाहीं.

**अवतारणिका-अथ शिवज्ञानोपदेशतत्परं श्रीगुरुं सूत्रद्वयेन-प्रस्तौति—**

**श्लोकः-सर्वार्थसाधकज्ञानविशेषादेशतत्परः ॥**
**ज्ञानाचार्यस्समस्तानामनुग्रहकरः शिवः ॥ ५ ॥**

व्याख्यानं—भोगमोक्षलक्षणसर्वप्रयोजनसाधकशिवज्ञानविशेषोपदेशासक्तः ज्ञान-गुरुरेव समस्तानां मुमुक्षूणां अनुग्रहकरः साक्षाच्छिव इत्यर्थः ॥ ६ ॥

अर्थ—॥ ५ ॥ आचार्य सर्वप्रकारचे अर्थ सहजरीतीनें समजतील असें विशेष ज्ञान ( शिवरहस्याचें ज्ञान ) करून देण्यांत नेहमीं तत्पर असतो, सारांश, आचार्य हा स-र्वजगावर उपकार करणारा प्रत्यक्ष शंकर आहे.

**श्लोकः-कटाक्षचंद्रमा यस्य ज्ञानसागरवर्धनः ॥**
**संसारतिमिरच्छेदी स गुरुर्ज्ञानपारगः ॥ ६ ॥**

व्याख्यानं—यस्याचार्यस्य कटाक्षचंद्रमाः शिवज्ञानोदधिवर्धनः संसारतिमिर-च्छेदी स गुरुः श्रीगुरुः ज्ञानपारगः परापरज्ञानपारंगत इत्यर्थः ॥ ६ ॥

अर्थ—॥ ६ ॥ या आचार्यांचा नेत्रकटाक्ष ( कृपाकटाक्ष ) रूप चंद्र शिष्याच्या ज्ञा-नरूपसमुद्रास भरती आणतो, संसाररूप आंधाराचा नाश करितो, तो गुरु श्रेष्ठ ज्ञा-नाच्या पारंगत ( परिपूर्णज्ञानी ) होय ह्यांत शंका नाहीं.

**अवतारणिका—अथ तमेव गुरुं भानुत्वेन वर्णयन् ततोऽप्या-धिक्यं प्रतिपादयति —**

**श्लोकः-बहिस्तिमिरविच्छेत्ता भानुरेष प्रकीर्तितः ॥**
**बहिरंतस्तमश्छेदी विभुर्देशिकभास्करः ॥ ७ ॥**

व्याख्यानं—एष भानुः बहिस्तिमिरविच्छेत्ता बाह्यांधकारनिवारकः विभुः वि-व्यापकः देशिकभास्करः ज्ञानाचार्यसूर्यः बहिरंतस्तमश्छेदी नायं शिव इति विषयगतम-ज्ञानं नाहं शिव इत्यंतर्गतज्ञानं भिनत्तीति प्रकीर्तितः ॥ ७ ॥

अर्थ—॥ ७ ॥ सूर्य हा फक्त जगांतील बाहेरील आंधार दूर करितो परंतु गुरुरूप सूर्य आपल्या शिष्यांच्या मनांतील अज्ञान ( आंधार ) आणि सूर्याप्रमाणें बाहेर दिसणारा आंधार दूर करितो त्यामुळें आकाशांत प्रकाशमान दिसणाऱ्या सूर्यापेक्षां देशिकसूर्य श्रेष्ठ आहे.

अवतरणिका-अथ शिववेदकं शिवज्ञानं सूचयित्वा ज्ञानगुरुस्थलं सूत्रद्वयेन समापयति—

श्लोकः-कटाक्षलेशमात्रेण विना ध्यानादिकल्पनम् ॥
शिवत्वं भावयेद्यत्र स वेदः शांभवो मतः ॥ ८ ॥

व्याख्यानं—ध्यानधारणादिसंकल्पं विना श्रीगुरोः कृपापांगदर्शनमात्रेण शिवत्वं भावयेत् स्फुटं भवेत् स वेदः शांभव इति मतः संमत इत्यर्थः ॥ ८ ॥

अर्थ-॥ ८ ॥ जो वेद ध्यानधारणादि संकल्पावांचून फक्त गुरूच्या कृपाकटाक्षानेंच शिवपणाची भावना करून देतो तो वेद शंकराचा आहे असें समजावें.

श्लोकः-शिववेदकरे ज्ञाने दत्ते येन सुनिर्मले ॥
जीवन्मुक्तो भवेच्छिष्यस्स गुरुर्ज्ञानसागरः ॥ ९ ॥

व्याख्यानं—येन श्रीगुरुणा शिववेदकरे स्वात्मशिवतास्फुटीकरणप्रवीणे निर्मले शिवज्ञाने दत्ते सति शिष्यो जीवन्नपि मुक्तः स्यात् स गुरुः शिवज्ञानसागर इत्यर्थः ॥ ९ ॥

अर्थ-॥ ९ ॥ ज्या गुरूनें आपल्या शिष्यास निष्पापरीतीचें शिवाच्या यथार्थ रूपाचें ज्ञान करून दिल्यामुळें शिष्य जीवन्मुक्त होतो तो गुरु तर ज्ञानाचा समुद्रच समजावा.

---

## पारमेश्वरागमे ५ पटले.

यो विजानाति गिरिजे स मामेव न संशयः ॥ अर्चयेज्जंगमं धन्यः संध्यायां गृहमागतं ॥ ८७ ॥ लब्धमात्रेण च गृहे शिष्टेन स्वात्मजीवनात् ॥ योऽर्चयेज्जंगमान्भक्त्या मामेवार्चितवान् हि सः ॥८८॥ साक्षान्मद्रूपमीशानि शयनासनभोजनैः ॥ अनाथं रोगिणं दीनं मूकं बधिरमेव च ॥ ८९ ॥ पंगुं मुंडं दुराचारं नावमन्येत लिंगिनं ॥ न कार्यः कलहो देवि अन्योऽन्यं शिवयोगिभिः ॥ ९० ॥ न पैशुन्यं न

---

## पारमेश्वरागम ५ पटले.

( ८७ ) संध्याकाळीं घरीं आलेल्या जंगमाची पूजा तो मींच आहे असें समजून जो करील, हे गिरिजे, तो धन्यच होय यांत संशय नाहीं. ( ८८ ) आपला निर्वाह करून घरीं शिल्लक राहिलेल्या पदार्थांनीं भक्तीनें जो जंगमाची पूजा करील‘ त्यानें माझीच पूजा केली. ( ८९ ) हें ईशानी, प्रत्यक्ष माझें रूपच असे हे लिंगधारी अनाथ, रोगी दीन, मुके, बहिरे, ( ९० ) पंगु, मुंड, दुराचारी यांचा तिरस्कार करूं नये, व त्यांची शयन आसन भोजनादिकांनीं पूजा करावी. हे देवी, शिवयोग्यांनीं परस्पर कधींही कलह करूं नये. ( ९१ ) पैशुन्य, मात्सर्य द्रोह, पीडा, कधींही करूं नये.

मात्सर्यं न द्रोहं नापि पीडनं ॥ न स्पृशेदायुधं क्वापि प्राणैः कंठगतैरपि ॥ ९१ ॥

६ पटले.

जंगमं पूजयेद्यस्तु साक्षान्मद्रूपमीश्वरम् ॥ स मां पूजितवानेव सोऽहं देवि न संशयः ॥ ११ ॥ तस्माद्यो भक्तिमान् शक्तो जंगमेषु महात्मसु ॥ तद्धि भक्तस्थलं विद्धि मम चातिप्रियं शिवे ॥ १२ ॥ यो गुरूक्तेन मार्गेण लिंगपूजारतः सदा ॥ जंगमानर्चयेच्छक्त्या स हि माहेश्वरः स्मृतः ॥ १३ ॥ त्रिकालमर्चयेल्लिंगं मम भक्तेषु भक्तिमान् ॥ स्वमताचारनिरतः स वै माहेश्वरः प्रिये ॥ १४ ॥ जलतत्वमिदं देवि तनुरन्यतमा मम ॥ तस्याधिदेवता चाहं सोऽहं देवि न संशयः ॥ १५ ॥ य उक्तलक्षणस्तु स्यादाचारे जंगमार्चने ॥ स्थलं माहेश्वरं विद्धि मम चातिप्रियं शिवे ॥ १६ ॥ योऽनर्पितं महेशानि नार्चयित्वापि जंगमान् ॥ नाश्नाति न त्यजेन्मद्यमर्पितं कृच्छ्रगोऽपि वा ॥ १७ ॥ सोऽयं प्रसादी कथितः सोऽहमेव न संशयः ॥ तत्प्रसादिस्थलं विद्धि मम चातिप्रियं शिवे ॥ १८ ॥

---

कंठगत प्राण आले तरी, आयुधाला स्पर्श करूं नये.

६ पटल.

( ११ ) प्रत्यक्ष माझें रूप जो जंगम, त्याची पूजा केली असतां त्यानें माझीच पूजा केली असें होतें. हे देवी, तो मीच आहे यांत संशय नको. ( १२ ) महात्मे, जे जंगम त्यांच्या ठिकाणीं जो भक्तिमान् होतो, हे देवी, तेंच माझें प्रियकर भक्तस्थल समज. ( १३ ) योगमार्गानें लिंगपूजारत होऊन, शक्तिपूर्वक जंगमाची पूजा करील त्याला माहेश्वर म्हणावें. ( १४ ) त्याचप्रमाणें माझ्या भक्तांच्या ठिकाणीं तीन्ही वेळ भक्तीनें लिंगपूजा करावी, हे प्रिये, असा स्वमताचारानें चालणारा जो पुरुष असतो त्याला माहेश्वर म्हणावें- ( १५ ) हे देवी, माझा दुसरा देह जलतत्वरूपी होय, त्याचें मुख्य दैवत मी आहे, यांत संशय नाहीं. ( १६ ) हे शिवे, आचाराविषयीं, जंगमाच्या पूजेविषयीं, जीं लक्षणें पूर्वीं सांगितलीं आहेत, तीं ज्यांच्यामध्यें आहेत, तेंच माझें अति प्रियकर माहेश्वर स्थल समज. ( १७ ) हे महेशानी, जो जंगमाची पूजा केल्याशिवाय आणि मला अर्पण केल्याशिवाय अन्न घेत नाहीं, मला अर्पण केलेल्या अन्नाचा, कितीही संकटें आलीं तरी, त्याग करीत नाहीं. ( १८ ) तो प्रसादी होय, तो मीच आहें यांत संशय नको. हे शिवे तेंच प्रसादिस्थल समज.



## चित्रदुर्गेचे श्रीमन्महाराजनिरंजनजगद्गुरु मुरगाराजेंद्रमहास्वामीस पत्र लिहावयाचा मायना

ॐ

### श्रीमन्महाराजनिरंजनजगद्गुरु मुरगाराजेंद्रमहास्वामिनां

श्रीमत्परमपावनचरित्र, चारुतरसन्मोहनांग, मदनमर्दन, मायाकोलाहल, नित्यनिरंजन, निराकार, निगमगोचर, सच्चिदानंद, नित्यपरिपूर्णहृदय, जगद्विस्तारमूलस्तंभायमान, परशिवस्वरूप, श्रीमदल्लमप्रभुस्वाम्यन्वयसंजनितानां सकलसिंहासनाधिप श्रीमद्वीरशैव सिद्धांतपरमषट्स्थलस्थापनाचार्यवर्याणां, श्रीमुद्रापुराधीश द्राक्षारामक्षेत्ररामनाथलिंगोद्भव श्रीमच्चिन्मूलाद्रि बृहन्मठांतरालपरिशोभित सत्प्रभुमंडितोर्ध्वहृदयात्मक द्वारावतीशून्यसिंहासनाधीश्वराणां महा "  " संनिधिं प्रति.

---

## गदगचे श्रीमज्जगद्गुरु तोंटद महास्वामीस पत्र लिहावयाचा मायना.

श्रीमन्निरंजन निःशून्य निर्लेप निरावर्णसत्तादि लक्षण लक्षित मलमायासंगभंग षट्स्थलस्थापनाचार्यवर्य शून्यसिंहासनोपरि स्थित गुरुकुलकेतनायमान श्रीमदनादिसिद्धेश्वरपरंपरान्वयानुगत श्रीमद्राजाधिराजपूजित श्रीमज्जगद्गुरु तोंटदमहास्वामिनां दिव्यसंनिधिं प्रति.

---

## हुबळीचे श्रीमज्जगद्गुरु गंगाधरमहास्वामीस पत्र लिहावयाचा मायना

ॐ

श्रीमच्चतुर्मुखशतमखमुखाखिललेखरेखाचंचत्पंचशाखाकलितामंदगंधांधीकृतगंधपसंदोहरवबंधुरसुंदरवंदनमालिकामतल्लिकासल्ललितपदपल्लवतल्लज परशिवापरावताराणां कलिकलुषितजनकल्मषतुषारकणशोषण भीषणपूषण गुणगणभूषणानां दुष्टवंशमांडपुंडरीकखंडनमत्तवेतंडप्रकांडदंडाधिनाथ

बसवमंडिताखंड कल्याणखनिकल्याणनगरीविराजमानशून्यसिंहासनाधीशप्रभुसंप्रदायपरंपरागतसयमनियमकुमारसमयपयःपयोधिपार्वणपयःपादानां समधरीकृत भूधरारि नगरीगरीयस्सुषुमासीमन्नूपुरांनारीलपनकलितातिलकत्रिसहस्रमठमध्याविद्योतमानमंजुलापिंजरसालभंजिकापुंजरंजिताभिनवागाणितमणिकिरणालंकरणचणशून्यसिंहासनासीनानां दुर्वहाखर्वगर्वसर्वस्वशंवरारिशांवरीविडंवनविडंगानां सुरसरिदमलयशोराशिविशदीकृताशेषाशावलयानां वीरशैवषट्स्थलस्थापनाचार्यवर्याणां मूलपीठस्थ जगद्गुरु गुरुसिद्धमहास्वामिनां शुभकरकरांभोजसंभवानां बादरायणभुजांकितनंदिध्वजातिर्यगांदोलिकादिविरुददेदीप्यमानानां श्रीमद्गंगाधरस्वामिनां सन्निधिं प्रति.

---

## श्रीक्षेत्र काशी येथील जंगमवाडी मठाधिष्ठित श्रीमज्जगद्गुरु राजेश्वर महास्वामीस पत्र लिहावयाचा मायना.

श्रीमद्वेदागमोपनिषत्प्रतिपादितविमल वीरशैवमतस्थापनाचार्यवर्यासंख्यात वीरमाहेश्वरसमुदयोच्चयकारणभूताष्टावरण पंचाचारप्रतिष्ठापनस्वभावशिवभक्तकदंवहृदयांबुजमित्रशरणागतपरिपालनशीलसत्क्रियाचारपारावार जगदीश्वर जटामुकुट घटितजान्हवीतीरप्रविराजमान समस्तमुक्तिक्षेत्र मस्तकमणि विमुक्तिप्रद त्रिनेत्र त्रिशूलाग्रस्थित महाकाशीक्षेत्र विश्वेश्वर महालिंगगर्भाविर्भूत जगद्गुरु विश्वाराध्य देशिकेंद्रान्वयपरंपरागत भूकैलास वाराणसीपुरमध्य महनीय माहेश्वर राजिविराजितानेक लिंगमय हरिकेशनंदनपरिष्कृत जंगमवाटिका महामठाधिष्ठित चतुर्वर्गफलप्रद कांचनोदंचित पांचालिकापुंजरंजित विविधमणिखचित दिव्यसिंहासनारूढ शिखामुद्रांकित समस्तविरुदान्वित स्कंदगोत्र पंचवर्णसूत्रयुक्त जगद्गुरु द्वितीयमल्लिकार्जुन स्वामिनामक श्रीमद्वीरभद्र महास्वामिनां करकमलजात राजेश्वर महास्वामिनां संनिधौ.

---

## उज्जयनी येथील श्रीमज्जगद्‌गुरु श्रीचन्नबसवराज देशिकेंद्र महास्वामीस पत्र लिहावयाचा मायना.

श्रीमत्सच्चिदानंद नित्यपरिपूर्णाविरळपरंज्योतिलक्षणलक्षित चराचर जगज्जंगमजालजन्मकारणीभूत श्रीमत्परशिवदक्षिणलपनोद्भव जगद्गुरु दारुकाचार्यपरंपरागत श्रीसिद्धनुत सिद्धवट सिद्धेश्वरगर्भांभोधिराकासुधाकर श्रीमद्वेदवेदांत सिद्धांत पुराणागमेतिहास सकलशास्त्रप्रसिद्ध श्रीमन्महा वीरशैवमतस्थापनाचार्यवर्य दीक्षाशिक्षामोक्षैककारणावतार दुराचार दुर्मार्ग दुष्क्रियानिग्रह सन्मार्ग सत्क्रियापरिपालनशील श्रीमन्मरुळसिद्धाचार्य करकमलसंजात श्रीमत्परमपावन भूसुक्षेत्र श्रीमदुज्जयिनीसद्धर्म सिंहासनाधीश्वर सर्वतंत्र स्वतंत्रावतार शिखामुद्राभिराममौक्तिकासन वर्षलांछनपरिशोभित गुरुपट्टाध्यक्ष श्रीचन्नबसवराजदेशिकेंद्र महास्वामिनां सन्निधिं प्रति.

---

## श्रीक्षेत्र काशी येथील जंगमवाटीमठाधिपति श्रीमज्जगद्‌गुरु श्रीसिद्धलिंगमहास्वामीस ह्मैसूर सरकारानें लिहून दिलेलें दानपत्र ( कानडी लिपींतील. )

श्रीमद्ब्रम्हांडमंडलविद्योतमानहृद्यानवद्यसमस्तवेदागमपुराणेतिहासप्रसिद्ध भूकैलासवाराणसीपुटभेदनमध्यमहनीय्यहरिकेशनंदनपरिष्कृतजंगमवाटिमठाधिष्ठिताविश्वाराध्यपरंपरानुयात सिंहासनारूढपट्टाध्यक्ष श्रीसिद्धलिंगस्वामिगळसन्निधिगे स्वस्ति श्रीविजयाभ्युदय शालिवाहन शक वर्षगळु १७६७ संद वर्तमानपराभवनाम संवत्सरद आषाढ वद्य २ शुक्रवारदल्लि श्रीमद्राजधिराजराजपरमेश्वर प्रौढप्रतापाप्रतिम वीरनरपति विरुदेंतेंबरगंडलोकैकवीरयदुकुलपयः पारावार कलानिधिशंखचक्रांकुशकुठारमकरमत्स्यशरभसालुगंड भेरुंड धरणिवराह हनूमद्गरुड कंठरवाद्यनेक विरुदांकितराद महिशूरपुरवराधीश श्रीकृष्णराजवडियरवरु बरशिकोट्ट दानशासन आदागि श्रीकाशीक्षेत्रदल्लि निम्म मठदल्लि नित्यगट्ले १२ जनके गणाराधने नडेयुवंते अप्पणे कोडिशि इबग्य तिगळु वदके कुपणी रुपायि ऐवत्तेसेर नालवदके

कुंपणी रुपायि ६०० आरुनूरर प्रकार काशीक्षेत्रक्के हुंडि माडिशि अप्पणे कोडिसुत्ता यिधितागि नित्यकट्ले सदरीमेरे गणाराधनेगे तक्क जीनसु आडिगेअवरु वगैरे गोत्तुमाडि इट्टु ई धर्मवन्नु आचंद्रार्क वागि नडिसुत्ता नमगे आशिर्वादवन्नु माडुत्ता बरुवदेंदु बरिशि कोट्टशासन सयि "स्वदत्ताद्विगुणं पुण्यं परदत्तानुपालनम् ॥ परदत्तापहारेण स्वदत्तं निष्फलं भवेत्" व तारीखु १० ने माहे जुलाई सन १८४६ ने इसवी खत्त अरमने सुवराय दुय्यं गुरिकार इलाखे खास बोक्कस हजूरु सदरी मेरेगे कुंपणी आरुनूरुरुपायि नंम वर्धंती दिवसा सालियाना हुंडि कळिहिसुत्ता इधे रुजु **श्रीकृष्ण.**

---

## वरील सनदेचें मराठी तात्पर्य.

म्हैसूरचें सरकार श्रीकृष्णराज वडियर यांनीं लिहून दिलेलें दानपत्र असें कीं श्रीकाशी क्षेत्र येथें जंगमवाडी मठांत निरंतर १२ इसमांस गणाराधना [ जंगमभोजन ] चालावी याप्रमाणें आज्ञा दिली आहे. याकरितां दर एक महिन्यास कंपनी रुपये ५० पन्नासाप्रमाणें दरसाल कंपनी रुपये ६०० प्रमाणें काशीक्षेत्रास हुंडि करून पाठविण्यांत येतील. निरंतर सदर्हूप्रमाणें गणाराधनेस योग्य जिनसा व स्वयपाकी वगैरेची व्यवस्था करून हा धर्म चंद्रसूर्य असेपर्यंत चालवीत आह्मांस आशीर्वाद करण्यांत यावा असें दानपत्र लिहून दिलें आहे. "स्वदत्ताद्विगुणं पुण्यं परदत्तानुपालनं ॥ परदत्तापहारेण स्वदत्तं निष्फलं भवेत्" ॥ अर्थ—दुसऱ्यानें दान दिलेल्या वस्तूचें रक्षण जो करतो, त्या मनुष्याला आपण दिलेल्या दानाच्या पुण्यापेक्षां दुप्पट पुण्य प्राप्त होतें आणि दुसऱ्यानें दिलेल्या दानाचा अपहार जो मानव करतो, त्यामानवानें दिलेल्या दानाचें फळ त्याला मुळींच मिळत नाहीं. व तारीख १० वी माहे जुलई सन १८४६ इसवी खत्त राजवाड्यांतील सुवराय दुय्यं गुरिकार खासखजीनदार हुजूर यांच्याकडून सदरीप्रमाणें कंपनी ६०० रुपये आमच्या वाढदिवशीं दरसाल हुंडी करून पाठवून देण्यांत येतील. सही **श्रीकृष्ण.**

# विक्रीस तयार.

## वीरशैवलिंगिब्राम्हणधर्मग्रंथमालेंतील मराठी भाषांतरासह असलेलेल्या संस्कृत ग्रंथांची यादी.

| | रु. आ. पै. |
|---|---|
| १. वीरशैवसदाचारसंग्रह | ०-१२-० |
| २. सिद्धांतशिखामणी भाग १ | १- ८-० |
| ३. सिद्धांतशिखामणी भाग २ | १- ८-० |
| ४. बसवेश्वरपुराण व्यासोक्त भाग १–२ प्रत्येकीं | १- ८-० |
| | १- ८-० |
| ५. वीरशैवाचारप्रदीपिका | २- ०-० |
| ६. हरिहरतारतम्य | ०- ४-० |
| ७. पादोदकविचार | ०- ३-० |
| ८. रामायणसारसंग्रह | ०- ६-० |
| ९. उपयुक्त वेंचे | ०- ७-० |
| १०. विरक्तोत्पत्तिक्रियालणं | ०- ४-० |
| ११. पारमेश्वरागम... भाग १ | १- ०-० |
| १२. पारमेश्वरागम... भाग २ | १- ०-० |
| १३. प्रभुलिंगलीला... भाग १ | १- ८-० |
| १४. प्रभुलिंगलीला... भाग २ | १- ४-० |
| १५. प्रभुलिंगलीला... भाग ३ | १- ०-० |
| १६. पंचाचार्यपंचमोत्पत्ति-प्रकरणम् | ०- ६-० |
| १७. वीरमाहेश्वरप्रकरणम् | ०- ८-० |
| १८. दीक्षादिकथनम् | ०- २-० |
| १९. सूक्ष्मागम | ०-१०-० |
| २०. संक्षिप्त लिंगपूजाविधि. | ०- -९ |

| | रु. आ. पै. |
|---|---|
| २१. वीरशैवलिंगिब्राह्मणं वंशावलिपट | ०- १- ० |
| २२. वीरशैवदीक्षाविधि-वीरमाहेश्वरदीक्षाविधिं | ०- १- ० |
| २३. शिष्यवर्गसंप्रदायानिरूपणं | ०- १- ० |
| २४. शिवपुराण वायवीयसंहिता पूर्वभाग | २- ०- ० |
| २५. शिवपुराण वायवीयसंहिता उत्तरभाग | २- ०- ० |
| २६. भारतसारसंग्रह | ०- ६- ० |
| २७. वीरशैवमतसंवर्द्धिनी | ०- २- ० |
| २८. अनादिवीरशैवसारसंग्रह भाग १ व २ प्रत्येकी. | १- ८- ० |
| २९. वीरशैवखानेसुमारी | ०- १- ० |
| ३०. संक्षिप्त विवाहविधि | ०- ३- ० |
| ३१. व्यापारसाम्राज्य पूर्वार्धं. | १- ०- ० |
| ३२. शिवपरअभंग | ०- ७- ० |
| ३३. शिवोत्कर्षकीर्तनतरंगिणी भाग १ | ०- ५- ० |
| ३४. भाग २ | ०- ५- ० |
| ३५. भाग ३ | ०- ४- ० |
| ३६. मराठी सिद्धरामेश्वर चरित्र | ०- ७- ० |

### छापत असलेले ग्रन्थ.

१. दशकर्मपद्धति. २. वीरमाहेश्वराचारसंग्रह. भाग १ ला. २ रा. ३ रां कैवल्यसार.

## ग्रंथ मिळण्याचीं ठिकाणें.

वरील ग्रंथ रा. रा. चनबसप्पा वारद सोलापूर यांचे मुंबई, विजापूर व सोलापूर कलबुर्गा येथील दुकानीं विकत मिळतील.

आम्ही छापलेले धर्मग्रन्थांपैकीं कोणत्याही ग्रन्थांची दुसरी आवृत्ति काढण्याची कोणाची मर्जी असल्यास त्यांस आमची परवागी आहे कारण धर्मग्रन्थांचा जितका प्रसार होईल तितका व्हावा अशी आमची इच्छा आहे.

प्रसिद्धिकर्ता.